## प्रास्ताविक चार शब्द :

*साने गुरूजींच्या पैगंबर चरित्राला मी प्रस्तावनारूप चार शब्द लिहावे, अशी श्री. यदुनाथ थत्ते यानी मागणी केली आणि मी सहजच ती मान्य केली. अलीकडे मी अशी गोष्ट सहसा स्वीकारत नाही; पण गुरूजींची मुरवत तुटेना.*

*गुरूजीनी हे चरित्र भाविकपणाने लिहिले आहे, ज्या भाविकपणाची अपेक्षा एखाद्या निष्ठावंत मुसलमानाकडून करता येईल. 'सर्वधर्मी समानत्व' ही भावना गुरूजींच्या ठिकाणी मुरलेली होती; यामुळे हे शक्य झाले.*

*चरित्रग्रंथाच्या वाचकाच्या ठिकाणी एक विवेक लागतो. आपल्याला थोरांच्या चरित्राचे अनुकरण करायचे नसते, त्यांचे चारित्र्य घ्यायचे असते - हा तो विवेक होय; आणि प्राचीन पुरूषांच्या चरित्राला तो विशेषच लागू असतो. कारण ते आपल्यापासून कालतः दूर असतात; म्हणून 'तुका म्हणे सार धरी.'*

*इस्लामच्या निष्ठेत अवतारवाद येत नाही. केवढ्या मोठ्या पुरूषाला ईश्वराच्या जोडीला बसवणे योग्य नाही, असे इस्लामचे समंजस मत आहे.*

*या उलट, सर्वच ईश्वरमय असल्यामुळे, यस्य देवे परा भक्तिः यथा देवे तथा गुरौ अशा सहृदय चित्तालाच ज्ञानप्रकाश लाभायचा, असा वैदिकांचा गूढ अभिप्राय आहे. मग अशा वादांत आम्ही काय करावे ? निदान मुहंमदांबाबत विचार करताना इस्लामचे मत ग्रह्य समजावे.*

*सबंध कुराण वाचून मुहंमदांच्या जीवनचरित्राविषयी फारशी माहिती उपलब्ध व्हायची नाही. कृष्णचरित्राशिवाय भागवत आणि ख्रिस्तचरित्राशिवाय नवा करार, असा हा प्रकार आहे ! त्यांतील गोडी लक्षात घेऊन वाचकाने प्रस्तुत चरित्र विवेकपूर्वक वाचावे.*

*हिंदू आणि मुसलमान हजार वर्षांपासून भारतात एकत्र राहत आहेत. तथापि एकमेकांच्या थोर पुरूषांविषयी आणि धर्मग्रंथांविषयी एकमेकांना, पुरेशी काय, फारशी माहिती नसते. ती असणे जरूर आहे; कारण अम्हांला एकत्र नांदायचे आहे अणि एकत्र नांदून, विविधतेत एकता कशी राखता येते, इतकेच नव्हे, विविधतेनेच एकता कशी खुलते, हे जगाला दाखवायचे आहे.*

*या दृष्टीने प्रस्तुत पुस्तक विशेष स्वागतार्ह आहे.*

*एवढ्या चार शब्दांत, यदुनाथस्तृप्यतु.*

*ब्रह्मविद्यामंदिर, पवनार* — *विनोबाचा जय जगत*

*११-१०-६४*




**VICE-PRESIDENT**
**INDIA**
**New Delhi**
**Camp : Raj Bhavan,**
**Bombay 2-12-64**

***I am very happy to learn that the first part of the late Shri Sane Guruji's work on Islamic civilization is being published on the 24th of December, 1964, the author's birthday. The admirers of Shri. Sane Guruji could not have celebrated the day in a better way. Shri. Sane Guruji influenced many a young life as a devoted teacher, and as the founder of the Rashtra Seva Dal. He contributed in significant measure to the building up of a sound public opinion - the basis for all true democratic life-through his prolific pen and as the founder of the Sadhana and the Sadhana Prakashan. To help in bringing about a true mutual understanding between various elements of the variegated pattern of our national life was one of the dominating urges o Shri. Sane Guruji's life. It was this, I guess, that made him write this book while he was an inmate of the Dhulia Jail in 1931 for the crime of working for the freedom of his people. The work is incomplete and was found among his papers after his unfortunate death in 1950.***

***The manuscript was read by my valued friend Shri. M. Harris and, on his advice, the first part is being published as a separate volume. It deals with the life of the Prophet Mohammad. It is an exquisite example of sympathetic understanding and a genuine appreciation of a life that has meant such a great deal for humanity and a true appreciation of whose work and mission can be of immense help in the process of our own national integration. The author has in unusual measure succeeded in entering the spirit of his subject.***

***There are, I understand, not many books on the life of the Prophet in Marathi and I am sure this one will be widely read and will make a distinct contribution towards as better understanding of Islam and the Prophet.***

***I am glad to know that the late author's friends and admirers are continuation great work and should like to congratulate them on the publication of this valuable book.***

*Sd/-*
***(ZAKIR HUSSAIN)***

# भावनात्मक ऐक्याला उपकारक ग्रंथ

## उपराष्ट्रपती डॉ. झाकिर हुसैन यांच्या इंग्रजीतील संदेशाचा मराठी अनुवाद

*साने गुरूजींच्या इस्लामी संस्कृतीवरील ग्रंथाचा पहिला खंड २४ डिसेंबर, १९६४ रोजी, लेखकाच्या जन्मदिवशी, प्रसिध्द होत आहे याबद्दल मला फार आनंद वाटत आहे. साने गुरूजींच्या चाहत्यांनी त्यांचा जन्मदिवस साजरा करण्यासाठी ठरविलेला हा कार्यक्रम अन्य कोणत्याही कार्यक्रमापेक्षा अधिक औचितयपूर्ण आहे. साने गुरूजी एक निष्ठावान शिक्षक म्हणून सुपरिचित आहेत. राष्ट्र सेवा दलाच्या संस्थापकांत त्यांची गणना होते. असंख्य तरूणांची मने त्यानी घडविली.*

*साने गुरूजीनी विपुल लेखन केले अणि साधना साप्ताहिक व साधना प्रकाशन यांची संस्थापना केली. या साहित्यसाधनेतून, लोकशाही जीवन पध्दतीसाठी आवश्यक असणारे अधिष्ठान जे जागृत लोकमत, ते निर्माण करण्यासाठी त्यानी मोठे कार्य केले. आपल्या राष्ट्राच्या जीवनातील वेगवेगळी वैशिष्ट्ये असणा-या घटकांना एकमेकांची खरीखुरी ओळख पटावी व त्यांतून त्यांच्यात स्नेह निर्माण व्हावा, ही साने गुरूजींच्या मनातील एक प्रबळ प्रेरणा होती. मला वाटते या प्रेरणेमुळेच, स्वातंत्र्यसंग्रामात भाग घेतल्याबद्दल धुळे तुरूंगात १९३१ साली कारावास भोगत असताना, त्यानी हे पुस्तक लिहिले. हा त्यांचा ग्रंथ अपुरा आहे. १९५० साली झालेल्या त्यांच्या निधनानंतर, त्यांच्या उर्वरित कागदपत्रांत हे हस्तलिखित होते.*

*माझे सन्माननीय मित्र श्री. एम. हारिस यानी हे हंस्तलिखित वाचले आणि त्यांच्या सल्लयावरूनच या हस्तलिखिताचा पहिला भाग ग्रंथरूपाने प्रसिध्द होत आहे. या भागात मुहंमद पैगंबरांचे जीवनचरित्र आले आहे.*

*पैगंबरांचे जीवन मानवजातीच्या दृष्टीने, अतिशय मोलाचे आहे. त्यांच्या जीवित-कार्याचे व संदेशाचे खरेखुरे महत्त्व पटलें तर आपल्या देशात भावनात्मक ऐक्य निर्माण होण्याच्या प्रक्रियेस मोठीच मदत होईल. या ग्रंथात पैगंबरांच्या कार्याचे महत्त्व लेखकाने ज्या सहृदयतेने व सहानुभूतीने जाणले आहे आणि ज्या सहज आणि उत्कट रीतीने या कार्याचा गौरव केला आहे, ती रीत अपूर्व आहे. लेखन-विषयाच्या अंतरंगत प्रवेश करण्यात लेखकाने असामान्य यश संपादन केले आहे.*

*मराठीत महंमद पैगंबरांच्या जीवनावर फारशी पुस्तके नाहीत. माझी खात्री आहे की, साने गुरूजींचा हा ग्रंथ अनेक मराठी वाचक वाचतील आणि या वाचनामुळे अनेकांना पैगंबरांचे व इस्लामचे आकलन अधिक चांगल्या रीतीने होईल.*

*साने गुरूजींच्या मित्रांनी व चाहत्यांनी त्यांचे कार्य पुढे चालू ठेवले आहे याचा मला फार संतोष वाटतो. हा मौलिक ग्रंथ प्रकाशित केल्याबद्दल मी त्यांचे अभिनंदन करतो.*

*स्वाक्षरीत*
*(डॉ. जाकेर हुसैन)*
*उप-राष्ट्रपती*

# अनुक्रमणिका







# १

# मानव समाजाच्या अभ्यासाची चार रुपे



या जगात महान विभूती जन्माला येतात, लोकोत्तर पुरुष जन्माला येतात. जगाच्या गाड्याला ते प्रचंड चालना देतात. एखादा बुध्द, एखादा ख्रिस्त, एखादा मुहंमद येतो व कधीही न संपणारी गती व प्रेरणा जगाला देतो. या ज्या महान व्यक्ती असतात, त्यांनाही मुरड घालावी लागते. त्यांच्या मूळच्या कल्पना समाजात शिरताना बदलत असतात. त्या जशाच्या तशा राहत नाहीत. बुध्द धर्मातील, ख्रिस्ती धर्मातील किंवा इस्लामी धर्मातील कल्पना. मूळ धर्मसंस्थापकांच्या मनात जशा असतील तशाच राहिल्या असे नाही. त्या लोकोत्तर विभूतींचा प्रचंड परिणाम झाला यात संशय नाही. परंतू समाजव्यापक असे जे इतर प्रवाह, त्यांच्याशी या लोकोत्तर विभूतींच्या विचारप्रवाहासही समरस व्हावे लागले. तेव्हाच त्यांचे विचार पुढे जाऊ शकले. एरव्ही ते पुढे सरकते ना. कधी मूळच्या कल्पना अधिक विकसित व प्रगल्भ होत, कधी त्या विकृतही होत; परंतू असे होणे अपरिहार्यच असते. संस्कृतीच्या विशिष्ट पायरीवर असणा-या लोकांच्या सर्वसामान्य गरजांना अनुरुप असेच स्वरूप या नव विचारांसही घेणे प्राप्त होते. म्हणून इतिहास हा नेहमी बनत असतो, वाढत असतो. इतिहास म्हणजे एक अखंड गतीचा प्रवाह आहे. भौगोलिक व आर्थिक परिस्थितीमूळे नवनवीन कल्पना येतात. आर्थिक जीवनाचे तर फारच महत्तव असते. समाजाच्या आर्थिक स्थितीमध्ये संस्कृतीची, त्या त्या समाजातील गुणादुर्गुणांची मुळे असतात. संस्कृतीच्या व कलांचा अभ्यास करताना आर्थिक रचनेचा अभ्यास अत्यावश्यक असतो. नवीन नवीन काळात नवीन दृष्टी येते. पूर्वीच्या कल्पनांना निराळे अर्थ मिळतात, त्यांना नविन रंग चढतात. जून्या संस्थांत नविन अर्थ दिसतो. त्यांचे नीट परीक्षणनिरीक्षण होऊ लागते. म्हणून कोणत्याही व्यक्तीचे व्यक्तिमत्त्व, विभूतीचे विभूतिमत्त्व पाहताना तिच्यास भोवतीची परिस्थिती पाहणे आवश्यक असते. परिस्थितीच्या प्रभावळीतच त्या त्या व्यक्तीचे सम्यक् दर्शन आपण घेऊ शकतो. कोणी म्हणतात, परिस्थिती माणसाला बनवते. कोणी म्हणतात महापुरुष परिस्थितीला कलाटणी देतात. सत्य दोहोंच्यामध्ये आहे. परिस्थिती ट्टमाणसाला बनविते व माणूसही परिस्थितीला रंगरूप देत असतो. व्यक्ती व समाज एकमेकांवर परिणाम करीत असतात. समाजच नव्हे तर बाह्य भौगोलिक स्थितीहि व्यक्तीवर परिणाम करत असते. इतिहास म्हणजे काय ? इतिहास म्हणजे अनंत इच्छाशक्तीचे अन्योन्य परिणाम होऊन सतत बनत जाणारा महान् प्रवाह. इतिहासाकडे पाहण्याची ही अत्यंत शास्त्रीय दृष्टी आहे.

समाज पाय-यापाया-यांनी वाढत आला आहे. सृष्टी एकदम कधी उडी मारीत नाही. मार्क्सवादी म्हणतात की कधी कधी एकदम उड्या मारण्यात येत असतात. परंतु या ज्या उड्या वाटतात, या ज्या बाह्यात: क्रांती किंवा उत्पात वाटतात, त्याही उत्क्रांतीतीलच एक प्रकारच्या पाय-या असे दुसरे म्हणतात.

सर्वत्र सर्जन व विनाशन सदैव चालले आहे. हरघडी मोडतोड, अंतर्बाह्य चालली आहे. प्रत्येक क्षणाला जन्ममरण आहे. काही तरी जाते, काही नवीन येते. क्रांती म्हणजे उत्क्रांतीचे जरा विशाल व भव्य स्वरूप !

सामान्यत: व्यक्तीच्या जीवनात जे नियम तेच समाजाच्याही. आपण पदोपदी काटेकोर विचार करून थोडेच वागत असतो. प्रत्येक क्षणी साधकबाधक विचार करीत कोण बसतो? पुष्कळ वेळा विचार आपल्यावर लादला जातो. आपण खातो, पितो, झोपतो त्या वेळेस का मोठी विचार क्रिया चालू असते? परंतु जेव्हा एखादा प्रश्न उदभवतो, तेव्हाच आपली बुध्दी जागते. आपला दैनंदिन सामान्य व्यवहार म्हणजे आपल्या ठरीव सवयींचा, आपल्या लहरींचा, वासनाविकासांचा परिणाम असतो. ने बुध्दी दरक्षणी येत नाही. बुध्दिदेवता ही मागून येते. सवयींना बुध्दीने सुसंस्कृतपणा आला असेल; परंतु तेथे बुध्दी असतेच असे नाही. बुध्दी नेहमी मागे राहते, आणि सवय, आपले रागद्वेष, आपल्या आवडीनिवडी यांनाच अग्रस्थान असते.

जसे व्यक्तीचे तसेच समाजाचेही. समाजसुध्दा सवयी. रूढी, रागद्वेष यांनीच वागतो. म्हणून समाजातील रूढी, आवडीनिवडी, दंतकथा, भावना, वासनाविकार या सर्वांचा अभ्यास करावा लागतो. बुध्दिवादाइतकीच त्यांच्या अभ्यासाचीही जरूरी असते. समाजाचा इतिहास पाहणा-याने त्यांच्याकडे तुच्छतेने पाहता कामा नये. शास्त्रज्ञानला सोने किंवा खडू सारख्याच किमतीची. विचाराच्या तत्त्वज्ञानाच्या उच्च स्वरूपांचा अभ्यास जसा महत्त्वाचा तद्वत् अंधविश्वास, चालीरीती, भोळसट कल्पना, लोकरूढी, दंतकथा यांचा अभ्यासही महत्त्वाचा. मानवी जीवनावर या सर्वांचा कसकसा परिणाम होतो हे पाहिले पाहिजे.

मानवी समाजाचा अभ्यास तीन रूपांत करायचा असतो:

१. भौतिक, भौगोलिक, आर्थिक स्वरूपात,

२. भावनात्मक स्वरूपात,

३. बौध्दिक स्वरूपात.

मानवी सुधारणेचा विचार करताना बाह्य जीवन, कलात्मक जीवन, वैचारिक जीवन या तिहींचा विचार करावा लागतो आणि उत्क्रांतीचा वा क्रांतीच्या दृष्टीन करावा लागतो. चौथीही एक गोष्ट असते. ती म्हणजे आध्यत्मिकता. आपल्या वरील त्रिविध जीवनाचे सार म्हणजे आपली आध्यत्मिकता. म्हणजे भौतिक, भावनात्मक व वैचारिक गोष्टीचा आपल्या मनावर होणारा परिणाम. कोणी म्हणतात की वैचारिक स्वरूपात ही गेष्ट येऊन गेली; परंतु वैचारिक जीवनाचाही पलीकडे जाणारी आध्यात्मिकता असते.

संस्कृतीचा भौगोलिक व आर्थिक परिस्थितीशी फार निकट संबंध असतो. आपलाच हेका धरणारे अंध लोक काही म्हणोत, मनुष्य हा परिस्थितीचा प्राणी आहे, ही गोष्ट नाकारता येणार नाही. मनुष्य आणखीही काही अधिक असतो. परंतु परिस्थितीचाही तो असतो. शंभरांपैकी नव्वद लोक परिस्थितिशरण असतात. एखाद्या विशिष्ट देशातील संस्था कोणत्याही असोत. त्या त्या संस्था त्या त्या देशातील विशिष्ट परिस्थितीमूळेच संभवल्या असे दिसून येईल. मुहंमदांनी जो धर्म दिला, जे नियम दिले, जी नीती दिली, ज्या संस्था दिल्या, त्यांचे स्वरूप नीट समजण्यासाठी अरबस्थानची परिस्थिती पाहिली पाहिजे. अरबस्थानातील

परिस्थितीच्या प्रभावळीत मुहंमदांना पाहू या, म्हणजे त्यांचे कार्य नीट कळेल. कोणत्या मर्यादांत, कोणत्या लोकांत, कोणत्या प्रदेशांत, कोणत्या परिस्थितीत त्याना काम करायचे होते ते पाहू या.



# २

# इस्लामची जन्मभूमी



ते पहा अरबस्थान. ईजिप्त व सीरिया यांच्यामधला हा प्रदेश. एक चमत्कृतिमय प्रदेश. कोणलाही शरण न जाणारा व कोणालाही फारसा माहित नसलेला प्रदेश. सीझर व खुश्रू यांच्या फौजा जात-येत, तेव्हाच थोडासा परिचय या देशाचा होई. इराण, ईजिप्त, रोम, बायझंटाईन सर्वांनी हा प्रदेश जिंकण्यासाठी प्रयत्न केले; परंतु प्रयत्न अपयशी ठरले आणि अलेक्झांडरही आपली स्वप्ने मूर्त करण्यासाठी जगत तर त्यालाही या देशात जीवनातील पराजयाचा पहिला धडा कदाचित शिकावा लागला असता ! प्राचीन काळची ही सारी राज्ये, साम्राज्ये गडगडताना अरब पाहत होता. तो स्पर्धाक्षेत्रात कधी शिरला नाही, युध्दक्षेत्रात उतरला नाही. खुश्रू व सीझरची सैन्ये येत-जात, लढत. पंरतू कोणाचीही बाजू घेऊन अरबाने आपला हात उचलला नाही.

असा हा शांत, स्वस्थ अरेबिया. आपल्या मुक्या नि:स्तब्ध गूढतेतून आता प्रकट होणार होता. एक हजार वर्षेपर्यंत परकीयांच्या दृष्टीला दृष्टी न देणारा हा विजनवासी, एकांतप्रिय अरब सा-या जगाचे डोळे स्वत:कडे ओढून घेणार होता. स्वत:च्या प्रेरणेने अरबस्थान स्वत:च्या जीवनावरील पडदा फाडून देणारे होते. हे शांत स्तब्ध लोक सा-या जगातील राज्ये, साम्राज्ये स्वत:च्या पायांपाशी आणावयास उभे राहिले. आपल्या किल्ल्यांतून ते बाहेर पडले.

साराच अरेबिया अज्ञात होता असे नाही. नकाशात जरा पहा. आशियाच्या उजव्या कानातील हा सुंदर लोलक जरा पहा. दक्षिणेस हिंदी महासागर, पूर्वेस इराणचे आखात, पश्चिमेस तांबडा समुद्र व उत्तरेस सीरियाचा वैराण भाग. अरबस्थानाचे सामान्यत: दोन भाग पाडता येतील. मधला भाग मध्य अरबस्थान हा केवळ वालुकामय प्रदेश आहे आणि या वालुकामय प्रदेशाभोवती समुद्राच्या तिन्ही बाजूंनी असणारा भाग हा दुसरा भाग. तसे इतर पुष्कळ भाग आहेत. हवा, पाणी, सुपीकपणा लोकांच्या चालीरीती, एवढेच नव्हे तर तोंडवळे यांतही फरक आहेत. अरबस्थानच्या उत्तरेचा डोंगराळ मुलूख यात अलहीरा हा भाग येतो. याला गस्ससन असेही म्हणत. या भागाला रोम व इराण यांचे प्रभुत्व बहुदा अलटून पालटून पत्करावेच लागे. पश्चिमेकडचा भाग हा सर्वात महत्त्वाचा आहे. या भागाला हिजाज असे नाव आहे. या भागातच मदिना हे प्रसिध्द व पवित्र शहर आहे. त्याचे इस्लामपूर्व नाव यसरिब असे होते. मक्का शहर याच भागात. मक्केची यात्रा करणारे हाजी लोक ज्या बंदरात उतरतात ते जिद्दा बंदरही याच भागात. मक्का, मदिना ही शहरे समुद्रापासून आत आहेत. तांबड्या समुद्राच्या पूर्व किना-याकडे पहा. लाल दगडाचे सुळके रागाने जणू समुद्रात घुसत आहेत असे येथे दिसेल; परंतु लाल लाटांच्या मा-याला भिऊन हे पहाड

मागे मागे जात आहेत. चला त्यांच्या पाठोपाठ,किना-याकडून या पहा एका पाठीमागून एक अशा डोंगरांच्या, टेकड्यांच्या रांगा आहेत आणि या टेकड्यांच्या अधूनमधून एखादी हिरवळीची दरी आहे. त्या हिरवळीच्या जागी अरबांची एखादी वसाहत असायची. तेथे अरब आपल्या शेळ्यामेंढ्यांना पाणी पाजत आहेत असे दिसे. पावसाच्या पाण्याने बनणारे प्रवाह तेथे टिकत नसत. तप्त भूमीत लगेच शोषले जात. परंतु वाळूत घुसलेल्या या पाण्यातून मध्येच एखादा झरा अखंड व अनंत असा वाहताना आढळे. वाळवंटातील भटके लोक अशा वनस्थलास जीव की प्राण मानीत. आजूबाजूस उजाड भगभगीत, रखरखीत भाग आणि मध्येच परमेश्वराची ही वाहती करुणा झुळझुळ करीत असे. अशा या मधल्या जागा बघत, टेकड्या चढा व उतरा. सर्वत्र एकच प्रकार दिसेल. आणि येता येता शेवटच्या सर्वांत उंच अशा रांगेवर तुम्ही याल. तेथून पूर्वेकडे पहा.काय बरे दिसते ? तुम्हाला अनंत नि:स्तब्ध असे वाळवंट दिसेल. अरबांशिवाय तेथे कोण राहील ? कोण जगेल ? एकीकडे टेकड्या व एकीकडे अनंत वाळवंट. यांच्या मधल्या या भागाला, हिजाज असे म्हणतात. या शब्दाचा अर्थ मधली जागा असा आहे. इस्लामची जन्मभूमी ती ही. इस्लामी धर्माचे बाळ येथे पाळण्यात घातले गेले. या वाळवंटातून पुढे गेले की नज्दचे डोंगरपठार येते. हिजाज व नज्द या भागातील अरब जातीच मुहंमदांच्या पहिल्या प्रथम अनुयायी झाल्या. या भागास सोडून नैर्ऋत्येकडे चला. त्या भागास यमन म्हणतात. यमनच्य पूर्वेस हद्रामूत हा भाग आहे. पूर्व किना-यापर्यंत हा भाग गेला आहे. पूर्वेस आर्म्सच्या आखाताजवळ आर्म्स भाग. पश्चिमेकडे अगदी दक्षिणेकडे यमन आहे, तसाच पूर्वेकडे अगदी दक्षिणेस अम्मान हा भाग आहे. पूर्व व पश्चिम यांच्यामधील भागात एके ठिकाणी अल्-हझ्र नावाचे वाळवंट आहे व ते थेट पुढे बहरैनपर्यंत पसरलेले आहे. या वाळवंटातूनही मधूनमधून सुपीक भाग आहेत. वाळवंटातील ही आधारस्थाने, निवासस्थाने !



# ३

# बेदुइनांचे मुक्तजीवन



किना-याजवळचे भाग सोडून अरबस्थानच्या अंतर्गत भागात आपण जाऊया. वरती अनंत निळे निळे आकाश व खाली अनंत प्रशांत वाळवंट. अत्यंत स्वच्छ व ताजी हवा. सांगतात की या भागात मनाची विशिष्ट स्थिती होते. एकदम भावना उचंबळतात. बुध्दीला, मनाला एकदम चालना मिळते. अनंत शांती. तेथे तुमच्याशिवाय कोण आहे ? तुमच्या पावलांशिवाय कोणाची पावले ऐकू येणार ? मधून एखादा गरूड दिसेल, एखादे पहाडी जनावर, शेळीमेंढी दिसेल. केवळ असीम शांती व स्तब्धता. जणू अपार परमेश्वराच्या सान्निध आहोत असे वाटते. मुक्या अनंततेजवळ आहोत असे वाटते. एक प्रकारचा अननुभूत आनंद हृदयात उसळतो असे म्हणतात. वृत्ती उत्तेजित होतात. प्रतिभेला पल्लव फुटतात. बांधून ठेवलेल्या, कोंडलेल्या मनोवृत्ती एकदम मुक्त होतात. त्या उड्या मारू पाहतात. शरीरात व मनोबुध्दीत एक प्रकारची विद्युत संचरते, बुध्दीस चालना, चोदना मिळते. अरबांच्या मनावर हे सारे परिणाम होत असतील. त्यांच्या प्रतिभाशाली व कल्पनामय मनात किती भाव उसळत असतील ! कसे थरारत असतील ! या अप्रकट मुक्या भावना मुहंमदांच्या 'अल्लाहु अकबर'(अल्लाह सर्व श्रेष्ट आहे) या धीरगंभीर वाणीतून प्रकट झाल्या व जगभर पुढे गेल्या.

या अंतर्गत भागात राहणा-यांना बेदुइन (बद्दू) म्हणत. या बेदुइनांची निसर्गाशी सतत लढाई. कडक वारे सुटत, प्रचंड वादळे होत, वाळूचे डोंगर आकाशात उडत व खाली कोठे पडत. अशा परिस्थितीमुळे विशिष्ट गुण बेदुइनांच्या अंगी आले. शेती करणारा एकाच ठिकाणी राहतो; परंतु बेदुइनांना शेती कोठली? ते सदैव भटकत. या भटक्या बेदुइनांचेही दोन प्रकार असतात. शेळ्ययामेंढ्या वाढवणारे व उंट वाढवणारे. शेळ्यामेंढ्या चारणारे वाळवंटात खूप आत जाऊ शकत नाहीत; ते कुरणाच्या जवळ, पाण्याच्या आसपासच राहत; परंतु उंटवाले वाळवंटात आत संचार करीत. अरबी बेदुइन हे विशेषत: उंट पाळणारे होते. उंटांना डोंगरावरचा गवतपालापुरा पडत नाही. वाळवंटातील झाडेच त्यांचे खाद्य. तसेच खारे मचुळ पाणी त्यांना अधिक मानवते. हिवाळयाच्या दिवसात अंगात ऊब राहावी म्हणूनही उंटाली वाळवंटात भटकावे लागते. विताना उंटिणीला वाळवंटाची जमीन हवी. उंटणीला जशा प्रसववेदना होतात तशा क्वचितच कोणा प्राण्याला होत असतील ! उंटिणीला प्रसूतिकाळी उबेची फार जरूर असते. म्हणून उंट वाढवणारे बेदुइन अंतर्गत भागात राहतात. माणसांपासून दूर रहातात. तेही कमी माणसाळलेले व स्वैर असे त्यामुळे होतात. किना-याजवळ किंवा सुपीक भागात जे अरब राहत त्यांचे जीवन बेदुइन कमी मानी. वाळवंटातील स्वच्छंदी स्वतंत्रतेचेजीवन त्याला प्रिय वाटे. आजकालच्या जीवनात किती गडबङ सारी

धावपळ. ती धावपळ ज्ञानार्थ असो वा धनार्थ असो. शांती तिळभर नाही. अखंड जोजार सुरू. सारा संसार जणू छातीवर येऊन बसतो, मानगुटीस बसतो. अशा वेळेस आपण त्या बेदुइनांचे मुक्त जीवन जरा मनात कल्पू या. बेदुइनांचे जीवन म्हणजे एखाद्या अल्लड मुलासारखं जीवन. स्वच्छंद, हेतुहीन, समाधानी, आनंदी, संपूर्ण जीवन. स्वत:च्या साध्या जीवनात त्याला अपार समाधान असे, तो सुखी असे; कारण तो यथार्थपणे जगत असे. त्याला अधिकाची इच्छा नसे. त्याला केवळ एकच भीती असे. ती म्हणजे मरणोत्तर जीवनाची! हा विचार आपल्या मनातून तो पार दवडी. जगात कोणाचीही त्याला भीती वाटत नसे. ना मानवाची, ना संकटाची. उद्याचा विचार तो करीत नसे. जी जी परिस्थिती येईल तिचा पुरेपूर उपभोग घ्यायला तो तयार असे. संकट आले, सहन करी. सुख आले भोगी. आज या क्षणी जे सुख आहे ते भोगू दे. जीवनाचा पेला त्यातील थेंबन्थेंब पिऊदे. त्या सुखाच्या क्षणी दुसरे विचार मनात आणून ते सुख तो मलिन करीत नसे. बेदुइन कीर्तीचा व विजयाचा भुकेला असे; परंतु ही महत्त्वाकांक्षा त्याला सचिंत करीत नसे. दु:खचिंतांचे ढग त्यामुळे मनात नसत जमत. त्याचे ते वाळवंटातील जीवन, परंतु ते एक प्रकारे परिपूर्ण असे. उत्साही,संस्फूर्त व सामर्थ्यसंपन्न असे असे. त्याचे ते जीवन वासनाविकारांचे असे; परंतु त्यातही एक प्रकारची आनंदी व समाधानी वृत्ती त्याची असे. जीवन हे जगण्यालायक आहे अशी त्याचे नि:संदिग्ध खात्री असे.

अशा ह्या त्याच्या जीवनातही ध्येय असे. वाळवंटाचा तो अस्सल पुत्र. तो एखाद्या पुढे आलेल्या डोंगराच्या टोकाखली छायेत पडून नसे राहत. तो शूर, साहसी, अतिथ्यशील असा असे. स्त्रियांच्या रक्षणार्थ सदैव सिध्द असे. आपल्या जातिजमातीसाठी स्वत:चे सर्वस्व द्यावयास तो तयार असे. निराश्रितांस आश्रय द्यावयास, गरजवंतास साहाय्य करावयास तयार असे. त्याची वाणी मोठी गोड, वक्तृत्वपूर्ण व अस्खलित अशी असे.

या अरबांची संस्कृती भटकी होणे अपरिहार्य होते. लोकसंख्या वाढे, परंतु झरे थोडेच वाढत. भटके जीवन त्यांच्यावर लादले जाई. निसर्गाशी झगडणा-या या लोकांत काही सामाजिक व काही वैयक्तिक गुण आले. संकटांशी सदैव झगडायचे असे. त्यामुळे त्यांच्यात ऐक्य असे. मालमत्ता व प्राण नेहमीच धोक्यात. नेहमीच असुरक्षितता. यामुळे ही एकजूट अवश्य असे. परिस्थितीशी तोंड देण्यासाठी ऐक्याने वागणे भाग पडे; परंतु हे एकटे त्या त्या जातिजमाती पुरते असे. इतरांचा त्यांना विश्वास नसे. जो आपल्या जथ्यात नाही त्याचा भरवसा कसा धरावा ? त्याचा देशाभिमान म्हणजे विशिष्ट जातिजमातीचा अभिमान. त्यांच्या सामाजिक जीवनाचा आदि व अंत म्हणजे त्याचा जथा ! परंतु या गोष्टीचाविकास होऊलागला म्हणजे अनेक चमत्कार होतात. भाऊभावाशी भांडतो, परंतु भावासाठी इतर सर्वांशीही भांडावयास तो उठतो. शेजा-याजवळ भांडेल, परंतु शेजा-यासाठी सा-या जगाजवळही भांडेल. यामुळे अरबांत एक प्रकारचे बळकट अभेद्य कवचही होते, ऐक्याचे कवच ! भांडणातही ऐक्य होते. ते एकमेकांजवळ भांडत, एकमेकांसाठी प्राण द्यायालाही सिध्द असत ! यामुळे नकळत देशाभिमान त्यांच्या अंगी आला तो त्यांना माहीत नव्हता. मुहंमदांनी त्याची त्यांना जाणीव करून दिली. अरबांच्या वैयक्तिक जीवनातही सामुदायिक जीवनाला महत्त्व होते. आपल्या जातिजमातीशही निष्ठावंत राहणे हे महान ऐक्यबंधन असे. बेदुइनांची अनेक कुळे झाली

होती. अनेक कुळांच्या निरनिराळया जाती झाल्या होत्या. आपल्या कुळाचे व आपल्या जमातीचे बळ कमी होऊनये म्हणून ते फार जपत. माझ्या कुटुंबांतील एखादा मारला गेला तर माझे बळ कमी होऊ नये म्हणून ते फार जपत. माझ्या कुटुबांतील एखादा मारला गेला तर माझे बळ कमी होऊन शत्रूचे वाढणार नाही का ? म्हणून बदला घेतलाच पाहिजे. बेरीज, वजाबाकी सारी झाली पाहिजे ! या वृत्तीमुळे वांशिक भांडणे, द्वेषमत्सर सदैव असत. ही भांडणे थांबविणे कठीण होई. कारण आपापल्या जातीचा व कुळाचा त्यांत अभिमान असे. कोणा एकाला इजा झाली, अपाय झाला तर सारी जमात सूड घ्यावयास उठे. जमातीतील कोणी एकाने अपराध केला असला तरी सारी जमात त्याची जबाबदारी घेई. एरव्ही मित्रत्वाने राहणा-या या जातिजमातींत कधी कुठे लहानशी ठिणगी पडेल व वणवे पेटतील त्याचा नेम नसे. परंतु आपतेष्ट होता होईतो एकमेकांवर उठत नसत. जवळच्या नातलग कुळांपासून अपाय झाले तरी सोशीत. " तेही आमचेच भाऊ. चांगल्या मार्गावर येतील. सद्बुध्दी येईल. पूर्वी चांगले वागत तसे पुन्हा वागू लागतील"असे म्हणत. जातीसाठी दारिद्र्य पत्करणे, मरण पत्करणे, याचा अभिमान बाळगीत.

त्यांच्या त्यांच्या जातिजमातीचा पुढारी असे. त्याचे म्हणणे सारे मानीत. परंतू हे संबंध मोकळे असत. त्यात दास्याची यत्किंचितही छटा नसे. एक तर अरब फार श्रीमंत नसत. एकाने मरावे व दुस-याने सुखात लोळावे इतकी विषमता त्यांच्यात नव्हती. त्यांच्यातील श्रीमंत म्हटला म्हणजे त्याचा तंबू जरा नीटनेटका असे, पागोटे जरा नीटनेटके असे, त्याचा एखादा सुंदर उमदा घोडा असे. परंतु समाजावर आपली सत्ता लादील इतकी श्रीमंती कोणाची नसे. त्याच्यापासून समाजाला धोका नसे. पुढा-यांत व त्यांच्यात जो संबंध असे तो सन्मान्य असे. शेजा-याजवळ, मित्राजवळ जितक्या मोकळेपणाने बोलावे तितक्या मोकळेपणाने तो आपल्या नेत्याजवळही बोले. शेजा-याची जशी भीती वाटत नसे तशी पुढा-याचीही. बेदुइनाची ही जी स्वतंत्र वृत्ती ती परिस्थितीजन्य होती. एका कवीने म्हटले आहे -

" स्वातंत्र्य हे पहाडांवर फुलते. समुद्रावर फुलते, " आपण त्यात वाळवंटेही घालू. वाळवंटातही ते फुलते. अरबस्थानात जीवनक्रमही इतका तीव्र असे की प्रत्येक मनुष्य स्वत:चा विचार करी, स्वाभिमान-स्वतंत्रता हे गुण त्यामुळे वाढीस लागले. बेदुइन आपल्या मित्रांशी किंवा जमातीशी गोडीने वागे; परंतु स्वेच्छेने वागे. त्यात बळजबरी, सक्ती नसे. तो एक प्रकारे स्वतंत्रतेचा व समानतेचा भोक्ता असे. जो नेता असे, तो गुणांमुळे असे. जो गुणाने व कर्तृत्वाने अधिक त्याला मान देत. वयालाही ते आदरीत. म्हाता-यांच्या हाती सूत्रे देणे सोयीचे पडे. म्हाता-यांविषयी आदर असल्यामुळे तरूणांतील वैर कमी होई, स्पर्धा, मत्सर थांबे. म्हाता-यांना मान दिला जाई तो त्यांच्या अनुभवासाठी, त्याची उपयुक्तताही असे म्हणून; म्हातारा मोठा बुध्दिप्रधान असे, साधकबाधक प्रमाणे मांडी म्हणून नाही. अर्थात वयाबरोबर पात्रताही पहिली जाई. तोच वडीलमाणूस पुढारी मानला जाई, जो न्यायासाठी, शौर्यधैर्यासाठी प्रसिध्द असे. लोक त्याला पुढारी मानीत म्हणून तो पुढारी. काही विशिष्ट मिरासदारीच्या हक्कांमुळे तो पुढारी बनत नसे. अगदी मोठ्यातील मोठ्या माणसालाही अरबस्थानात 'तू'च म्हणत, आदरार्थी 'आपण' किंवा 'तुम्ही' असा प्रयोग नसे. पुढा-यास नावाने हाक मारीत.

या पुढा-याला सारी जमात मान देई. शेख शब्दाचा अर्थ वृध्द व मुख्य असा आहे. जर पुढारी निवडणे कठीण झाले तर चिठ्ठ्या टाकीत. हा पुढारी म्हणजे जणू राजा. परंतु स्वत:च्या जबाबदारीवर तो विशेष काही करीत नसे. तो मित्रांचा सल्ला घेई कुटुंबातील मंडळींस विचारी. जमातीतील लोकांची भेटगाठ घेई. मगच निर्णय देई. त्याच्याबरोबर शरीरसंरक्षक नसे. उच्च व नीच दोघांजवळ तो बसे, बोले.

ती ती जातजमात आपल्या जातिजमातीचा अभिमान बाळगी. आपल्या जातीचे, कुळाचे नाव वाढावे असे प्रत्येकास वाटे. आपल्या जमातीच्या पराक्रमाचे पोवाडे सर्वत्र जावेत असे त्यांना वाटे. औदार्याने, शौर्याने, आतिथ्याने, वक्तृत्वाने माझी जात श्रेष्ठ अशी व्हावी, अशी प्रत्येक बेदुइनाला इच्छा असे. जातीचा जो मुख्य असे. त्याच्या वैयक्तिक कीर्तीभोवती त्याच्या कुळाचीही कीर्ती असे. अमक्या शूर व आतिथ्यशील कुळातला असे म्हणत. बेदुइनांच्या सर्व सद्गुणांत स्वाभिमान राजा होता. या स्वाभिमानाच्या त्यांच्या सद्गुणांत अनेक गुणांचा अंतर्भाव असे. या अनेक गुणांमुळे स्वाभिमान ही वस्तू बने. शौर्य व आतिथ्य हे दोन सर्वांत महत्त्वाचे गुण.

एक कवी म्हणतो - " अरब देईल तेव्हा पाऊस पाडील, हल्ला करील तेव्हा सिंहासारखी उडी घालील ! "

अरब योध्दा अपार शौर्याची मूर्ती असे. कित्येक दिवस तो खोगीरावर काढील, अंगात जाड, जड चिलखत घालून शत्रूच्या पाठीवर राहील, आपल्या नातलगास मारणा-याचा शोध करीत राहील किंवा कधी श्रीमंत व्यापा-यांच्या कारवानांवर हल्ले करील. लूटमार हा त्याचा मुख्य धंदाच असे. त्याची जमीन त्याला अन्न देत नसे- खजूर हीच त्याची भाकरी. म्हणून घासदाणा लुटणे प्राप्त. निसर्गाने ही भामटेगिरी त्याला शिकविली ! त्याच्या आर्थिक जीवनामुळे परस्पर विरोधी गुण कसे आले पहा. सदैव गरज असे म्हणून हाव व लोभ त्याच्या ठायी असत. हाव असणे हा गरिबाचा सहजधर्म आहे. हाव असली म्हणजे चढाई करणे हा गुणही येतो. परंतु अरबांत हावेबरोबर आतिथ्यही आहे. गरिबीमुळे हाव आली आणि एकमेकांच्या कष्टमय जीवनाची जाणीव असल्यामुळे आदरातिथ्याची वृत्ती बळावली. तो आज संकटात आहे. उद्या माझ्यावरही तसा प्रसंग येईल. तो आश्रयार्थ आला आहे, उद्या मला आश्रय मागावा लागेल. या जाणिवेने बेदुइन आतिथ्यशील झाला. अशा निराधारास ते आधी अन्न देत व मग स्वत: जेवत. त्याला कपडे देत, त्याच्या गरजा भगवत. धंद्यासाठी किंवा दुर्दैवामुळे ज्याला एका स्थानाहून दुस-या स्थानी जावे लागे अशा मित्रहीन माणसास अकारण ते आधार देत.

अरब लुटालूट करी. परंतू लुटालुटीतही त्याने मर्यादाधर्म ठेवला होता. तो उगीच मारहाण करीत नसे. शक्यतो हिंसा टाळी, रक्तपात टाळी. "मी या व्यापा-याचे ओझे फक्त कमी करतो" असे म्हणे ! आणि ज्यांना लुटावयाचे तेथे स्त्री असल तरी बेदुइन कितीही आडदांड व उच्छृंखल असला तरी स्त्रियांशी तो अदबीने वागे. तो स्त्रीवर हात टाकीत नसे- तो म्हणेल, "तुमचे नेसूचे लुगडे किमतीचे आहे. ते मला हवे आहे. तुम्ही दुसरे नेसा. मी दूर जातो." आणि तो दूर जाऊन पाठ करू उभा राहील. इस्लामपूर्व अरबी कवितांतून या लढायांची, प्रसंगांची वर्णने आहेत. समोरासमोर कसे लढलो, पाठलाग कसे केले, शत्रूही कसा शूर होता सारे वर्णिलेले असे. अशा युध्दात दयेचा लेश नसे. द्वेषाची पराकाष्ठा असे. शत्रूपासून उदारतेची व दयेची अपेक्षा करणे लाजिरवाणे मानीत. स्वत:ही दया दाखवीत नसत.

जखमी झालेल्यांसही ठार करीत. त्यांची कुटुंबे गुलाम करीत.

बेदुइन फार रागीट असे. जपानी मासे खाऊन फार चिडखोर बनले आहेत. जरा काही झाले तरी त्यांना झोंबते. त्यांना काही सहन होत नाही. बेदुइन उंटाचे मांस खाऊन रागीट झाले. उंट कसा दिसतो? भेसूर, दुर्मुखलेला. बेदुइन स्वत:च्या अपमानाचा बदला घेतल्याशिवाय कधी राहत नसे. तसे तो न करील तर कायमची अपकीर्ती होईल आणि बेदुइन रागावत, संतापतही पटकन. त्यामुळे कोण कुणाचा कधी अपमान करील त्याचा नेम नसे आणि मग ती वैरे पेटत. अरबांचा पूर्वेतिहास म्हणजे वर्षानुवर्षे चाललेल्या वैरांचा इतिहास. सूड, खून यांचा इतिहास.

बेदुइन कुलाभिमानास फार जपे. आपला घोडा जातिवंत हवा, उंट चांगल्या रक्ताचा हवा, असे त्याला वाटे. त्याचप्रमाणे स्वत:च्या अंगातील रक्ताचाही तो अभिमानी असे पूर्वजांची नावे लक्षात ठेवील. त्यांची सत्कृत्ये वर्णील. अशा कुळातील मी, अशी प्रतिष्ठा मिरवील. माझ्या कुळाहून तुझे कूळ थोर असेल तर सिध्द कर असे आव्हान देईल. अशा या आव्हानातूनही लढाया पेटत. या कुलाभिमानामुळे जसे द्वेषमत्सर पेटत, त्याप्रमाणे सद्गुणही येत. बेदुइनची श्रेष्ठता संपत्तीमुळे नसे. तो आळसात, विलासात लोळे म्हणून नसे. वैयक्तिक गुणांवर त्याचा मोठेपणा असे. श्रेष्ठ कुळात जन्मलो असे म्हणणा-यावर जबाबदारीही असते. आपल्या कुळाची कीर्तिपरंपरा चालवण्यासाठी सा-या जगाशी लढण्याची त्याला हिंमत ठेवावी लागे. त्या बरोबरच तो आतिथ्यशील व उदार असे. जो कोणी आश्रयार्थ येईल, हाक मारील त्याला मदत करी. शत्रूचा हल्ला आला तर प्रथम आपल्या तंबूवर तो यावा, असा तो आपला तंबू उभारी. वाटसरू आला तर तोही प्रथम आश्रयार्थ आपल्या तंबूत यावा, असेही त्याला वाटे. रात्रीच्या वेळी आपल्या तंबूजवळ तो आगट्या पेटवून ठेवी. हेतू हा की वाळवंटात भटकणा-यास मार्गदर्शन व्हावे, त्याने आपल्याकडे यावे. " मी माझ्यामनावर माझे संरक्षण सोपवीत आहे. " असे जर आश्रयार्थ आलेला म्हणेल तर स्वत:च्या देहाचा मुडदा पडेपर्यंत त्याचा तो सांभाळ करील. अतिथीस आश्रय न देणे याहून दुसरे नीच कर्म नाही. अतिथीला क्वचितच कोणी फसवी आणि असे जो कोणी करी त्याच्या कुळाला कायमची काळोखी लागे.

एक कवी म्हणतो - " त्या तंबूत आमचा मोठा पुढारी आहे. त्याचा शब्द रक्षणस पुरेसा आहे. थोर हृदयाचा तो आहे. रात्रीची वेळ असावी. वादळ असावे. कोणी तरी संक्टाशी झगडत अशा वेळी या तंबूजवळ येई. तो पुढारी आपला तंबू त्याच्या हवाली करी. होय, खरोखरच तो पुढारी उदार व थोर असे. पाठलाग करणारा शत्रू आला तरी ज्याला संरक्षण दिले त्यचे रक्त त्या पाठलाग करणा-या शत्रूस मिळत नसे."

पुढील मुस्लिम सम्राटांच्या अवनत व अध:पतित काळातही हे गुण कधी कधी दिसत. एकदा एका सुभेदाराने काही कैद्याची कत्तलीसाठी रवानगी चालवली होती. एक कैद्याने पाणी मागितले. सुभेदाराने देववले. तो कैदी पाणी पिऊन सुभेदाराला म्हणाला, " मी तुमचा अतिथी झालो. तुम्ही पाणी दिले. अतिथीला का आता मारणार ?"त्या सुभेदाराने त्याला मुक्त केले ! आतिथ्यात संरक्षणाची हमी गृहीतच असे आणि वचनभ्रष्टता अरबास माहीत नाव्हती. त्याने या बसा म्हटले की संरक्षण मिळाले ! तो शब्द म्हणजे विश्वासाचा, साहाय्याचा, संरक्षणाचा, अचल निष्ठेचा अमोल ठेवा असे. ❖ ❖ ❖



अरबी आतिथ्यास सीमा नसे. जवळ असेल ते सारे पाहुण्यांसाठी ठेवायची अरबी नीती होती. आतिथ्यात उणीव उरत असेल तर दूध देणारी उरलेली शेवटची उंटीणही तो मारी व रसोई करी. हातिमताईच्या गोष्टी जगप्रसिध्द आहेत. ताई कुळातील तो हातिम अतिशूर, अतिउदार होता. तो कवीही होता. त्याचे जीवनच काव्य होते. आतिथ्याचा तो आदर्श होता. एकदा मोठा दुष्काळ होता. हातिमही अन्नान्नदशेला पोहोचला होता. एकदा संबंध दिवसात त्याच्या कुटुंबातील मुलामाणसांच्या पोटात काही अन्न गेले नव्हते. रात्रीच्या वेळेस गोष्टी सांगून त्याने मुलांना रमवले. ती बाळे झोपी गेली. गोष्टी सांगण्यात अरबांची बरोबरी कोणी करू शकणार नाही ! मुले निजल्यावर पत्नीनेसुध्दा भूक विसरून जावे म्हणून तिच्याशी तो गोष्टी विनोद करीत होता. इतक्यात तंबूजवळ कोणीतरी आले.

"कोण आहे ? "

"मी तूमचा शेजारी. मुलांना आज खायला काहीही मिळाले नाही. लांडग्याप्रमाणे वखवखली आहेत. तुमच्याजवळ मदत मागायला आंलो आहे."

"तुझी मुले घेऊये." हातिम म्हणाला.

तो मनुष्य गेला.

"बायकोने विचारले, "काय देणार, काय करणार ?"

"थांब, गडबड नको करू." तो म्हणाला.

"स्वतःची मुले उपाशी निजवलीत. दुस-यांना काय देणार ?"

"बघ आता."

असे म्हणून हातिम आपला घोडा घेउन आला. तो घोडा जातिवंत म्हणून नामांकित होता. अतिचपल व अतिसुंदर. त्या घोड्यावर हातिमचे अती प्रेम. स्वतःच्या मुलाबाळांसाठी तो घोडा त्याने मारला नाही. परंतु आता त्याने घोडा मारला. रस्सा तयार झाला. शेजारी, त्याची पत्नी, त्याची मुले सारी जेवली.

"आपल्या तळावरचे सारेच उपाशी आहेत. त्यांनाही बोलवा." तो म्हणाला. इतरांनाही बोलावले. सकाळी घोड्याची फक्त हाडे शिल्लक होती ! हातिमने सर्वांना जेवू घातले. परंतु त्याने एक घासही घेतला नाही. अंगरख्यात लपेटून तंबूच्या एका कोप-यात तो बसला होता.

इस्लामपूर्व अरबांचा हातिम हा परमोच्च आदर्श होता. तो युध्दात शूर होता. परंतु वैराने औदार्याला तो नष्ट करीत नसे. दुस-याचा प्राण न घेण्याची त्याने शपथ घेतली होती. प्राणांतिक घाव त्याने कधी घातला नाही. तो अति विनयी असे तरी सदैव विजयी होई. तो पुष्कळ लुटून आणी व राजाप्रमाणे सर्वांस वाटून देई. औदार्यामुळे व स्वत:च्या वचनपालनामुळे त्याच्यावर कधी संकटे येत. परंतु तो तत्तवच्युत झाला नाही. कोणी काही मागितले तर नाही म्हणयचे नाही असा त्याचा नियम असे ! एकदा एका द्वंद्वयुध्दात प्रतिस्पर्ध्यास त्याने नि:शस्त्र केले. तो वैरी म्हणाला, "हातिम, तुझा भाला मला दे." हातिमने भाला फेकला. स्वत: नि:शस्त्र होऊन तो उभा राहिला. परंतु तो प्रतिस्पर्धीही तसाच उदार व दिलदार हाता म्हणून बरे. नाही तर हातिम मरता. हातिमचे वणिक-वृत्ती व्यवहारी मित्र त्याच्यावर रागावले. हातिम म्हणाला, "त्याने देणगी मागितली. ती का मी नाकारू ?" जे कैदी गुलाम होत त्यांची खंडणी तो भरी व त्यांना मुक्त करी ! एकदा हातिम प्रवासात होता. खंडणी भरण्याची साधने त्याच्याजवळ नव्हती. एका कैद्याने 'मुक्त करा' प्रार्थना केली. त्या गुलामाच्या धन्याजवळ हातिम कैदी म्हणून राहिला, तो गुलाम मुक्त झाला ! पुढे हातिमच्या नातलगांनी खंडणी पाठविली व तो सुटला.

आणि असा हा शूर, दिलदार, उदार हातिम कवीही होता. अरबी गुणांचा पेला त्याच्या जीवनात काठोकाठ भरला होता. त्याच्या काव्यातही त्याच्या जीवनाची उदात्तता दिसते. तारूण्यात तो काव्याचा फार भोक्ता होता. कवीचे आदरातिथ्य करी. एकदा आजोबाने या उधळया नातवास उंट चारायला ठेवले. उंटाचे कळप चारीत हातिम बसला होता आणि एक काफिला जात होता. त्यात तीन कवी होते. ते अल्-हिराच्या राजाकडे जात होते. हातिम त्या कवींना म्हणाला, "येथे थांबा, विश्रांती घ्या." त्याने प्रत्येकासाठी एकेक उंट मारला. एकच उंट पुरे झाला असता, परंतु आतिथ्य व औदार्य दिसावे म्हणून तीन मारले! ते तिघे हातिमची व त्याच्या कुळाची कीर्ती काव्यात गाऊ लागले. ते स्तुतिस्तोत्र ऐकून, कुळाच्या गौरवाचे ते महागान ऐकूण हातिमला कृतार्थ वाटले. त्याने त्या प्रत्येकाला शंभर शंभर उंट दिले ! आजोबा आले तो उंट नाहीत !

"कोठे आहेत उंट ?"

"आजोबा, तुमच्या कुळाभोवती सदैव कीर्तिवलय चमकत राहावे म्हणून ते उंट मी दिले. आपल्या कुळाच्या मस्तकासाठी कीर्तीचा शाश्वत मुकुट घेऊन त्याचा मोबदला म्हणून ते उंट मी दिले. कायम टिकणारा मुकुट ! आपल्या कुळाचे ते गुणगान सर्व अरबस्थानभर जाईल. सर्वांच्या ओठांवर ती गाणी नाचतील !"



५

# अरबजीवनातील काव्य



अरबांत शिक्षण फारसे नव्हते. मध्य अरबस्थानातील अरब तर अगदीच अडाणी, अशिक्षित असे. परंतू पोवाडे त्याला आवडत. त्याला वर्णने आवडत. तो आलंकारिक बोले, बेदुइनाच्या भाषेत जोर असे. ओज व माधुर्य असे. एक प्रकारची अर्थपूर्णता व सुटसुटीतपणा असे. साहित्य फारसे नव्हते तरी भाषा वक्तृत्वपूर्ण व समृध्द होती. बेदुइन हा भावानोत्कट असल्यामुळे सुंदर व जोरदार शब्दांचा भोक्ता होता. त्याची साधी भाषा, परंतु ती फार काव्यमय बनली. सामाजिक व लढाऊ वृत्तीचे उत्कट प्रतिबिंब तिच्यात होते. भाषा विकसित झाली तरी लिखित वाड्मय फारसे नव्हते. ज्ञानाची अशी साधना अद्याप नव्हती. अरबी स्वभावाशी जुळत अशाच साहित्याच्या शाखा वाढल्या. काव्य, अलंकार, वक्तृत्व यांची वाढ झाली. सुंदर शब्दांनी वेडे होणारे अरबांसारखे लोक पृथ्वीवर दुसरे नाहीत ! ते शब्दब्रह्माचे, शब्दसौंदर्याचे उपासक होते. शब्दांच्या छटा छटा ते बघत. भाषा नाना अर्थ प्रसवणारी झाली. प्रभावी वक्तृत्वाला ही भाषा फार उपयोगी पडे. पराक्रमांचे पोवाडे गाता यावेत म्हणून काव्याचा अभ्यास सुरू झाला. काव्य म्हणजे प्रचाराचे एक साधन होते. जीवनाचे व भावनांचेही तत्द्वारा प्रकटीकरण. अरबी काव्यात उदात्त, गहनगूढ असे काही नसे. जीवनाची मरणाची, सोऽहं कोऽहंची मीमांसा नसे. आपले कूळ, कुटुंब, जात यांच्या गौरवार्थ ते असे. त्यांच्या मनात तात्त्विक संशय नव्हते. नसत्या कल्पना त्याला अद्याप सतावत नव्हत्या - तो निसर्गाचे संतान होते. वाळवंटाचे लेकरू होते. प्रगल्भ संस्कृतीचा तो पुत्र नव्हता. बुध्दीची फारशी वाढ झाली नव्हती. म्हणून गंभीर वाडमय त्याच्याजवळ नव्हते. इतर कलांतही फारशी प्रगती नव्हती. साहित्य नाही, चित्रकला नाही. शिल्पही ओबडधोबड ! वाळवंटात दगडही नाहीत, तर शिल्प तरी कोठून येणार? सुंदर मूर्ती तरी कोण घडवणार ? काही थोड्या फार मूर्ती असत; परंतू साधे दगडच तो पूजी. थोडेसे काव्य व संगीत यांखेरीज फारसा कलाविलास त्याचा नव्हता.

अरब हा काव्यासाठी वेडा होई. सर्व जगात आपली भाषा उत्कृष्ट असे त्याला वाटे. वक्तृत्व व काव्य या परमेश्वराच्या सर्वांत थोर, उत्कृष्ट देणग्या असे तो मानी. ज्या ज्या वेळेस मोठी मेजवानी होई, समारंभ असे, किंवा मोठा आनंद असे, त्या वेळेस तीन कारणे असत. जमातीच्या पुढाऱ्यास मुलगा किंवा घोडीस शिंगरू झाले म्हणजे, किंवा एखादा मोठा कवी जातीत प्रकट झाला तर. कवीचे आगमन म्हणजे आपल्या जमातीतील वीरांचे यशोगान व वैऱ्यांचे अमर अपकीर्तिगान. तलवार व भाला यांच्यापेक्षा अधिक मोठा विजय कवीची वाणी मिळवी. ती विजयकीर्ती अरबस्तानभर जाई व एखादे मार्मिक कविवचन अरबास डोलवी. अरबस्थानातील मोठमोठे वीर स्वत: कवीही असत. त्यांची काव्यशक्ती त्यांच्या मुकुटातील मोलवान

हिरा मानला जाई. कवी असणे हे खानदानपणाचे व दिलदारपणाचे लक्षण मानीत. खलिफा उमर म्हणे, "अरबांचे खरे राजे कवी व वक्ते हे होत. बेदुइनांचे सर्व सद्गुण ते आचरतात व काव्यात अमर करतात."

प्राचीन अरब काव्य अरब जीवनांचे प्रतिबिंब आहे. या जगाच्या धांगडधिंग्यापासून अरब दूर असे. वाळवंटात असे. तेथे लहान मुलांचे अकपट जीवन तो जगे. दिलेले, देवाने व दैवाने दिलेले सुख भोगी. तो तेथील निसर्गात रमे. वाळवंटाची हवा खाई, सुंदर, सतेज, निरोगी, ताजी हवा ! वाऱ्याचे संगीत ऐके. त्याच्या काव्यात सर्वत्र वाळवंटाचा वास दरवळून राहिलेला आहे. हे काव्य भावनाप्रधान, सरळ, उत्कट आहे. तेथे गूढगुंजन नाही. आत्मानात्म नाही. जीवनातील या घटकेचा आनंद त्यात आहे. या काव्यात सृष्टीचे वर्णन आहे. सहजसुंदर, अकृत्रिम, मोकळे वर्णन ! वाळवंटातील देखावे, रात्रीच्या वेळी पहाडातून, दऱ्याखोऱ्यांतून जावयाचे रोमांचकारी प्रसंग, जेथे भुतेप्रेते, पिशाच्चे राहतात तेथून जाणे, ओसाड वाळवंटातील नीरव शांती, नि:स्तब्ध भव्य भीषणता आणि वखवखलेले लांडगे भेटणे; भर दुपारी वाळवंटात येणारी ग्लानी; वाळूचे वादळ उठून गुदमरून जाण्याचे प्रसंग; मृगजळाचे सुंदर, पण फसवे देखावे; ताडाच्या झाडांची छाया; थंडगार शीतल विहिरीजवळचा आनंद; हे सारे अरब काव्यात आहे. सृष्टिवर्णन आहे, तद्वत् लोकांचे जीवनाही आहे. धनगरांची शांत, स्वस्थ जीवने, वीरांची रोमहर्षक कृत्ये, युध्दे, लुटालुटी, पाठलाग, सूड, मैत्री, प्रेम, प्रतिस्पर्धी जातिजमातीवरची विडंबनात्मक काव्ये, स्वजातीयांची महिम्नस्तोत्रे, मृतांविषयीची शोकगीते, असे हे प्राचीन अरब काव्य आहे. वस्तुस्थितिनिदर्शक, अकृत्रिम आहे. बालसदृश वृत्तीच्या लोकांचे हे काव्य आहे. ज्यांच्या डोक्यात जीवनाची गूढे अद्याप शिरली नाहीत अशा अकपट अल्लड वृत्तीच्या लोकांचे हे काव्य आहे. त्यांच्या भाषेत वर्तमानकाळ आहे, भूतकाळ आहे, भविष्यकाळ नाही ! अरब भूत व वर्तमान काळात जगे, रमे. भविष्याची दखलगिरी त्याला नसे. या आत्ताच्या क्षणाला तो उत्कटतेने पकडतो, पूर्णतया पकडतो. त्या क्षणाच्या पलीकडे पाहण्याचे त्याला भान नसे. नद्या नशिबी काय असेल, याची त्याला काळजी नसे. भविष्याच्या चिंता वा सुंदर स्वप्ने तो मनात खेळवीत बसत नाही. तो भूतकाळाकडे बघतो. वर्तमानकाळातील मौज भोगतो. संवेदना, भावना, कल्पना यांत तो श्रीमंत होता, चिंतन व विचार यांत गरीब होता. जीवनाचा फेसाळ पेला तो भरकन पिई व रिता करी. त्याच्या भावना खोल व उत्कट असत. परंतु भूतकाळाकडे पाहून अज्ञात भविष्याकडे नजर फेकणाऱ्या विचारप्रधान युगाची त्याला अद्याप तादृश कल्पना नव्हती. हे अरब काव्य जीवनापलीकडे उडडाण करीत नाही. अर्थगंभीर नाही; परंतु ते तेजस्वी, जोरदार आहे. ते सजीव आहे, उदात्त आहे. खरे व उत्कट आहे. स्वच्छंद व भरपूर आहे.

अक्काज येथे सर्वांत मोठी यात्रा भरे. पवित्र मोहरम महिन्यात ही यात्रा भरते. या वेळेस देवाचा तह असे. त्या महिन्यात रक्तपात करायचा नाही, सूड घ्यायचा नाही. त्या महिन्यात भांडणे विसरायची. सर्वांनी त्या यात्रेत जमायचे, तेथे साऱ्या जातिजमाती जमत. निरनिराळे कवी तेथे पोवाडे म्हणत, काव्ये गाऊन दाखवीत. ती काव्ये शत्रूवर टीका करणारीही असत. परंतु बुरखे घेऊन बसत. एकमेकांस पाहून ती काव्यें ऐकता ऐकता स्फुरण चढायचे एखादे वेळी म्हणून बुरखे घेत ते प्रतिस्पर्धी. तरीही कधी प्रकरणे हातघाईवर येत. परंतु असे फार क्वचित होई. ही यात्रा म्हणजे मोठी संस्था होती. अरबी वाड्मयाचे ते संमेलन असे. लहान मोठे कवी तेथे येत.

आपापली काव्ये म्हणत. सर्वांनाच कीर्ती नसे मिळत; परंतु मान सर्वांना मिळे. येथे कोणी अध्यक्ष नसे. तेथे व्याकरण, छंद यांच्या चर्चा होत. सूक्ष्म भेद नजरेस आणले जात. अरबस्थानातील नाना भाषाभेदांतून येथे एक सर्वमान्य भाषा बने. कुराणी भाषा येथेच तयार झाली. मुहंमदांच्या हाती ती कमावलेली भाषा आली आणि त्यांनी जग जिंकले !

ही अक्काज यात्रा केवळ साहित्य-संगीताचीच नसे. सर्व बेदुइनी सद्गुणांचा वार्षिक अहवाल जणू तेथे घेतला जाई. तेथे अरब राष्ट्र स्वत:ची जणू परीक्षा देई. स्वत:चे, राष्ट्राचे आत्मपरीक्षण केले जाई. जीवनात व काव्यात जे जे उदार व उत्तम त्याची तेथे चर्चा होई. अरबांतच नव्हे तर जगात सर्वत्रच त्या त्या राष्ट्रांचे उदात्त आदर्श त्यांच्या काव्यांतूनच प्रकट झाले आहेत.

या यात्रेत जीवनातील कर्तव्याची परमोच्च कल्पना मिळे. त्या कल्पनेचा येथे उच्चार होई. तिचे समर्थन केले जाई. ही यात्रा म्हणजे रंगभूमी, व्यासपीठ, सभागृह, वर्तमानपत्र, सारे होते ! अरबांची जणू राष्ट्रीय शाळा तेथे भरे, राष्ट्रीय विद्यापीठ उघडे. मुहंमदांनी ही यात्रा पुढे आधार्मिक कवींच्या भीतीने बंद केली. मुहंमदांनी एक नवीनच अरब राष्ट्र निर्मिले. परंतु पूर्वीचे ते अरब राष्ट्र. तेथे मुहंमदांचे इस्लामी अरब पूर्वीच्या अरबांची जात घेऊ शकणार नाहीत !



# ६

# अरबजीवनातील स्त्रीजीवन



अरबी भाषेतील म्हणींतून स्त्रियांविषयी अनुदारता व निष्ठुरता दिसून येते. विवाहबंधने नावाला असत. वर म्हणे, "मी तुला मागणी घालतो."वधू म्हणे, " मी स्वतःला तुला देते. " आणि गाठ मारली जाई; परंतु ही गाठ सहजपणे सुटे इस्लामपूर्व अरबस्थानात बहुपतित्व होते स्त्रिने तंबू सोडाला की सुटला संबंध. पुन्हा पती निवडायला ती मोकळी असे. प्रत्यक्ष ती आपण होऊन पती निवडी वा आईबापांच्या द्वारा. वाटेल तेव्हा ती सोडचिठ्ठीही देई. मलबारच्या नायर लोकांत आताआतापर्यंत अशीच चाल होती. नायर नारी अनेक पती करीत. मुलांना आपला बाप कोणता ते कळत नसे. ती आईजवळ राहत. स्ट्रॅबो म्हणतो, " अरबांची सामाईक इस्टेट असे. सर्वांत वडील तो कुटुंबाचा मुख्य. सर्वांत मिळून एक पत्नी ! तिच्याजवळ जो असे तो तंबूच्या बाहेर आपली काठी खूण म्हणून उभी करून ठेवी. ती काठी पाहून आत कोणी येत नसे."

अरबांत मातृप्रधान कुटुंबपध्दती जुनी होती. मुहंमदांनी नवधर्म दिल्यावर ती पितृप्रधान झाली. इस्लामपूर्व अरबांत स्त्रिया म्हणजे मालमत्ता मानीत ! पिता मेल्यावर मुलगा स्वतःच्या जन्मदात्या आइशिवाय इतर आयांशी लग्न लावी ! सास्वाही पत्नी होत. जोपर्यंत पत्नी माता झाली नाही तोपर्यंत ती तुच्छ मानली जाई. ती पुत्रवती झाल्यावर महत्त्वाची होई, कारण ऐक्याचे बंधन आता तिने निर्मिले. मनुष्य आपल्या पत्नी पेक्षा आपल्या मातेस अधिक मान देई. आईचा संबंध पत्नीच्या संबंधापेक्षा अधिक शाश्वत वाटे. जोपर्यंत पत्नी स्वेच्छने पत्नी म्हणून वागत आहे, तोपर्यंत पती हा तिचा धनी असे. ती जणू त्याची मिळकत दासी. तिने त्याची आज्ञा पाळलीच पाहिजे. तिला ऐकायचे नसेल तर ती तसे करू शकत असे. कारण कायदेकानुन थोडेच होते ? तिचे स्वातंत्र्य मर्यादित असे, परंतु ती त्याला सोडू शकत असे. ते स्वातंत्र्य तिला असे. इतर देशांच्या मानाने तेथे अधिक स्वातंत्र्य होते. कारण मातृप्रधान कुटुंबसंस्था होती. कुटुंबाचे मूळ म्हणून मातेकडे पाहिले जाई. पित्याकडे नाही.

स्त्रियांचे काम काय ? कोणतेही धार्मिक काम त्यांच्याकडे नसे. आर्थिक व प्रजोत्पत्तीची अशी दोनच कामे त्यांची असत. पतीला घरगुती कामात मदत करणे व मुले जन्मास आणणे ही दोन कामे; धर्मिक काम नसे. कारण आत्म्यावर विश्वास नसे. पुरूषांसही आत्मा जेथे नाही, तेथे स्त्रियांना कोण देणार?

नागर अरब व वाळवंटातील बेदुइन या दोघांची स्त्रियांकडे पाहण्याची दृष्टी निराळी होती. बेदुइनांमध्ये स्त्रियांविषयी दाक्षिण्यवृत्ती होती. तो उदारतेने त्यांच्याकडे पाही. कवींच्या काव्यात स्त्रियांविषयी उदारता आहे, परंतु कवी हे जात्याच दिलदार व उदार असतात.

इतरांपेक्षा सहृदय व संस्कारी असतात. परंतु बेदुइन हा आपल्या प्रेयसीला मालकीची वस्तू मानीत नसे, तर पूजनीय देवता मानी ! अरक्षित कुमारिकांना वाळवंटी वीरांनी कसे सभ्यतेने व दाक्षिण्याने वागविले याची काव्यातून अनेक उदाहरणे आहेत. सुधारलेल्या लोकांत ध्येय व आचार यांत अंतर असते. परंतु वाळवंटातील अरबांचे तसे नसे. ध्येयानुरुप त्यांचा आचार असे. वाळवंटातील अरब महिला निराळीच होती. तिचे जनानखनी जीवन नसे. ती मोकळी असे. ती अपरिचित पुरुष पाहुण्यांचे स्वागत करी. कोणी संशय घेत नसे. ती स्वत:च्या चारित्र्यास प्राणाहून जपे. दुसरा कोणी वाली जवळ असावा असे तिला वाटत नसे. ती भित्री नसे. पुरूषांना जसे शौर्य-औदार्य, तसे स्त्रीला सतीत्व, पवित्र चारित्र्य ! त्या काळात व्यभिचार म्हणजे न धुतला जाणारा कलंक मानला जाई. पत्नी पतीला शौर्याची कृत्ये करायला प्रेरणा देई. विजयी होऊन तो येई व त्याची स्तुती करी. या स्तुतीचा अरब मोठा भोक्ता असे. अंताराची गोष्ट सुप्रसिध्द आहे. स्त्रियांच्या रक्षणार्थ जखमी झाला तरी तो उभा होता. " मी या खिंडीच्या दाराशी भाला रोवून उभा राहतो. तुम्ही जा. सुरक्षित जागी जा." स्त्रिया गेल्या आणि पाठलाग करणारे आले. भाला रोवून घोड्यावर हात ठेवून अंतारा उभा होता ! शत्रू जवळ यायला धजेना, परंतु घोडा हलला आणि त्याला टेकून उभा असलेला अंतारा खाली पडला. त्याचे प्राण आधीच निघून गेले होते. घोड्याच्या आधाराने निष्प्राण शरीर उभे होते रक्तस्त्रावाने कधीच तो मेला होता. शत्रू जवळ आले. अंताराने प्रेमाने जिवंतपणीच नाही तर मेल्यावरही रस्ता धरून ठेवला हे त्यांनी ओळखले. इस्लामपूर्व अरबांत अशा अनेक कथा आहेत. खरा अरब एकदाच प्रेम करी. तो तिच्यावर आमरण प्रेम करी. ती त्याच्यावर करी. पुढे बहुपत्नीत्वाची चाल पडली. विशेषकरून शहरात ती सुरू झाली. बहुपत्नीत्व व बहुपतीत्व दोन्ही प्रकार.

प्राचीन अरब काव्याचे जे थोडे फार नमुने आहेत, त्यातून भावनांची कोमलता आहे. अरब लोक लहान मुलींना वाळवंटात जिवंत पुरून मारीत ! सदैव चालणा-या लढायांनी पुरुषांची संख्या फार कमी होती. मुलींचे करायचे काय, हा प्रश्न असे. म्हणून अशा क्रूर रीतीने ते संख्या कमी करीत. परंतु शहरातील अरबच मुलींना अशा रीतीने मारीत. बेदुइन या गोष्टी कमी करी. कधी दारिद्र्यामुळेही त्याला असे करावे लागे. परंतु त्याला का प्रेम नसे ? एक बाप आपल्या मुलीस म्हणतो :

" माझी उमेयमा नसती तर माझ्या जिवाला कसलीच काळजी वाटली नसती. मग मी कशाचीही फिकीर नसती केली. या काळ्याकुट्ट अंधारात भाकरीसाठी मी धडपडत राहिलो नसतो. ही दगदग केली नसती. अजूनही जगावे असे का बरे मला वाटते ? कोणते कारण, कोणता हेतू ? मी गेलो तर मुलीचे कसे होईल ? तो पोरकी होईल. नातलग निष्ठुर असतात. म्हणून मला जगावे असे वाटते. तिला सोडून जाऊनये असे वाटते. मी भिकारी होईन का, सा-या संपत्तीचा नाश होईल का, असा विचार मनात येतो व मी घाबरतो. का बरे ? कारण जवळ काहीच नसेल तर माझ्या मुलीचे कसे होईल ? तिचे रक्षण हा दरिद्री पिता कसे करू शकेल ? एखाद्या ताटात मांस ठेवावे, मग त्याच्यावर सारे तुटून पडतात तसे तिच्यावर सारे तुटून पडतील ! माझी मुलगी - लाडकी उमेयमा - माझ्यासाठी प्रार्थना करते, मला उदंड आयुष्य मिळावे म्हणून प्रार्थना करते. आणि मी ती कोणती प्रार्थना करतो ? ती लाडकी मुलगी मरावी अशी मी प्रार्थना करतो ! ती मरावी म्हणून प्रार्थना ? होय. तिच्या मरणाची प्रार्थना ! कुमारिकेचा प्रेमळ व कृपाळू एकच मित्र आहे. तो म्हणजे मरण. तिला भेटायला येणा-या मृत्यूहून अधिक सौम्य व मायाळू दुसरे कोण असेल ?

असा प्रेमळ पाहुणा दुसरा कोणता भेटेल ? भाऊतिला कठोरता दाखवतील. चुलते टोचून बोलतील. तिच्या कोमल हृदयाला एकाही शब्दाचा धक्का बसू नये अशी काळजी घेणे हे माझे सर्वांत मुख्य कर्तव्य आहे."

दुसरी एक कविता पहा :

" संपत्ती जाऊन विपत्ती मला आली. मी वर होतो, आता खाली घसरलो. दुर्दैवाने सारे सारे गेले. आता अब्रू व मान यांचे धन तेवढे उरले. दैवाने माझ्या आनंदाचे अश्रूंत परिवर्तन केले. कितीदा तरी दैवाने जे जे मला दिले ते ते पाहून मी हसलो आहे. परंतु आज ?

"या मुली नसत्या तर ? मग या अनंत पृथ्वीवर माझी भाकरी धुंडीत मी स्वैर फिरलो असतो. पृथ्वीची लांबीरूंदी काही कमी नाही ! परंतु मुली आहेत ! आपली मुले म्हणजे चालती बोलती जणू आपली ती हृदयेच असतात. त्यांतील एखाद्यालाही जरी जरा कठोर वारा लागला तरी माझा डोळा झोपेला नाही म्हणू लागतो."

अशा त्यांच्या भावना होत्या. असे हे काव्य आहे. जुने अरबी काव्य.



# ७

# अरबस्थानातील परिस्थिती आणि लोकांचा स्वभावधर्म



अंतर्गत भागातील अरबांत फारसे शिक्षण नव्हते, व्यापारही नव्हता. फारसे शेतीचेही उत्पन्न नाही. शेतीचे जे काही उत्पन्न येई ते त्यांनाही पुरे पडत नसे. शेतीचा फारसा प्रचारही नव्हता. शेती नाही, व्यापार नाही. त्यामुळे धनसंचयही नाही आणि म्हणून संस्कृतीही नाही. कारण शेती, व्यापार, संपत्ती यांच्या पाठोपाठ संस्कृती येत असते. एकंदरीत बेदुइन हा फार मागासलेला होता. घोडे, उंट, गालिचे, तंबू, काही हत्यारे हीच त्याची मालमत्ता. कुरणे, झाडे, सुपीक प्रदेश ह्यांच्यावर सर्वांची मालकी असे. खाजगी मालमत्तेची कल्पना फारशी पुढे गेलेली नव्हती. त्यांच्या मालमत्तेचे द्विविध स्वरूप असे. वैयक्तिक व सामुदायिक. जी काही सामुदायिक अशी थोडीफार मालमत्ता असे, तिचे शत्रूपासून रक्षण करण्यासाठी ते सावध राहत. कारण त्यात त्याची स्वत:ची हिते गुंतलेली असत. यामुळे एक प्रकारची विशेष सामुदायिक भावना त्यांच्यात बळावली. सामुदायिक जीवनामुळे ते समुदायाकडे वळले. ती जरूरीच होती. सामुदायिक वृत्ती हा पुढे त्यांचा स्वभाव झाला.

अरबांत एका प्रकारची दत्तक पध्दती होती. एखाद्या व्यक्तीला आपल्या कुटुंबातील समजून घेत. तू माझा आजपासून भाऊ किंवा तू माझा मुलगा असे म्हणत व घेत आणि तो जणू तुमच्या रक्ताचा असा होई. त्याला इस्टेटीचा वारसाही मिळे. कधी कधी सबंध जातीही दुस-या जातिजमातीत अशा घेतल्या जात! एखादे कूळ, जमात जर दुबळी झाली, त्यांच्यात कमी लोक उरले, दारिद्र्य आले, संरक्षण कठीण झाले तर दुस-या प्रबळ व मातब्बर जमातीत ते प्रवेश मागत. जी जमात सुप्रसिध्द असे, जिचा लौकिक असे तिच्यात जात. अशा प्रकारे व्यक्ती व जमाती दुस-यांत समाविष्ट होत.

कोणत्याही देशातील लोकांना काही तरी ऐक्यबंधन लागते. त्या त्या देशाच्या परिस्थित्यनुरूप हे बंधन निरनिराळ्या स्वरूपाचे असते. कोठे भूमीचे बंधन असते, कोठे धर्माचे, कोठे वंशाचे-कुळाचे तर कोठे भाषेचे; कोठे आर्थिक तर कोठे अन्य एखादे. या बेदुइनांना कोणते बंधन ? त्यांना ना जमीन, ना एक धर्म. भाषेचे व जातीचे हेच एक त्यांना बंधन होते. आपले कूळ, आपली जमात हेच बंधन. मामेभाचे, पुतणे, सगेसोयरे, भाऊ या सर्वांची मिळून एक जमात होई. स्त्रियांना महत्तव असल्यामुळे मामाचे महत्त्व फार असे. भाऊ आपल्या बहिणीच्या पतीला मदत करायला सदैव सिध्द असे. माहेरच्या, आजोळच्या मंडळींचा नेहमी आधार असे.

अरबांची सामाजिक संघटना अशी असे. एकाच कुळातील अनेक शाखा मिळून एक फखिधि बने, अनेक फखिधि मिळून एक बनु बने, अनेक बनु मिळून एक इम्रा बने; अनेक इम्रा मिळून एक कबिला

बने, अनेक कबिले मिळून एक शोब बने.

अशी ही रचना होती. दोन फख्रिधि जरी एकाच बनूमधील असल्या तरी त्यांच्या अलग शाखा एकमेकांशी भांडत. फख्रिधींची दोन कुळे दुस-या फख्रिधींच्या दोन कुळांशी भांडत. म्हण अशी होती की, " मी व माझा भाऊ माझ्या चुलतभावविरूध्द; मी व माझा चुलतभाऊ परक्याविरूध्द ! "अरबाला सदैव भांडण हवे असे. जर भांडण्यासाठी-लढण्यासाठी परका नसेल तर भावाजवळ भांडू लागतील. सामुदायिक मालमत्तेचे रक्षण करण्यासाठी त्याला लढाऊ पेशा पत्करणे प्राप्त होते आणि खाण्यासाठी लुटमार करी. परंतु अरबाला रक्तपाताची हौस नव्हती. आपल्या जमातीच्या लोकांची संख्या कमी होईल या भीतीने तो लढे. सूड घेण्यास प्रवृत्त होई. रक्तपात उगीचच करायचा, त्यात आनंद मानायचा अशी जी पहिली मोगली वृत्ती होती, ती अरबात नव्हती. तो स्वसंरक्षणासाठी लढवय्या बनला. शेतभात-व्यापार नाही म्हणून लुटारू बनला. लढाऊ वृत्ती हा त्याचा स्वभावच बनला. " जर बाहेरचे कोणी लढण्यासाठी नसतील तर आपसांत लढा."अशी एक अरबी म्हण आहे.

अरबांत गुलामगिरीही होती; जशी त्या काळात सर्वत्रच होती. लढाईतील कैद्यास गुलाम केले जाई. गुलामांची खरेदीविक्री होई. गुलाम म्हणजे मिळकतीचा भाग ! नवरीला आंदण म्हणून बरोबर गुलाम दिले जात. दासदासी दिल्या जात. खानदानी अरबांच्या घरात गुलाम असावयाचेच. ते घरातील चाकर. काही गुलाम लष्करी सेवाचाकरीही करीत. परंतु त्यांच्यावर फार विश्वास नसे. स्वतंत्र मनुष्याला जी शिक्षा देत त्याचा हिस्सा त्याच्या निम्मे गुलामाला देत. युद्धोत्तर होणा-या लुटीत त्याचा हिस्सा नसे त्याचा हिस्सा त्याच्या धन्याला मिळे. गुलामांचा आणखी एक विशेष प्रकार होता. त्यांना 'किनु'असे म्हणत. तो शेती करी. तो शेताबरोबर विकला जाई ! तो भूदास होता. जमीन विकत घेतना तिच्यातील झाडे विकत घेतली जात तद्वत विच्यावर काम करणारेही ते जणू जमिनीचा एक भाग, त्या जमिनीतील किडे ! रोमन साम्राज्यात असे भूदास फार होते. जुगारातही गमावून गुलाम होत. अरब गुलामकन्या वरीत, परंतु त्यांची मुले गुलामच ! जर मुले विशेष गुणांची दिसली तर तो त्यांना आपल्या कुटुंबातील मानी. फार महत्त्वाच्या कारणसाठी गुलामांना धनी स्वातंत्र्य देई. परंतु तो धन्याच्या जमातीचा राहिला पाहिजे. तो धन्याचा पक्षकार बने. अशांना मौला म्हणत. नाही केवळ गुलाम नाही संपूर्णपणे स्वतंत्र ! मर्यादित स्वातंत्र्य त्याला असे. धनी व धन्याची जमात सोडून जायचे नाही एवढेच त्याला बंधन उरे. परंतु हा मौला शब्द आता व्यापक अर्थी वापरतात. मित्र, शेजारी, पाहुणा, आप्त, प्रियकर सर्वांना हा शब्द लावतात.

मौला गुलामांचे तीन प्रकार असत. १ गुलामाला त्याच्या चांगल्या वागणुकीसाठी किंवा इतर काही कारणांनी मुक्त करणे. २ काही एक ठरीव रक्कम गुलाम देईल तेव्हा त्यास मुक्त करणे. ३ इस्लामोत्तर काळात ज्यू व ख्रिश्चन हेही एकेश्वरी मताचे असल्यामुळे या धर्माच्या लोकांना सहानुभूतीने वागवावे असे पैगंबर म्हणत. या धर्माचे जे गुलाम असत त्यांना मौला नसत म्हणत, परंतु जिम्मी म्हणत.



## ८

# त्रिखंडाशी संबंधित अरब भूमी



मध्य अरबस्थानातील अरबांपेक्षा किना-यावरचे अरब निराळे होते. समुद्र किना-याला पाण्याचा भरपूर पुरवठा असे. पाऊस पडे. जमीन सुपीक होती. व्यापारी जीवनही होते. दळणवळण दगदगीचे नव्हते. वर युफ्रातीस व तैग्रीस नद्यांच्या सुपीक भागात संस्कृती फुलल्या. सीरिया व बाबिलोनचा तो भाग फार सुधारलेला होता. इराण व हिंदुस्थान, ईजिप्त व रोमन साम्राज्य यांच्याशी या भागाचा संबंध असे. परंतु अरबस्थानातील समुद्रतटवर्ती प्रदेश वरील बाबिलोनी भागापेक्षाही जरा अधिक भाग्यवान होते. हा अरबी भाग हिंदुस्थान, इराण,आफ्रिका यांना सीरिया-बाबिलोनपेक्षाही अधिक ओढी. हा अरबी किनाराही संस्कृतीच्या भेटीचे स्थान होता. या अरब द्वीपकल्पाचे हे भाग्य होते. हिंदुस्थानचेही इतके सौभाग्य नव्हते. हिंदुस्थान युरोपपासून विभक्त होता. चीनशीही प्रत्यक्ष संबंध नव्हता. राजकीय अनुभवाच्या दृष्टीने अरबस्थानाला हिंदुस्थानपेक्षा अधिक संधी होती. लष्करी गोष्टीही अधिक शिकायला मिळत. अरबस्थानच्या किना-यावरची संस्कृती ग्रीक, रोमन, ईजिप्शियन, इराणी व हिंदुस्थानी या सर्व संस्कृतींचे मिश्रण होती. अरबस्थान सुधारलेला नव्हता असे म्हणणे चूक आहे. किना-याचा अरबस्थान सुसंस्कृत व प्रगल्भ होता. श्रीमंत व धीमंत होता.

अरबस्थानच्या उत्तरेकडच्या भागावर कॉन्सटँटिनोपलचा परिणाम होई. मेसापोटेमिया वगैरे भागावर इराण व रोमन साम्राज्य यांचा होई. दक्षिण अरबस्थानावर इराण व हिंदुस्थानचा होई. पश्चिम भागावर ईजिप्त, नाईल, युरोप, हिंदुस्थान यांचा होई. अरबस्थानाला अशी ही सुंदर संधी होती. सहाव्या-सातव्या शतकातील अत्यंत सुधारलेल्या देशांशी संबंध येण्याचे भाग्य त्यांना लाभले होते. हिंदुस्थान, युरोप व आफ्रिका या तिन्ही खंडाशी अरबांचा संबंध येई व त्यामुळे न वाढणारी प्रगती वाढली. अरबांना व्यापाराची हौस होती. कारण विषम हवेमुळे शेती कठीण. कधी कडक हिवाळा, कधी कडक उन्हाळा. कधी वर्षानुवर्षे अवर्षण पडे. तरीही अरब शेती करीत. मेसापोटेमियातील बागबगीचे, मळे त्यांनी पाहिले होते. शेतीत किफायतही चांगली होई. भटक्या बेदुइनी संस्कृतीपेक्षा ही कृषिप्रधान संस्कृती निराळी असणार. कृषिप्रधान प्रदेशात स्थिर स्वरूपाच्या संस्था उदयास येतात. समुद्रकिना-यालगतच्या प्रदेशात नबाबशाही अस्तित्वात आली. तेथील अरब व्यापारी बनले. ते हिंदुस्थान, चीनपर्यंत जात. संपत्ती जमू लागली. राजेशाहीच्या कल्पना सर्व देशांतून येथे येत. रोमन व इराणी साम्राज्यातून कल्पना येत. परंतु मध्य अरबस्थानातील बेदुइनांच्या लोकशाहीच्या, स्वातंत्र्याच्या कल्पनाही येत व स्फूर्ती देत. या दोन्ही विचारांचा विरोध असे; यामुळे राजेशाही कल्पनांचे घोडे फार पुढे सरकले नाही. समुद्रकाठच्या अरबांची वृत्ती जरा नबाबी होती.

सुखप्रिय व सत्ताप्रिय होती. तेथे सरदारांची, खानदानांची सत्ता होती म्हणा ना. नाही धड एक राजा, नाही धड लोकशाही. वरिष्ठ वर्गाची, श्रीमंतांची सत्ता होती. गरीब बेदुइनांत लोकसत्ता होती. गरीब अरब शेती व व्यापार हे सामान्य धंदे मानीत नसत, लढणे व लुटणे यांना ते सन्मान्य मानीत. कारण याने स्वातंत्र्य राहते. समुद्रकाठचे अरबही लढाऊ वृत्तीचे होते. कारण अंतर्गत अरबांपासून रक्षण करणे, तसेच मोसापोटेमिया, पॅलेस्टाईन, रोमन साम्राज्य या सर्वांपासून रक्षण करणे जरूर असे. व्यापार व शेती करून जी धनदौलत ते मिळवीत, ती वाळवंटी अरबांनी लुटू नये म्हणून त्यांना शस्त्रास्त्रे ठेवावी लागत. वैयक्तिक व राजकीय दोन्ही कारणांमुळे त्यांची लढाऊ वृत्ती कायम राहिली. वाळवंटी अरब व समुद्रकाठी अरब दोघेही झुंजार होते. फरक इतकाचकी समुद्रकाठी अधिक संस्कृती होती. अनेक देशांशी संबंध येई. त्यामुळे नाना विचार येत. कल्पना येत. ज्ञान येई. परंतु अद्याप ज्ञानासाठी म्हणून ज्ञानाची भक्ती नव्हती. शिकण्यासाठी म्हणून शिकणे सन्मनिले जात नसे. लढणे हे सर्वांच्या आधी. मग व्यापार, मग शेती. सर्वांत शेवटचं स्थान शिकण्याला !

ही अरब संस्कृती सर्व ठिकाणच्या संबंधापासून जन्मली म्हणून ती लवकर वाढली. प्रगती सत्वर झाली. लोक नीट घरेदारे करून राहू लागले. हवा फार कडक व इतरही अडचणी त्यामुळे घरे बंद असत. शिल्पशास्त्रात फार प्रगती म्हणून झाली नाही. घरात अंधार असे. तेथील नक्षी, कला कोण पाहणार? घरे विटांची असत. घरे आत ओल्सर व दमट ठेवीत. तशी जरूर असे. अधिक दमटपणा व कमी प्रकाश हे तत्त्व असे. संगीताची बरीच प्रगती झाली होती. शेती व व्यापाराने संपत्ती वाढली होती. नाना देशांतील लोक येत व नैतिक मूल्यमापनातही फरक होई. संगीत म्हणजे धन्यतम कला म्हणून नसे आदरिली जात. स्वच्छंदी व विलासी जीवनाचे साधन या नात्याने संगीताकडे बघत. संगीत म्हणजे विकारांना उत्तेजन. संगीत म्हणजे चिंता, काळजी दूर फेकून सार्वजनिकरीत्या नाचतमाशात दंग होणे. नाना वाद्ये व नाच अस्तित्वात आले. जीवन संयमी व्हावयास धर्म नव्हता, नीतिशिक्षण नव्हते. आजच्या पॅरिस व्हिएन्ना वगैरे शहरांतून, न्यूयॉर्क, शांघाय वगैरे शहरांतून जे जे सुखविलास आढळतात ते सारे मक्केत होते !

मुहंमदापूर्वी अरब मोठे व्यापारी होते. यमनमधला माल अरबच सीरियात नेत होते. मुहंमदापूर्वी एक हजार वर्षे होऊन गेलेला एक ज्यू कवी अरब व्यापाराविषयी लिहितो:

" हे सीरिया, अरब व्यापारी तुझे आहेत. ते मसाले, सोने, मौल्यवान वस्तू तुला आणून देतात. कोकरे, मेंढ्या, शेळया नेतात. निळे कापड नेतात. नक्षीदार कापड नेतात. "

या व्यापारी जीवनाचे केंद्र मक्का होते. मक्केला सीरियातून रेशमी व लोकरीचे कापड, गुलाबी कापड घेऊन व्यापारी येत आणि वेलदोडे, चंदन, लवंगा, सुगंधी वस्तू, खजूर, कातडी, धातू वगैरे माल जो आफ्रिकेतून व हिंदुस्थानातून येथे येई, तो सीरियाकडे घेऊन जात. मक्केतील काबाजवळ मोठमोठ्या व्यापाऱ्यांच्या बैठका ज्यांत भरत असे दिवाणखाने होते. तेथे कवी प्रेमाची व शौर्याची गाणी गात. ग्रीक व इराणी गुलामकन्या त्या व्यापाऱ्यांच्या मेजवान्यांतून आपल्या देशातील संगीताने रंग भरीत. अद्याप अभिजात अरब संगीत जन्मले नव्हते. उंटांना हाकलण्याची गाणी हीच अद्याप अरबांची राष्ट्रीय गाणी होती! कधी अरब बुध्दिबळे खेळत, कधी गप्पा मारीत बसत. व्यापाऱ्यांचे जणू छोटेसे रिपब्लिकन होते म्हणा ना. ज्या ज्या देशांशी व्यापार चाले तेथील सुखभोग आले. परंतु अरब केवळ स्त्रैण व दुबळे नाही झाले.

अद्याप पौरुष होते. मर्दणा होता.

मदिरेचे व मदिराक्षींचे मक्का माहेरघर झाले. जे धर्माचे मुख्य स्थान तेच विलासाचे. कारण धर्मामुळे तेथे पैसा येई. व्यापाराचाही पैसा येई. पैशापाठोपाठ व्यसने येतातच. संगीताने तर मक्कावाल्यास वेड लावले. मक्केत एक गवंडी होता. तो गोड गाणारा होता. तो कामी करीत असला म्हणजे तरुण त्याच्याभोवती येत व म्हणत, " गा रे गा. "ते त्याला पैसे देत सुंदर खाद्यपेये आणून देत. तो गवंडी म्हणे, " आधी मला मउङ्या कामात मदत करा. मग मी गाणे म्हणेन. "आणि ते सारे तरुण कपडे काढून त्याला मदत करू लागत ! त्या गवंड्याच्याभोवती भराभरा दगड येऊन पडत. नंतर तो एका दगडावर उभा राही व गाऊ लागे. जवळच्या टेकडीवर भराभरा लोक ऐकायला जमत. लाल, पिवळया पोशाखांनी टेकडी रंगे. मक्केत गाणा-यांचा मोठा मान ! गाणा-या कलावंतिणींना मोठमोठे खानदानी लोक प्रणाम करीत, आदराने वागवीत. एखादी प्रसिध्द गाणारीण आली तर कोणी बडा अमीर-उमराव तिचे स्वागत करी. त्या स्वागतात सारे शहर सामील होई. मक्का सुखविलासाचे माहेर बनले. या नागर जीवनात अरबांचे दुर्गुण प्रकट झाले. जुगार, मद्य, मदिराक्षी सा-या गोष्टी आल्या. वाळवंटात बेदुइनात द्यूत, दारू यांना जागा नव्हती. परंतु वीस-वीस हजार पौंड किमतीचा माल आणणारे कारवान ज्या शहरात वावरत तेथे या व्यसनांना जागा मिळाली. ग्रीक कन्यांच्या रागदारीने डोलत, मदिरेने मस्त होत, अरब - मक्केतील अरब - आपल्या हातातील फासा फेकी, द्यूत खेळू लागे आणि सर्वस्व गमावून गुलाम बने !

आणि धर्माची स्थिती काय होती ? भटक्या अरबांत एक प्रकारचा धर्म होता. खरोखरची आस्तिकता त्यांच्यात होती की नाही हे सांगता येणार नाही. अस्पष्ट अशी काही कल्पना त्यांना होती. परलोक आहे की नाही याविषयी ते नक्की सांगू शकत नसत. काल्पनिक मननचिंतन करण्याची त्यांची वृत्ती नसे. तिकडे त्यांचा कल नसे. परलोकाच्या अमूर्त कल्पना, या गुंतागुंतीच्या अदृश्य गोष्टी यांचा विचार करायला त्याला विश्रांती ! व वेळही नव्हता. परमेश्वर एक आहे हे ज्ञान त्याला नव्हते. तो अनेक देवतांना भजे. हे देव म्हणजे अर्धवट दैत्यच होते ! भुते-प्रेते, पिशाच्चे यांतून जरा उत्क्रांत झालेले असे हे देव होते. मानवजातीचे कल्याण करणारे, कल्याणमय, कृपासिंधू देव अजून निर्मिले गेले नव्हते. ही भुते-प्रेते, हे जिन, हे गि-हे अपाय करतील म्हणून अरब त्यांना भजे. भीतीमुळे देवपूजा होई. दुसरी एक पितृपूजा त्यांच्यात होत होती. काही जुन्या जातिजमातींतून काही चिन्हे असत. ती चिन्हे वंशपरंपरा आलेली असत. या चिन्हांवरून कुळांना नावे पडत. एखादे झाड, एखादी टेकडी, एखादा प्राणी, एखादा सांप अशी ती चिन्हे असत ! या चिन्हांविषयी अपार आदर व भीतीही असे: या वस्तू पुढे प्रतीके बनल्या. झाडे, खांब, निरनिराळया प्रकारचे दगड यांची, मृतात्म्यांची प्रतीके समजून पूजा होऊ लागली. एकेश्वरी धर्म या बेदुइनांना माहीत नव्हता.

किना-यालगतच्या सुखी, समृध्द अरबांत कशा प्रकारचा धर्म होता ? मक्का शहर केवळ व्यापारी केंद्र नसून धर्मकेंद्रही होते. येथेच ते जगप्रसिध्द पवित्रतम व प्राचीनतम काबा हे मशीद होते ! हे मशीद अरब जमातीचा पूर्वज अब्राहाम (इबराहीम) याने प्रथम बांधले म्हणतात. कोणी म्हणतात, पहिला पूर्वज जो बाबा आदम त्याने स्वर्गातील नमुन्याप्रमाणे ते बांधले !

पुढे मग अब्राहाम (इबराहीम), इस्माइल यांनी ते पुन:पुन्हा बांधले. आदमच्या काळात आकाशातून पडलेला दगड तो याच मशीदीत आहे आणि याच मशीदीत ३६० दिवसांच्या ३६० देवता होत्या. एका दिवसाला एक देव ! या ३६० मूर्तींच्यामध्ये मुख्य देव हुबल याची लाल पाषाणी मूर्ती होती. घगलस व गगेतलिस यांच्या सोन्याच्या व चांदीच्या मूर्ती होत्या. अब्राहामाची मूर्ती व त्याच्या मुलाची मूर्तीही येथे होती. येथेच जवळ ती झमझम विहीर होती. जिचा झरा वाळवंटातून जोराने बाहेर येत आहे. इब्राहीमचा मुलगा इस्माईल लहान असताना तो एकदा तहानेने व्याकूळ झाले होते तेव्हा हा झरा प्रभुकृपेने वाहू लागला !

काबाच्या मशीदेमुळे मक्काच नव्हे तर तो सारा जिल्हाच पवित्र मानला जाई. त्या काळाया पाषणाचे चुंबन घेण्यासाठी प्रतिवर्षी हजारो अरब येत. दिगंबर होऊन सात प्रदशिणा घालीत. दिगंबर का व्हायचे ? जे कपडे अंगावर घालून पापे केली ते कपडे प्रदक्षिणेच्या वेळेस नकोत. मक्केच्या पवित्र स्थानात सर्व जातिजमातींच्या देवतांना स्थान असे. देव असत व देवताही असत. देवदेवतांतही एक प्रकारची लोकशाही जणू होती ! प्राचीन अरबांच्या धर्मात सेमिटिक धर्माचेही मिश्रण आहे तसेच खल्डियन, फानिशियन, कॅननाइट्स वगैरेंच्या धर्मांचेही मिश्रण आहे. हा एक प्रकारे अनेक भुताखेतांचा धर्म होता ! जातिजातींचे धर्म शेजारी शेजारी येऊन काबाजवळ उभे राहिले. सूर्य, तारे, तीन चंद्रदेवता या मुख्य होत्या. शुक्लचंद्र, कृष्णचंद्र व शुक्ल-कृष्णचंद्र अशा तीन स्थितिदर्शक तीन चंद्रदेवता होत्या. अल-लात, मनात व अल-उझा ही त्यांची नावे ! प्रथम अरब झाडे, दगड, पर्वत यांची पूजा करीत. पुढे मूर्ती करू लागले. अब्राहामची मूर्ती म्हणजे एक दगडच होता. 'हा अब्राहाम'असे म्हणत. प्रत्यक्ष मूर्ती का रोमन ख्रिश्चन धर्मामुळे आल्या ? का बौध्द धर्माच्या संबंधामुळे आल्या ? झाडे, पर्वत येथे प्रेतात्मे राहतात अशी कल्पना असे. य नाना देवदेवतांसमोर स्थंडिले असत. तेथे पशूंचे बलिदान होई. क्वचित नरमेधही होत ! वंशपरंपरा चालणारे उपाध्याय वर्गही होते. जणू पंड्ये, बडवे. त्यांना मोठा मान मिळे. परंतु अद्याप त्यांची विशिष्ट जात अशी नव्हती बनली. बाहेर जातिजमातींचे देव असत. परंतु शिवाय प्रत्येकाच्या घरातही खाजगी देवघर असे. जणू कुलदैवत, कौटुंबिक देव. घरातून बाहेर पडताना व घरी परतल्यावर घरांतील देवाला नमस्कार करीत. अशा प्रकारची मुहंमदांपूर्वीची धर्मस्थिती होती. दगड, झरे, धबधबे, तळी, सरोवरे, पर्वत, सा-यांची पूजा असे. परंतु अरबांना थोडी एकेश्वरी कल्पना येऊ लागली होती. या सर्व देवदेवतांच्या मागे परमोच्च देव कोणी तरी असेल, अशा कल्पना होत्या. चंद्र व इतर देवता ह्या 'अल्ला-त-आला'च्या मुली. अल्ला-त-आला म्हणजे सर्वोच्च देव, परमेष्ठी. ज्यू व ख्रिश्चनांशी संबंध आल्यामुळे ही एकेश्वरी कल्पना आली असेल. ख्रिश्चन व ज्यू धर्माचा फारच मोठा परिणाम अरबांवर झाला होता. अरबांना ज्यूंच्या चालीरीती, विधी, परंपरा सर्व नीट माहीत होते असे कुरणावरून दिसते. परंतु ज्यू धर्म संकुचित होता. राष्ट्रीय होता. ख्रिश्चन धर्महीं असहिष्णू झाला होता. अरबसथानच्या सीमेवर हे धर्म होते. खुद्द मक्केतही ख्रिश्चन होते. गफार व नेजदान शहरातून बिशप होते. चर्च होते. अरबांना जो ख्रिश्चन धर्म माहीत झाला तो हृदयाचा नव्हता, तर डोक्याचा होता ! आणि हा डोक्याचा धर्म अरबांच्या डोक्यात उतरेना. ख्रिश्चन धर्मात ख्रिस्ताच्या भौतिक व आध्यात्मिक, मूर्त व अमूर्त स्वरूपांचे वाद त्या वेळेस चालले होते. अरबांना ते सारे गूढ वाटे.

सर्वसामान्य अरब हा विशेषसा धार्मिक नव्हताच. तो किस्मतवादी होता, दैववादी होता ! 'किस्मत्'असे गर्जे व तो लढाइत घुसे. नशिबाच्या हातातील आपली जीवने ! आहे काय नि नाही काय ! कशाला करा फिकीर ! वाटेल ते होवो ! अशी बेछूट व साहसी वृत्ती त्याची होती. तो संशयवादी, अज्ञेयवादी, ऐहिकदृष्टी, भौतिक वृत्ती होता. कोणी देवदेवतांची परीक्षा घेत. नवस करीत इच्छेप्रमाणे न झाले तर देवाला नष्टही करीत ! पुष्कळांचा परलोकावर विश्वास नव्हता. मेल्यावर पापपुण्याचा निवाडा होणार आहे, असे फारसे कोणी मानीत नसे. कोणी कोणी थडग्यांना उंट बांधून ठेवीत. उंटावर बसून प्रभूच्या न्यायमंदिराकडे प्रेतात्म्यास जाता यावे म्हणून ! परंतु असे करणारे - मेल्यावर जन्म मानणारे - अपवादात्मकच होते.

अरब हा कोणत्याच धर्माची फिकीर नव्हता करीत. जे काही अधिक उन्नत व प्रगल्भ विचारांचे होते त्यांना ख्रिश्चनांच्या चर्चा त्याज्य वाटत. ज्यूंचा अहंकार तिरस्करणीय वाटे. परंतु त्यांना या दगडाधोंड्यांची, झाडामाडांची पूजाही आवडत नसे. हा सारा मूर्खपणा आहे असे त्याना वाटे. या समुद्रकाठच्या अरबांतच अनेक देवदेतांविरूध्द अप्रीती उत्पन्न झाली. हा धर्म त्यांना रूचेना, पटेना. ज्यू, ख्रिश्चन यांच्या एकेश्वरी विचाराने अरबांतही वैचारिक जागृती उत्पन्न झाली होती, बुध्दीत खळबळ, हालचाल सुरु झाली होती. सुशिक्षित अरबांत चर्चा होत. वाद होत. कुरबुरी, कुरकुरी होऊ लागल्या. एकेश्वरी कल्पनांची बोलणी सुरू झाली. अस्तित्वात असलेल्या श्रध्देविषयी काहींना असमाधान वाटू लागले. या लोकांना हनीफ म्हणजे अज्ञेयवादी म्हणत. हिब्रू शब्द हनेफ असा आहे. त्याचा अर्थ नास्तिक. या हनिफांनी मुहंमदांसाठी मार्ग तयार करून ठेवला होता. भूमी नांगरली होती. प्रबळ इच्छाशक्तीची महान विभूती पाहिजे होती. एक प्रकारची धार्मिक अस्वस्थता होती. हनीफांची नकारात्मक भूमिका होती. एक परमेश्वर सर्व सत्ताधीश आहे असे त्यांना वाटे. परंतु त्याची पूजा कशी करायची, त्याला हाक कशी मारायची याचेच वाद होत. हे हनीफ निश्चित मार्गदर्शन करू शकत नसत. बहुजन समाजापासून हे विचार दूरच राहिले. मुहंमदांनी या हनीफांच्या विचारांतच प्राण ओतला. हा हनीफांचा एक पुढारी होता. त्याचे नाव झैद इब्न अम्र. मुहंमद त्याच्याकडे अनेकदा जात. दुसरा एक होता त्याचे नाव वरका होते. मुहंमदांचा तो नातलग होता व शेजारी राहत असे. या एकेश्वरी मताच्या लोकांजवळ मुहंमद नेहमी बोलत. ज्या महापुरुषानं नवधर्म देऊन, इस्लाम देऊन अरबस्थानचा नवा मनू सुरु केला, अरबस्थानचा कायापालट ज्याने केला त्याचे अग्रदूत हे हनीफ होते. त्यांनी धर्मिक उत्कटता सर्वत्र पसरून ठेवली होती. सा-या अनिश्चित अशा त्या वातावरणात कोणी तरी मार्गदर्शक तारा येईल, अशी आशा फुलत होती. पूर्वी आद, समूद वगैरे जातींत देवाने प्रेषित पाठविले, पैगंबर पाठविले. आपल्यातही येईल, असे मुहंमदांपूर्वीच लोकांना वाटू लागले होते. काही तरी चमत्कार लवकरच होणार आहे, असे सर्वांस वाटत होते. प्रेषित येणार ! बायकांना वाटे, आपणास मुलगा व्हावा व आपण त्या पैगंबराची आई व्हावे ! तो येणारा महापुरूष आपल्या पोटी यावा, असे मातांना वाटत होते.

असा हा इस्लामपूर्व अरेबिया होता. असा अंतर्गत भागातील बेदुइन व समुद्राजवळचा, सुपीक प्रदेशातील अरब. या दोहोंत जरी फरक असला तरी दोघांतही स्वभावाम्य होते. अरब मग तो अंतर्गत भागातील असो वा सुपीक प्रदेशातील असो, तो स्वातंत्र्याचा उत्कृट प्रेमी होता. तो शूर होता. निर्भय व उदार होता. तो दिलेले वचन पाळी, आतिथ्यात दक्ष राही. तो वाळवंटाचे खरे बाळ होता. अशा भावनाप्रधान

लोकांत, निर्भय, करारी लोकांत, मुहंमद आले. आणि मुहंमदांनी त्यांच्या गुणांना आपसांतील रक्तपातातून काढून महान कार्याकडे वळवले. जी अरबी शक्ती रक्तपातात खर्च होत होती ती महान ध्येयाकडे त्यांनी वळवली. अरबांना जगाचे मार्गदर्शक केले. जगाची संस्कृतीची मशाल मुहंमदांनी अरबांच्या हाती दिली. त्या थोर पैगंबरांचे चरित्र आता आपण आधी पाहू या.



# १

# मुहंमदांचा जन्म



मानवसमाजातील धर्माच्या प्रगतीची अखंडता सतत दिसून येते. मनुष्य प्रथम सृष्ट पदार्थांची पूजा करू लागला. पुढे ईश्वराकडे वळला. ज्या पध्दतीने ही उत्क्रांती झाली ती एकसारखी नाही होत गेली. मधूनमधून पुन्हा पिछेहाट होई. पुन्हा रस्ता बंद पडे. रान उगवे. पुन्हा ईश्वराचे नवे पाईक येत. संदेशवाहक पैगंबर येत. ते परमेश्वरासंबंधीची कर्तव्ये पुन्हा सांगत. एकमेकांत कसे वागावे पुन्हा शिकवीत. त्या त्या काळात अशा थोर विभूती होऊन गेल्या. प्रत्येक विभूती म्हणजे आध्यात्मिकतेची मूर्ती होती. तेज:किरण फेकणारी प्रकाशराशी होती. अध:पतित मानवसमाजाला वर नेण्यासाठी ते येत. पतिताला उध्दारायला येत. अशुध्दाला शुध्द करण्यासाठी येत. अंधारात दिवा दाखवायला येत. अशा महापुरूषांपैकीच मुहंमद पैगंबर हे होत.

मुहंमदांचे आगमन केवळ अरबस्थानापुरते नव्हते. ते सर्व जगासाठी होते. कारण त्या काळात सर्वत्रच धार्मिक अवनती झाली होती. झरथुष्ट्र, मोझेस, ख्रिस्त यांनी पेटविलेल्या पवित्र ज्वाला विझून गेल्या होत्या. इराणात श्रेष्ठकनिष्ठपणाची बंडे माजली होती. सध्दर्म लोपला होता. ख्रिश्चनधर्म आपापसांतील मतभेदांनी कत्तली करीत होता. शांती देणारा धर्म रक्तस्नात होत होता ! हिंदुस्थानाकडेही निराशाच होती. बुध्दांनी दिलेला नीतिधर्म पुन्हा नष्ट झाला. पुन्हा हिंदुधर्माने उचल केली. अनेक देवदेवतांचा धर्म रूढ झाला. नाना देवतांची पुराणे रचिली जाऊ लागली. निरनिराळया देवतांचे उपासक आपसांत झगडत होते. शाक्तमते पुढे येत होती. उपनिषदांतील थोर धर्म मूठभर लोकांजवळ होता. इतरांचा धर्म म्हणजे कर्मकांड! शिवाशावी, श्रेष्ठनिष्ठपणा यांना सीमा राहिली नाही. निर्गुण, निराकार ब्रह्म शून्य झाले. कर्मकांड वाढले. सतराशे देवदेवतांचा बुजबुजाट झाला. उच्चनीचपणाला ऊत आला.

आणि बुध्दधर्म हिंदुस्थानाबाहेर सर्वत्र होता. त्याचे शुध्द स्वरूप राहिले नाही. बुध्दांचे अनेक अवतार झाले. नाना बुध्द निर्माण झाले. त्या त्या देशांनी आपले रंग बौध्दधर्माला दिले. कारण निर्वाणात्मक अभावरूप बौध्दधर्म कोणास पटणार ? बुध्दालाच त्यांनी देव केले ! कोणी अमिताभ म्हणू लागले. कोणी काही.

स्त्रियांची सर्वत्र शोचनीय स्थिती होती. गरिबांना मान नव्हता. सर्वत्र दु:ख होते. अपमान होते. माणूसकीचा अभाव होता. खरा धर्म लोपला होता. अशा काळात मुहंमद आले. त्यांचे येणे आकस्मिक नव्हते. जगाच्या कोंडलेल्या बुध्दिशक्तींना, आत्मशक्तींना मुक्त करण्यासाठी ते आले. मुहंमदांचे आगमन जगाच्या इतिहासाशी संबध्द होते. सामाजिक, राजकीय, धार्मिक शिथिलतेचा तो काळ होता. अशा

परिस्थितीतून नवश्रध्देचा जन्म होणे अपरिहार्य होते. अशा चिखलातून नवीन सहसदल सुंदर कमळ मुहंमदांच्या रूपाने फुलले. जगभर त्याचा गंध गेला. आर्तांस त्यातील अनंत मकरंद मिळाला.

कोठे जन्मला हा महापुरूष ? अरबस्थानात जन्मणा-या पैगंबरास दोन अनुकूलता हव्यात. अरबी धर्माच्या पुण्याक्षेत्री, परंपरागत स्थानी जन्मलेला तो असावा आणि अरब रक्ताच्या थोर कुळात तो जन्मलेला असावा. मुहंमदांना या दोन्ही अनुकूलता मिळाल्या. ते मक्केत जन्मले. काबाची पूजा करणारे श्रेष्ठ कुरेश त्यांच्या घराण्यात जन्मले.

मक्का शहर अरबस्थानचे केंद्र होते. धर्माचे व व्यापाराचे. उत्तर शिक्षण दरीत ते वसले होते. पश्चिमेकडे उंच टेकड्या. पूर्वेकडेही उंच दगड. मक्केच्या मध्यभागी काबाचे पवित्र मंदिर, मंदिराजवळच सार्वाजनिक दिवाणखाना. घरे तटबंदी केलेली. रस्ते नीटनेटके व फरसबंदी, असे हे भरभराटलेले, समृध्द व बळवंत शहर होते.

अशा या मक्केच्या गजबजलेल्या रस्त्यातून एक शांतदान मूर्ती हिंडताना दिसे. विचारमग्न व गंभीर अशी ती मूर्ती दिसे. डोक्यावरील पागोट्यावरुन एक रुमाल टाकलेला असे. त्याचे एक टोक उजवीकडून गळयाखालून डाव्या खांद्यावर टाकलेले असे. कोणाची ती मूर्ती ? कोण ती व्यक्ती ? कोण तो पुरूष ? मध्यम उंचीचा, रूंद खांद्याचा, दणकट मनगटाचा कोण तो पुरूष ? कोळेभोर दाट केस खांद्यावर आले आहेत आणि डोके कसे आहे पहा. भव्य विशाल डोके ! आरदणीय डोके ! तोंड जरा लांबट. पिंगट रंगाचे. तांबुस छटेचे आणि भिवया बघा कशा. सुंदर कमानदार आहेत ! आणि दोन भुवयांच्यामध्ये ती पहा एक ठसठशीत शीर आहे. भवनोत्कट प्रसंगी ती थरारे. आणि डोळेही काळेभोर, मोठे. ते डोळे काही तरी शोधीत आहेत, कोठे तरी पाहत आहेत. अंस्वस्थ आहेत ते डोळे ! जाड व लांब पापण्यांमधून ते डोळे चमकत. नाकही बाकदार व मोठे आहे आणि दात पहा किती स्वच्छ शुभ्र ! दातांची फारच काळजी घेतो वाटते हा? आणि ती सा-या बाजूने असलेली सुरेख दाढी. किती रूबाबदार, सुंदर, सामर्थ्यसंपन्न चेहरा हा ! कोणाचा हा ? काय याचे नाव ? कातडी मऊ आहे, स्वच्छ आहे. मुद्रा शुभ्र व लाल आहे. आणि हात पहा, रेशमासारखे, मखमलीसारखे मऊ आहेत. जणू स्त्रीचे आहेत. पोशाख साधा. चाल द्रुतगतीची परंतु दृढ. जणू वरून खाली येत आहे. देवाकडून मानवांकडे येत आहे. गंभीर मुखावरही रस्त्यात मुले भेटताच हास्य फुलते आहे पहा. वाटेत मुले भेटली तर त्यांच्याजवळ प्रेमाने बोलल्याशिवाय हा पुरूष राहत नसे. मुलांचा प्रेमी होता. कारण मुलांजवळ देवाचे राज्य असते. अद्याप स्वर्गाच्या जवळ ती असतात. मुलांचेही त्याच्यावर प्रेम होते. ती त्याच्याभेवती गोळा होत. आपल्या विचारात मग्न होऊन जरी हा पुरूष जात असला तरी वाटेत कोणी सलाम केला तर लगेच तो सलाम परत करी. मग तो सलाम अगदी हीनदीनाचा का असेना.

कोण होता तो ? लोक त्याला अल्-अमीन म्हणत. आपण होऊन लोकांनी ही त्याला पदवी दिली होती. अल्-अमीन म्हणजे विश्वासार्ह. त्याचे जीवन इतके आदर्शरूप, सचोटीचे, कष्टाचे, सन्मान्य असे होते, की सर्वांना त्याच्याविषयी आदर व विश्वास वाटे. परंतु लोक असे का पाहत आहेत त्याच्याकडे ? अल्-अमीनाकडे साशंकतेने का पाहत आहेत ? हा मनुष्य नवीन धर्म सांगू लागला होता. लोक त्याला पागल म्हणू लागले. समाजाची जूनी बंधने तो नष्ट करु पाहत होता. प्राचीन हक्क, जुने दुष्ट व भ्रष्ट

रीतिरिवाज सोडा असे सांगत होता. हा हट्टी, माथेफिरू क्रांतिकारक आहे, असे आता लोक म्हणत व तो जाऊ लागला म्हणजे संशयाने बघत.

कोण होता तो ? ते का मुहंमद पैगंबर ? होय होय, तेच ते. शांतपणे रस्त्यातून विचारमग्न होणारे व जाणारे. शिव्याशाप, निंदा सहन करीत जाणारे ते मुहंमद होते. कुरेशांच्या कुळात, काबाच्या उपाध्यायांच्या कुळात जन्मले होते.



१०

# मुहंमदांचे पूर्वज



पाचव्या शतकात कुसय हा काबाचा मुख्य होता. त्याने मक्केचा कारभार व्यवस्थित केला. निरनिराळया कुरेशांची घरे कशी तरी, कोठे तरी विस्कळीत बांधलेली होती. काबाचे मशीद अतिपवित्र म्हणून त्याच्या आसपास घरे बांधीत नसत. परंतु कुसयने काबाच्याजवळ वस्ती करायला त्यांना सांगितले. काबाजवळ त्याने जागा दिल्या. तेथे तटबंदी करून, मोहल्ले करून कुरेश राहू लागले.

कुसयने स्वत:साठी एक राजवाडा बांधला. त्याचा दरवाजा उघडताच सामेर मशीदीचे सभागृह असे. या सभाग्रहला दारु-न्नदवा असे म्हणत, म्हणजे कौन्सिल हॉल म्हणा ना. येथेच कुसयच्या अध्यक्षतेखाली सार्वजनिक प्रश्नांची चर्चा होई. चाळीसहून अधिक वयाचे लोकच या चर्चेत भाग घेत. कमी वय असणा-यांना त्या सभेत जाता येत नसे. जेव्हा कधी कोणाजवळ लढाई व्हायची असे तेव्हा कुसय एका भाल्याला पांढरा रुमाल बांधी व ते जणू निशाण कुरेशांच्या हाती देई किंवा आपल्या मुलाच्या हस्ते कुरेश पुढा-याकडे पाठवी. या निशाणाला 'लिवा' म्हणत. असे निशाण आणीबाणीच्या वेळी उभारण्याची पद्धत अरब साम्राज्याच्या समाप्तीपर्यंत होती. याला अकद-उल्-लिवा असे म्हणत.

मक्केला जे गरीब यात्रेकरू येत त्यांच्यासाठी म्हणून कुसयने एक 'गरीब कर' बसविला होता. त्याला 'रिफादा'म्हणत. नदवा, लिवा, रिफादा या जणू तीन संस्था होत्या. हे तिन्ही अधिकार कुसयकडे होते. नदवा म्हणजे कौन्सिल बोलवून अध्यक्ष होणे. लिवा म्हणजे लष्करी हुकमत. रिफादा म्हणजे कर बसविण्याचा हक्क कुसयने धार्मिक, नागरिक व राजकीय तिन्ही कर्मे स्वत:ठायी एकवटली. तो काबाची व्यवस्था ठेवी. यात्रेकरूंच्या अन्नपाण्याची व्यवस्था पाही. काबा मशीदीच्या किल्ल्या त्याच्याजवळ असत. म्हणजे तो धर्मिक मुख्य होता. नदवाचा म्हणजे कौन्सिलचा अध्यक्ष तोच. युध्द करणे, कर घेणे याचीही सत्ता त्याच्याचकडे. कुरेशांचा तो नायक झाला. कुरेशांचे नाव त्याने उज्ज्वल केले. त्याच्या वेळेपासून इस्माईलच्या वंशजात कुरेशांना अधिक मान मिळू लागला. कुसय म्हातारा होऊन इ.स.४८० मध्ये मरण पावला. तो मेल्यावर त्याचा मुलग अब्दुददार हा मुख्य झाला. तो मेल्यावर पुढे भांडणे झाली भावाभवांच्या मुलांत भांडणे झाली- शेवटी तडजोड झाली.

सिकाया (म्हणजे यात्रेकरूंच्या पाण्याची व्यवस्था) व रिफादा ही खाती अब्बुदददारचा भाऊ अब्दुलमुनाफ याच्या मुलाकडे देण्यात आली.

हिजाब (म्हणजे काबाच्या मशीदीच्या किल्ल्या), नदवा व लिवा ही खाती अब्दुददारच्या मुलाकडे ठेवण्यात आली.

अब्दुल मुनाफच्या मुलाचे नाव अब्दुसशम्स असे होते. तो गरीब होता. त्याने आपली खाती आपल्या भावाकडे दिली. या भावाचे नाव हाशीम. हाशीम सधन होता, वजनदार होता. हाशीमच्या हातात रिफादा म्हणजे कर खाते होते. तो येणा-या यात्रेकरूस अन्न देई. त्यांची व्यवस्था ठेवी. इतर मक्केवाल्यांप्रमाणे हाशीम व्यापारही करू लागला. हिवाळयात यमनला व उन्हाळयात सीरियामध्ये नियमितपणे मक्केहून कारवान पाठविण्याची त्यानेच पध्दत सुरु केली. सीरियातील एका प्रवासात हाशीम मरण पावला. इ.स.५१० मध्ये ही गोष्ट झाली. त्याला एक मुलगा होता. त्याचे नाव शयबा परंतु हाशीमचे काम त्याचा धाकटा भाऊ मुत्तलिब याच्याकडे आले. मुत्तलिबला फार मान मिळे. त्यला अल-फैज म्हणजे उदार अशी पदवी होती. शयबा आईसह यसरिब येथे आजोळी होता. शयबाची आई सल्मा ही यसरिबची. यसरिब म्हणजे मदिना. मुत्तलिब शयबाला नीट वागवी, लोक म्हणत शयबा म्हणजे मुत्तलिबचा जणू गुलाम आहे. त्याला ते अब्दुल मुत्तलिब म्हणजे मुत्तलिबचा गुलाम असे म्हणत ! पैगंबरांचे आजोबा अब्दुल मुत्तलिब या नावाने इतिहासात ओळखले जातात. मुत्तलिब इ.स. ५२० मध्ये मेला आणि पैगंबराचे आजोबा अब्दूल मुत्तलिब हे मक्केच्या सार्वजनिक जीवनाचे सूत्रधार बनले.

या वेळेस मक्केचे काम दहा जणांत वाटून दिले होते. दहा खाती दहा जणांकडे. अशी परंपरा पडली होती की या दहांत जो सर्वांत वयोवृध्द असेल त्याला सर्वांनी अधिक मान द्यायचा. तो पुढारी. त्याला रईस किंवा सय्यद म्हणत. मुहंमदांचे चुलते अब्बास हे या दहांतील प्रमुख होते. चारित्र्य व दानत यांमुळे अब्दुल मुत्तलिब यांचेच प्रभुत्व होते.

अब्दुल मुत्तलिब याना संतती होत नव्हती. "मला संतती होऊदे. एक मुलगा तुला देईन." असा त्यानी ईश्वराला नवस केला आणि पुढे पष्कळ संतती झाली. बारा मुलगे व सहा मुली. नवस फेडण्यासाठी आवडता मुलगा अब्दुल्ला याचा बळी तो देणार होता. परंतु देवाने आवाज दिला शंभर उंट दे, म्हणजे पुरे! अब्दूल मुत्तलिबने तसे केले. तेव्हापासून शंभर उंट म्हणजे खुनाची नुकसान भरपाई असे ठरले !

देवाला नैवेद्य म्हणून अर्पण केलेला जो हा अब्दुल्ला तोच पैगंबरांचा पिता. त्याचे अमीनाबरोबर लग्न झाले. याच सुमारास म्हणजे इ.स. ५७० या वर्षी एक महत्तवाची गोष्टी झाली. यमनच्या अबिसिनियन (अब्राह) अधिका-याने सना येथे एक चर्च बांधले. काबामुळे मक्केला असलेले पावित्र्य व वैभव नष्ट करावे असे त्याच्या मनात होते. कोणी मक्कावाल्याचे हे चर्च भ्रष्ट केले. तेव्हा हबशी सुभेदार मोठे सैन्य घेऊन मक्केवर चालून आला. तो स्वत: प्रचंड हत्तीवर बसला होता. तो हत्ती पाहून अरब दबकले. त्यांनी हत्तीचा शक सुरु केला ! हबशी जवळ आले. कुरेश बायकामुलांसह पहाडांत पळाले. काबाच्या ईश्वर आपला सांभाळ करतील म्हणाले. काय होते ते दुरुन पाहत होते. भव्य उषा उजळली अबिसिनियन (अब्राह) मक्केकडे निघाले; परंतु काय आर्श्चय ! पक्ष्यांची प्रचंड सेना आली आणि हे पक्षी दगडांचा वर्षाव करू लागले आणि नंतर आकाशातून मोठा पाऊस सुरु झाल्या. प्रचंड पर्जन्य ! असा पाऊस कधी पडला नाही. शेकडो लोक दगडांनी मेले. पाण्याने मेलेले वाहून जाऊ लागले. समुद्रास मिळाले ! हबशी व्हॉसरॉय पळाला. तोही घायाळ झाला होता. लवकरच मेला. याच वेळेस अरबस्थानात प्रथम देवीची साथ आली. कोणती तरी साथ येऊन हे सैन्य नष्ट झाले असावे. मात्र कधी कधी मक्केच्या खो-यात अपरंपार पाऊस पडतो ही गौष्ट खरी.



# ११

# मुहंमदांचे आरंभीचे जीवन



या प्रसंगानंतर थोड्या दिवसांनी अब्दुल्ला सीरियाला व्यापारा साठी जात अस्ताना वाटेत यसरिब येथे मरन पावला. त्याचे वय फक्त पंचवीस वर्षांचे होते आणि त्याच्या दु:खी पत्नीने पुढे लवकरच एका मुलाला जन्म दिला. तेच आपले पैगंबर मुहंमद. जो पुढे सर्व अनाथांचा मायबाप झाला तो जन्मताच पितृहीन होता ! इ.स.५७० च्या एप्रिल महिन्याची २० वी तारीख. त्या दिवशी हा महापुरुष जन्मला. अबिसिनियन (अब्राहा) सैन्याच्या नाशानंतरचा तो पन्नासावा दिवस होता.

अरब चालीप्रमाणे एका बेदुइन दाई हलीमाने २ वर्ष दूध पाजून मुहंमदास वाढविले. पुढे तिने अमीनाजवळ ते वाढलेले लेकरू आणून दिले. अमीना मोठ्या प्रेमाने व काळजीने देवाचा हा ठेवा वाढवू लागली. तिचे हृदय दु:खाने पोळलेले होते. परंतु मुहंमदाच्या बालमूर्तीकडे पाही व शांत राही. परंतु तीही लवकरच मरण पावली. मुहंमद लहानपणीच पोरके झाले ! मुहंमदाचे वय सहा वर्षाचे. आईबापांच्या प्रेमाची पाखर जगात कुठे मिळणार ? तसे वात्सल्य कोण देणार ? मुहंमदांच्या मनावर या गोष्टीचा फार परिणाम झाला. पोरक्या मुलांना फसवू नका, त्यांना प्रेम द्या, असे कुराणात अनेक उल्लेख आहेत. पोरक्या मुलांची कशी दीनवाणी स्थिती होत असेल, याचा त्यांना अनुभव आलेला होता. ती आठवण ते कधी विसरले नाहीत.

आजोबानी, अब्दुलमुत्तलिब यानी मुहंमदास आपल्याजवळ घेतले. या नातवावर ते फार प्रेम करीत. देवाला बळी देऊ केलेल्या मुलाचा हा मुलगा. आणि देवाने मुलाला तर नेले. त्याचा हा मुलगा राहिला. आजोबा त्याला क्षणभर विसंबत नसत. ऐंशी वर्षांचा वृद्ध अजोबा व सहा-सात वर्षांचा नातू. त्या दोघांत अतिप्रेमळ व कोमल प्रीती होती. काबाजवळ एका ठराविक जागी आजोबा बसत आणि जवळ नातू असायचा. खेळायचा, बोलायचा, प्रश्न विचारायचा. परंतु आजोबांचेही प्रेम मुहंमदास मिळावयाचे नव्हते. सना येथील नवीन राजाचे अभिनंदन करण्यासाठी कुरेशांच्या वतीने वृध्द अब्दूल मुत्तलिब गेले होते. ती प्रवासाची दगदग सहन झाली नाही. ते आजारी झाले. मरणार असे वाटले. आजोबानी आपला मुलगा अबु तालिब यास बोलाविले व मरणशय्येवरून सांगितले, "हा तुझ्या भावाचा पोरका मुलगा तुझ्या स्वाधीन मी करीत आहे. त्याला प्रेम दे."आणि इ.स.५७९ च्या अखेर अब्दूल मुत्तलिब देह सोडून गेले. मुहंमदांचे वय आठ वर्षांचे होते.

चुलते अबु तालिब यांच्या घरी मुहंमद राहू लागले. लहानपणापासूनच मुहंमद विचारी होते. ते नेहमी विचारमग्न असत. डोळे मोठे काळेभोर. जणू असारांतील सार शोधावयाला आले होते. सत्यशोधक,

जिज्ञासू डोळे. कधी हा मुलगा एकटाच टेकड्यावर जाई व सृष्टिसौंदर्य पाहत बसे. तेथे दमे, तल्लीन होई. स्वभाव मोठा सौम्य व गोड दुस-याच्या दु:खाने लगेच दु:खी होत, गहिवरत. फार करूण, कोमल हृदय होते ते. असा हा भावनोत्कट मुलगा सर्वांचा लाडका झाला. चुलत्या-पुतण्यांत अपार प्रेम जडले. "जणू देवदूतांनी येऊन त्यांची हृदये उघडून आत प्रकाश भरला."

उरवाझ येथील मोहरमच्या पवित्र महिन्यातील यात्रेत तो जाई. अरबांच्या शौर्याधैर्याची वर्णने ऐके. ते पराक्रम ऐकून तो आनंदी होई. परंतु ते आपसांतील द्वेषमत्सर व सूड ऐकून सचिंत होई. यात्रेमध्ये ज्यू व ख्रिस्ती धर्मोपदेशकही येत. त्यांची प्रवचने तो लक्ष लावून ऐके. या यात्रेत सारे भलेबुरे अरब जीवन तरूण मुहंमदास पाहायला मिळे. सुंदर अरबी भाषा तेथेच त्यांना ऐकायला मिळाली.

परंतु उरवाझ येथील यात्रेचाही भंग झाला. अरबांत एक यादवी युध्द माजले. राष्ट्रीय यात्रेच्या त्या पवित्र महिन्यात युध्द बंद ठेवण्याची, मानवी रक्त द्वेषमत्सराने न सांडण्याची सुंदर परंपरा होती. उरवाझ म्हणजे अरबांचे ऑलिंपिया. तेथे कवी, व्यापारी सारे येत. राष्ट्रीय मेळावा जमे. परंतु या युध्दाच्या वेळेस यात्रेच्या दिवसातही रक्तपात सुरूच राहिले ! ते धार्मिक बंधन पाळले गेले नाही. यात्रा झील्कद महिनयात भरे. परंतु यात्राही रक्तपाताचे स्थान झाली. फिझार येथील लढाईत मुहंमदही होते. त्यानी आपल्या कुटुंबियांस लढाईत मदत केली. या युध्दाला अधार्मिक युध्द असे म्हणतात. अपवित्र युध्द असे म्हणतात. मुहंमदांवर या युध्दाचा फार परिणाम झाला. आपसांतील ही कधी न संपणारी मरणन्तिक भांडणे पाहून त्यांचे हृदय तडफडे. ते विचारमग्न होत.

युध्दाच्या दरम्यान एकदा चुलत्याबरोबर ते सीरियात व्यापारी काफिल्याबरोबर गेले. मुहंमदांच्या आजोबांनीच दरवर्षी यमन व सीरियात मक्केहून कारवान पाठविण्याची पध्दत सुरू केली होती. ती अद्याप होती. या प्रवासात मुहंमदांनी सामाजिक दु:खे पाहिली, ऐकली. धार्मिक अंध:पात सर्वत्र झालेला पाहिला. सीरियाच्या या प्रवासातच वाटेत एके ठिकाणी त्याना एक ख्रिश्चन साधू भेटला होता असे म्हणतात. या प्रवासात मुहंमदांनी जे जे पाहिले, ऐकिले, अनुभविले त्याची स्मृती त्यांच्या हृदयातून कधीही गेली नाही.

मुहंमदांच्या घराण्याला आता गरिबी आली होती. हाशीम व आजोबा, अब्दुल मुत्तलिब यांच्या कर्णासारख्या औदार्यामुळे गरिबी आली होती. पूर्वीची श्रेष्ठ पदवी हळूहळू जाऊ लागली होती. यात्रेकरूंना अन्न देण्याचे काम शेवटी त्यांनी प्रतिस्पर्धी उमैय्या घराण्याकडे सोपविले. हे उमैय्या हाशीमांच्या घराण्याकडे अत्यंत मत्सराने पाहत असत.

मुहंमदांना घरचे कामधाम करावे लागे. ते उंटांना चारायला नेत. शेळयामेंढ्या घेऊन जात. मुहंमद पुढे म्हणत असत, "ईश्वराने मेंढपाळांतूनच पैगंबर पाठविले !" उंट व शेळयामेंढ्या चारताना ते डोंगरावर बसत. सृष्टिसौंदर्य पाहत. पृथ्वीच्या व आकाशाच्या अनंत सौंदर्याची भक्ती कुराणात पदोपदी आहे. आकाशात व धरेवर सर्वत्र पाहणा-यास परमेश्वराच्या खुणा आहेत, असे कुराण पदोपदी सांगत आहे. परमेश्वराचे ज्ञान मुहंमदास विश्वव्यापक प्रभूच्या सौंदर्यानेच करून दिले असावे. सृष्टी त्यांचा महान गुरू होता. कुराण म्हणजे विश्वसौंदर्याचा वेद आहे. सृष्टीच्या भव्यतेचे ते उपनिषद आहे. कुराणातील भव्य सृष्टिवर्णनांची बीजे या वेळेसच, शेंळयामेंढ्या, उंट चारतानाच-मुहंमदांच्या हृदयभूमीत पेरली जात होती.

मुहंमद आता ऐन तारूण्यात होते. विशीपंचविशीचे वय. या वेळेस ते पुन्हा सीरियात कारवानाबरोबर गेले. कुरेश घराण्यातील एक स्त्री खदिजा. तिच्या मालाचे उंट घेऊन मुहंमद गेले. खदिजा ही दूरची नातलग होती. खदिजा श्रीमंत होती. उदार होती. मुहंमद परत आले. मुहंमदांची कार्यनिष्ठा व प्रामाणिकपणा यांचा खदिजेवर परिणाम झाला आणि खदिजेचे या काळयाभोर डोळयांच्या तेजस्वी नेकीच्या तरूणावर प्रेम जडले. ती म्हणाली, " मुहंमद, माझे तुझ्यावर प्रेम आहे. तू मला आवडतोस. तुझे नातेही आहे. सारे लोक तुला मान देतात. तुझ्याबद्दल त्यांना आदर वाटतो. तू प्रामाणिक आहेस. तुझे चारित्र्य निर्दोष व सुंदर आहे. स्वभाव गोड आहे. तुझी वाणी नेहमी सत्यमय असते. खरेच हो मुहंमद, यामुळे तू मला आवडतोस."आणि त्यांचा विविह झाला. खदिजेचे वय अधिक होते. ती गतधवा होती. चाळीस वर्षांची होती. मुहंमद पंचवीस वर्षांचे. परंतु मुहंमदही आनंदाने लग्नास उभे राहिले !

हे लग्न अत्यंत कल्याणप्रद व शुभमंगल असे झाले. दोघांचे एकमेकांवर फार प्रेम. खदिजेचे हृदय अत्यंत प्रेमळ होते. मुहंमदांविषयी तिला अपार प्रेम वाटे. या लग्नाने मुहंमदास शांती, विश्रांती मिळाली. कामाची दगदग राहिली नाही. पोटाची विवंचना उरली नाही. ज्या महान कार्यासाठी त्यांचा जन्म होता, त्याचा विचार करायला त्यांचे मन मोकळे झाले. प्रेमळ स्त्री-हृदय त्याना मिळाले. या अवघ्या जगात त्यांच्या पैगंबरकार्यावर तिनेच प्रथम विश्वास ठेवला. निराशेत ती त्याना शांतवी, आधार देई, धीर देई. ती आशेची ज्योत विझू देत नसे. जेव्हा जगाचाच नव्हे तर स्वत: मुहंमदांचाही स्वत:वर विश्वास बसेना तेव्हा तिने विश्वास ठेवला ! ज्या वेळेस मुहंमदांच्या डोळयांसमोर अंधारमय सारे होते, तेव्हा तिने श्रध्देचा, आशेचा दीप प्रज्वलित ठेवला.

खदिजेपासून मुहंमदांस सहा मुलें झाली. दोंन मुलगे व चार मुली. परंतु सारे मुलगे बाल्यातच मेले. मुहंमदांस मुलगा राहिला नाही. त्यांचे शत्रू त्यांचा उपहास करण्यासाठी 'अल्-अब्तर' म्हणजे निपुत्र्या असे त्याना संबोधीत.

लग्नानंतरची पंधरा वर्षे मक्केत आत्मचिंतनात गेली. या पंधरा वर्षांची फारशी हकीगत नाही. ते फारसे बोलत नसत. परंतु जेव्हा बोलत तेव्हा जोर देऊन बोलत, ठासून बोलत, विचारपूर्वक, जाणून समजून बोलत. मुहंमद जे बोलत ते ऐकणारा कधी विसरत नसे. त्यांच्या बोलण्याचा ऐकणा-यावर विलक्षण परिणाम होई. पुष्कळ वेळा ते अशांत, सचिन्त, कष्टी असे असत. गळून गेलेले असे दिसत. निरूत्साही दिसत. परंतु एकदम कोठून तरी त्याना स्फूर्ती येई. उत्साह संचरे. खिन्नाता अस्तंगत होई. प्रसन्नता मुखावर पसरे. ते हसूबोलू लागत.

आणि लहान मुले म्हणजे त्यांचा प्राण ! ही भावी पिढी जणू ते तयार करीत होते. रस्त्यात मुलांना थांबवतील, त्यांच्या पाठीवरून हात फिरवतील. त्यांना लहान लहान गोष्टी सांगतील. त्यांच्याबरोबर द-याखो-यांतून, पहाडांतून भटकतील. त्यांच्याबरोबर खेळतील. खिस्तही लाहान मुलाच असाच शोकी होता. मुले म्हणजे देवाची प्रभा !

या पंधरा वर्षांच्या काळात अंत:परीक्षण चालले होते. श्रध्दा व संशय यांची लढाई चालली होती. भावी कार्याची सिध्दता, तयारी होत होती. आध्यात्किम ऐक्य अंतरंगी अनुभवीत होते. अब्दुल मुत्तलिब

मेल्यापासून मक्केत एकजूट राहिली नव्हती. जे शहरचे खरे नागरिक त्यांना एकरक्तत्वामुळे संरक्षण असे. परंतु परकीयांचे जीवन मक्केत सुरक्षित नसे. त्यांची मालमत्ता लुटली जाई त्यांच्या बायकामुली पळविल्या जात. मुहंमदांस हा अन्याय पाहवेना. 'हल्फ-उल्-फझूल' नावाची त्यानी एक संस्था स्थापिली. प्राचीन काळी अशी एक संस्था होती. तिच्यात फझल, फझाल, मुफ्फझल, फुझेल असे चार लोक होते. त्यांच्या संघास फझूल म्हणत. त्या प्राचीन संस्थेचे मुहंमदांनी पुनरूज्जीवन केले. लग्न झाल्यानंतर थोड्याच दिवसांनी इ.स.५९५ मध्ये ही संस्था त्यानी स्थपिली. मुहंमद या संस्थेचे मुख्य होते. हाशिम व मुत्तलिब यांच्या घराण्यातील सारे या संस्थेत सामील होते. या संस्थेच्या दबदब्यामुळे दुबळयांस व गरिबांस संरक्षण मिळे. या संस्थेने जरा धमकी देताच काम होत असे. धटिंगणांच्या दुष्ट कृत्यांस आळा बसला. ही संस्था पुढे इस्लामच्या अर्ध्या शतकापर्यंत, सातव्या शतकाच्या आखेरपर्यंत होती.



# १२

# बिन गाजावाजाची पंधरा वर्षे



सातव्या शतकाच्या आरंभी आणखी एक गोष्ट झाली. एका अरबाने बायझंटाईन सत्तेकडून काही लाच खाल्ली. हिजाझ प्रांत रोमन सत्तेखाली देण्याची हा लाचखाऊ खटपट करीत होता. परंतु मुहंमदांनी पुढाकार घेऊन हा बेत हाणून पाडला.

इ. स. ६०५ मध्ये काबा मशीदीचा जीर्णोध्दार करण्याचे काम कुरेशांनी योजिले. परंतु आपसांत काही तंटा निघाला. जीर्णोध्दार दूर राहून रक्तपात होणार असे दिसू लागले. परंतु मुहंमदांनी तडजोड केली. काबाचा दगड (हजरे अस्वद) कोणी उचलायचा याचा वाद होता ! मुहंमदांनी एक रुमाल आणला. सर्वांनी टोके धरून उचला असे सांगितले. अशा रीतीने त्यानी समयसूचकतेने व शहाणपणाने रक्तपात टाळला.

मुहंमद आता सुखी होते. खदिजा श्रीमंत असल्यामुळे संसाराची विवंचना नव्हती. परंतु प्रेम करणारे चुलते अबु तालिब यांची गरिबी होती. त्यांचे उपकार मुहंमद कसे विसरतील ? त्या उपकारांचे थोडे उतराई व्हावे असे त्यांच्या मनात आले. चुलत्यांचा एक मुलगा अली त्यानी आपल्या घरी आणला. त्याचे शिक्षण, संवर्धन, सारी जबाबदारी स्वतःवर घेतली. पुढे जेव्हा एकदा दुष्काळ आला तेवहा दुस-या एका अब्बास नावाच्या चुलत्यास मुहंमद म्हणाले, “अबु तालिबांचा एक मुलगा तुमच्याकडे घ्या. मीही माझ्याकडे आणखी एक घेतो.” आब्बास यानी जाफरला घेतले. मुहंमदांनी अलीस स्वतःचा जणू मुलगा मानले. एक मुलगा अबु तालिबांजवळ राहिला. मुहंमदांचे सारे मुलगे मेले ! पुत्रप्रेम कोठे करावे त्यानी ? अलीच्या संवर्धनात त्याना पुत्रवात्सल्याचा आनंद मिळे. पुढे मुहंमदांनी आपली सर्वांत लहान कन्या फातिमा हिचे लग्न अलीजवळ केले होते. यामुळे प्रेमाचा व भक्तीचा संबंध अधिकच दृढावला. फातिमाचा जन्म इ. स. ६०३ मध्ये झाला होता.

या सुमारास मक्केतील एका जमातीने हारिसाचा मुलगा झैद याला मक्केत गुलाम करून आणले. खदिजेच्या एका आत्याने त्याला विकत घेतले होते. त्याने त्या गुलामाची खदिजेस भेट दिली. खदिजा पैगंबरास म्हणाली, “ही मला मिळालेली भेट मी तुम्हाला देते !” आणि मुहंमदांनी झैदला ताबडतोब मुक्त केले.

ही दया त्या काळात अपूर्व होती. झैदचे हृदय कृतज्ञतेने ओथंबून गेले. तोही मुहंमदांस सोडून जाईना. ज्याने मला स्वातंत्र्य दिले त्याला सोडून मी कसा जाऊ? त्याचा बाप हारिसा त्याला नेण्यासाठी आला. पित्याने परोपरीने आग्रह केला. परंतु झैद गेला नाही.

अशी ही बिनगाजावाजाची पंधरा वर्षे जात होती. स्वत:च्या प्रेमळ मुलग्याच्या वियोगाची वर्षे, परंतु दुस-याच्या दुःखविषयीच्या सहानुभूतीने भरलेली वर्षे. ही वर्षे जणू उमेदवारीची होती. वरून शांत दिसणारे मुहंमद आत अत्यंत अशांत होते. त्यांच्यासमोर जीर्ण शीर्ण विदीर्ण असा अरेबिया होता. जातिजातींत भांडणे. पिढ्यान्‌पिढ्या चालणारी वैरे. न संपणारे रक्तपात. नाना प्रकारच्या - मुलींना जिवंत पुरून टाकण्यासारख्या चाली. बायका किती कराव्या त्याला गणतीच नाही. नीतीचा धरबंध नाही. दारू, जुगार, सारी व्यसने बोकाळलेली. सर्वत्र अज्ञान व दुष्टता. ईश्वराच्या नावाने भांडणारे नाना पंथ. ही भांडणे हिजाझच्या द-याखो-यापर्यंत येऊन पोहोचत. अरबी शहरे व गावे हीसुध्दा धार्मिक भांडणांनी पेटत. काहींनी जुन्या धर्म-समजुती फेकून दिल्या होत्या. प्रकाशार्थ त्यांची धडपड होती. त्यांची दोलायमान संशयी स्थिती होती. सर्वत्र अस्वस्थता व अशांतता होती. उत्कटता होती.

अरबस्थानची ही विराट अशांती मुहंमदांच्या हृदयात प्रतिबिंबित झाली. मुहंमद गंभीरपणे विचार करू लागले. त्यांचा आत्मा उड्डाण करू लागला. सृष्टीच्या गूढ रहस्यात त्यांचा आत्मा डोकावू लागला. अनंततेच्या दरीत पाहू लागला. सत्य काय, असत्य काय ? जीवन मरण काय ? या विश्वाच्या गोंधळातही काही व्यवस्था आहे का ? मुहंमद शोधू पाहत होते. त्यांना तळमळ लागली आणि देवाची वाणी त्यांच्या पवित्र, उदात्त हृदयाने ऐकली. ती वाणी जगाला नवजीवन देती झाली.



## १३

# प्रकाश पर्वतावरील ईश्वरी संकेत



पवित्र पर्वत हिरा हा मुहंमदांचा आवडता पर्वत. या पर्वतातील एका गुहेत मुहंमद प्रार्थना करीत, ध्यान करीत बसत. हा पर्वत उघडाबोडका आहे. आजूबाजूला द-या आहेत. त्या वाळवंटात एकटा तो पर्वत उभा आहे. जणू पंचाग्निसाधन करीत आहे. ना झाडमाड, ना तिळभर छाया. नाही जवळ झरा, ना विहीर. वाळवंटातील प्रखर सूर्यतापात पेटल्यासारखा हा पहाड होई आणि मुहंमद त्या गुहेत असत. कधी कधी कुटुंबासह मुहंमद तेथे प्रार्थनेस जात. बहुधा रमझान महिन्यात ते जात. ते उपवास करीत. ध्यानमग्न असत. मुहंमदांची प्रकृती जरा नाजूक होती. फार संस्कारी स्वभाव होता. लहानपणी त्याना कधी कधी एकदम मूर्च्छा यायची. भावनांचा भर सहन होत नसे. या गुहेतील एकांत, ती भीषण शांती, ते उपवास, ते चिंतन व ध्यान यांचा एक विलक्षण परिणाम त्यांच्यावर होई. अनेक वर्षांचे संशय, अनेक वर्षांचे चिंतन यांनी त्यांचा स्वभाव फार हळवा केला होता. काही तरी सत्य सापडावे अशी धडपड होती. त्या सत्याच्या मांडीवर विश्वासाने डोके - संतप्त डोके ठेवण्याची त्याना इच्छा होती.

या हिरा पहाडास हल्ली प्रकाश पर्वत हे नाव आहे. वाळवंटातील प्रखर सूर्यतापात मी उभा आहे, त्याप्रमाणे तुलाही पुढे जनता आगीत घालील, त्या आगीत असे अचलपणे उभे राहावे लागेल, असे जणू तो पहाड सुचवीत होता ! मुहंमदांना आता काही सुचत नसे. त्याना एकांताचे वेड लागले. ती गुहा त्यांचे घर बनली. तेथेच ते ध्यानमग्न राहत. सर्वव्यापी परमेश्वराशी एकरूप होत. मधूनमधून त्याना आवाज ऐकू येत. भव्य दर्शन घडत. आदेश, संदेश मिळत. आजूबाजूच्या सा-या निर्जीव वस्तू सहस्र जिभांनी जणू बोलत आहेत असे त्याना वाटे. “जा, ईश्वरी कार्य पुरे कर.” असे जणू तेथील ते दगडधोंडे, तेथील अणुरेणू, तेथील वारे त्याना सांगत. सारी सृष्टी त्याना पुकारीत होती. आत्म्याचे अमर काव्य होते ते. अत्युच्च अद्वितीय महाकाव्य ! जगातील महान विभूतींना असे हे आत्मगान ऐकायला मिळते. चराचराशी एकरूप झालेल्या आत्म्याचे गान ! मुहंमदास देवदूत दिसत. जणू हळूहळू सत्याच्या दिव्य प्रकाशाचे ते आविष्करण होत होते. ज्या सत्याने पुढे मुहंमदानी सा-या जगाला न संपणारी प्रेरणा दिली ते सत्य हळूहळू प्रकट होत होते. पर्वताच्या एकांताने महापुरुषांना सदैव प्रकाश दिला आहे. ते महापुरुष पूर्वेकडचे असोत वा पश्चिमेकडचे.

रात्रीच्या प्रशांत वेळी, पहाटेच्या मंगल उषःकाली, गंभीर निःस्तब्ध एकांती, आसपास कोणीही नाही अशा वेळेस पहाटेच्या वा-याच्या मंद झुळकांबरोबर मुहंमदास आवाज ऐकू येई, “ तूच तो मनुष्य. तू देवाचा पैगंबर आहेस.”कधी कधी प्रचंड लाटेसारखा घों घरीत आवाज येई व त्याना कंपायमान व

रोमांचित करीत. "तुझ्या प्रभूच्या नावाने हाक मार, पुकार, घोषणा कर."

मुहंमद अगतिक होऊन म्हणत, "कसली करू घोषणा ?"

"त्या ईश्वराच्या नावाने घोषणा कर, ज्याने तुला निर्मिले. ज्याने मानवाला निर्मिले. हाक मार. ईश्वर दयाळू आहे. अत्यंत दयाळू आहे. मनुष्याला जे अज्ञात आहेत ते तो ज्ञात करतो. तोच ज्ञानदाता आहे. तो तुला शिकवील. ऊठ. कर घोषणा."

आणि मुहंमद थरारून उठे. "अल्ला हु अकबर !" (अल्लाह सर्व श्रेष्ठ आहे) घोषणा त्यांच्या मुखावाटे बाहेर पडे आणि समोरचे अशांत वाळवंट ऐके पहाड ऐके. मुहंमदास भव्य दर्शने व्हायची. देवदूत दिसायचे. परमेश्वर व मर्त्य मानव यांच्यात जा-ये करणारे देवदूत त्याना दिसत. आणि ती एक धन्यतम रात्र आली. सर्व सृष्टीवर दैवी शांतीची पाखर घातलेली होती. तारे चमचम करीत होते. अपार शांती. मुहंमद विचारमग्न होते आणि एक अत्यंत सामर्थ्यसंपन्न आवाज समुद्रगर्जनेप्रमाणे आला, "घोषणा कर, घोषणा कर." दोनदा स्पष्ट आवाज आला.

"काय घोषणा करू, कसली घोषणा करू ?

"देवाच्या नावाने घोषणा कर."

पुन्हा तिस-यांदा आवाज आला, "घोषणा कर."

पुन्हा मुहंमदांनी विचारले "काय घोषवू, काय पुकारू ?"

आणि एकदम ईश्वरी ज्ञानाचे पुस्तक त्यांच्यासमोर उघडे केले गेले ! मुहंमदांच्या आत्म्यासमोर दैवी पुस्तक उघडे केले गेले. मुहंमदांस सारे ज्ञान करून देण्यात आले. जे ज्ञान मनुष्याला अगम्य असते ते करून दिले गेले. इंद्रियातील ज्ञान. जीवनाच्या संपूर्ण जाणिविने होणारे ज्ञान. ईश्वराशी एकरूप होऊन होणारे ज्ञान. मुहंमद त्या समाधीतून उठले. हृदयावर ते शब्द जणू खोदल्यासारखे होते. ते थरथरत होते. शतभावनांनी कंपायमान होत होते. ते धावत घरी आले. खदिजा तेथे होती.

"खदिजे, खदिजे, काय आहे हे सारे, खरेच काय ?" असे म्हणून गळाल्यासारखा तो पडून राहिला. खदिजा त्यांच्याकडे पाहत होती. पुन्हा मुहंमद म्हणाले, "खदिजे, लोक खरे मानोत वा न मानोत. मी शांतीचा संदेश देणारा तरी आहे किंवा सैतानाने-भुताने पछाडलेला पागल तरी आहे !"

खदिजा प्रेमाने म्हणाली, "हे अबुल कासिम, परमेश्वराला माझी करूणा आहे. तो माझा रक्षणकर्ता. तो प्रभू वेडेवाकडे नाही हो काही करणार. तू कधीही खोटे बोलत नाहीस. अपकरांचा बदला अपकाराने घेत नाहीस. तू श्रध्दावान आहेस. निर्दोष व पवित्र तुझे जीवन आहे. आप्तेष्ट, सखसोयरे, सर्वांशी तू प्रेमाने वागतोस. सर्वांवर दया करतोस. तू बाजारातील गप्पाड्या नाहीस. काय झाले, काय पाहिलेस ? सारे सांग बरे माल. काही भव्य, भीषण का पाहिलेस ?"

आणि मुहंमदांनी सारी हकीकत सांगितली. सारे ऐकून खदिजा म्हणाली, "ऊठ, ऊठ. आनंदाने नाच. तू खरोखरच लोकांचा पैगंबर होणार. खात्रीने. संशयच नाही. ज्याच्या हातात या खदिजेचे जीवन आहे त्या प्रभूची शपथ. धीर धर." उत्साह धर. नंतर खदिजा उठली व त्या अज्ञेयवादी, ईश्वर एक असे म्हणणा-या वरकाकडे ती गेली. वरका आता वृध्द झाला होता. अंध झाला होता. ज्यू, ख्रिश्चन यांचे धर्मग्रंथ त्याने अभ्यासले होते. तिने त्याला सारे वर्तमान निवेदिले. तो एकदम उचंबळून म्हणाला -

"कुदद्गुसुन कुदद्गुसुन !"

"किती पवित्र गोष्ट, खरेच किती पवित्र !" हाच सर्वश्रेष्ठ पैगबर. हाच नामूस अल-अकबर. देवाचा सर्वश्रेष्ठ देवदूत (जीब्राईल). मोझेसला तो दिसला. येशूकडेही तोच आला. तोच मुहंमदाकडेही आज आला, जा. मुहंमदास सांग की तू आपल्या लोकांचा पैगंबर होणार. म्हणावे घाबरू नकोस. हृदय शांत कर. शूर, धीर बन."

अरबस्थानच्या आसपास साम्राज्ये व राष्ट्रे धुळीस मिळत होती. सर्वत्र विनाश होत होता. खरा धर्म कोठेच नव्हता. सर्वत्र चोथा व साली ! धर्माचा गाभा कोठेही नव्हता. कोणी तरी तारक येणार, देवाचा संदेशवाहक येणार, अशी चारी दिशांतून उत्कट भावना हवेत खेळून राहिली होती. वरका मुहंमदांस रस्त्यात भेटले व म्हणाले, "माझे जीवन ज्याच्या हाती त्याची शपथ घेऊन तुला सांगतो की ईश्वराने तुला या लोकांचा पैगंबर म्हणून पसंत केले आहे. त्याने तुला संदेश दिला आहे. लोक तुला खोटे बोलणारा म्हणून म्हणतील. ते तुला छळतील. तुला हद्दपार करतील. तुझ्यावर शस्त्र धरतील. मी जर जगलो तर तुझ्यासाठी लढेन."

आणि त्या वृध्दाला अधिक बोलवेना. मुहंमदांच्या मस्तकाचे, भालप्रदेशाचे त्याने अवघ्राण केले, चुंबन घेतले आणि तो गेला. त्या शब्दांनी मुहंदांच्या प्रक्षुब्ध हृदयास धीर आला. शांती आली. पुन्हा तो आवाज कानी येईपर्यंत थांबण्याचे त्याने ठरविले. पुन्हा ती दैवी प्रेरणा मिळावी म्हणून तो थांबला. केवढे मानसिक युध्द चालले असेल ! महान अंतरात्म्याच्या कुरूक्षेत्रावरची श्रध्दा संशय यांची लढाई. आशा, शंका, झगडे, गैरसमज. स्वत:चे दैवी कार्य निश्चितपणे पटेपर्यंत किती मानसिक यातना !

आणि पुन्हा ती वाणी घों करून आली. आशेची नि:शंक वाणी ! "जा, सारे जग तुझ्या धर्मात येईल. जा. ऊठ, विश्वास धर." अशी ती नभोवाणी पुन्हा मिळाली. ते प्रभूचे पुनराश्वासन मिळाल्यावर वाळवंटातून लगबगीने तो घरी आला. त्याचे शरीर थकले होते. मन झगडून दमले होते. तो खदिजेजवळ आला. सर्वत्र त्याला प्रभूचे विराट अस्तित्व भासत होते. तो थरथरत होता. गांगरला होता. तो खदिजेला म्हणाला, "खदिजे, खदिजे, सांभाळ मला. धीर दे. वाचव !" मुहंमदाची तपस्या जगासाठी होती. ईश्वराशी एकरूपता या जगाला वाचवण्यासाठी त्याना हवी होती. स्वत:साठी केवळ नको होती.

"ऊठ, जगाला सत्याची सूचना दे. प्रभूचे गौरवागान गा." त्याचे वैभव गा. असा स्पष्ट आदेश मिळाला. अत:पर शंका संभ्रम नाही. मुहंमद आता उभे राहिले. अचल श्रध्देने व अपार विश्वासाने उभे राहिले. सारे छळ, यातना, हालअपेष्टा यांना न जुमानता उभे राहिले. सत्यासाठी उभा राहिलेला हा माहापुरूष असत्यासमोर अत:पर नमला नाही.

हा सारा मनाचा खेळ होता का ? मुहंमदास जे देखावे दिसत, जे शब्द ऐकू येत, जे देवदूत दिसत ही सारी का प्रक्षुब्ध मनाची निर्मिती होती ? ही का केवळ स्वत:ची स्वप्ने ? सांगता येणार नाही. मानसशास्त्राचा अभ्यास अर्वाचीन शास्त्रज्ञांना अद्याप करावयाचा आहे. इंद्रियातील  अशीही एक ज्ञानप्राप्तीची शक्ती मनुष्याला आहे. ते ज्ञान खोटे असे कोण म्हणेल ? ते अनुभव खोटे असे कोण म्हणेल? महापुरुष सांगतात की, आम्हाला असे असे अनुभव आले. ते प्रत्यक्षाच्याच गोष्टी बोलतात, करतात.

तुम्हाआम्हाला जे प्रत्यक्ष नसते ते त्यांना असते. त्यांना ते पाहण्याचे डोळे असतात. जणू निराळीच इंद्रिये मनाला फुटतात ! काही असो, ती आत्मवंचना खास नव्हती. “तो मी परमेश्वराचा दूत गॅब्रिअल. मी तुला परमेश्वराचा मंगल संदेश घेऊन आलो आहे. ऊठ. ईश्वराचा महिमा गा. उत्साही हो. पवित्र हो. शुध्द हो. प्रत्युपकाराची, फळाची अपेक्षा ठेवून उपकार करू नको. तू भले कर. सर्वांचे मंगल कर. तुझ्या मंगल कार्याला फळ येईल. वाट पहा. ईश्वरावर श्रध्दा ठेवून धीराने, उतावीळ न होता वाट पहा.” असे शब्द त्याना ऐकू येत. जणू समोर दिसत आणि संशय झडझडून टाकून आत्मविश्वासाने एका परमेश्वराचे, त्या अद्वितीयाचे महागान गावयास ते उभे राहिले.



# १४

# मुहंमदांचे पहिले अनुयायी



मुहंमद एका ईश्वराचे पैगंबर म्हणून प्रचार करु लागले. चाळिशी नुकतीच संपली होती आणि आयुष्याचा उरलेला भाग आता ईश्वरदत्त महान कार्यासाठी ते अर्पण करू लागले आणि त्यांच्यावर प्रथम विश्वास कोणी ठेवली ? त्यांच्याजवळच्या मंडळींनी. पैगंबरांच्या उत्कट तळमळीची व सत्याची याहून दुसरी कोणती निशाणी ? जवळची मंडळी त्यांचा नवधर्म घेती झाली. त्यांना शंका वाटली नाही. हा ईश्वरी पुरुष आहे असे त्यांना वाटले. त्यातही सर्वांत आधी खदिजा. ती पहिली अनुयायी. पैगंबरास ईश्वरी ज्ञान झाले आहे असे जर कोणी पाहिल्याने विश्वासपूर्वक मानले असेल तर ते खदिजेने. मूर्तिपूजा सोडून, त्या परम कारुणिक प्रभूची. मुहंमदांबरोबर प्रथम जर कोणी प्रार्थना म्हटली असेल तर ती खदिजेने, मुहंमदांच्या दैवी जीवनकार्यावर तिनेच प्रथम श्रद्धा ठेवली, इतकेच नव्हे तर पुढील झगड्यात तिने त्याना सदैव धीर दिला. जेव्हा तो कावराबावरा होऊन त्या रात्री तिच्याकडे आला व “खदिजे, खदिजे; पांघरूण घाल माझ्यावर, कपड्यात लपेट मला.” असे म्हणाला त्या वेळेस ईश्वराने खदिजेच्या रूपानेच जणू त्याला धीर दिला, शांती दिली. तीच त्याला म्हणाली, “ऊठ.” तिनेच त्याचा बोजा हलका केला. माझी तुझ्यावर श्रद्धा आहे म्हणाली. लोकांना वाटेल ते बडबडू दे. लक्ष नको देऊ, असे म्हणाली. परमेश्वराने ज्ञान दिले, खदिजेने शांती व विश्वास दिला.

पहिल्या पहिल्याने ज्यांचे मुहंमदांवर प्रेम होते त्यांचयाशीच ते आपला आत्मा प्रकट करीत. आपला नवसंदेश देत. पूर्वजांच्या विकृत व अशुद्ध आचारांपासून परावृत्त व्हा म्हणत. अब्राहामचा शुद्ध धर्म मी पुन्हा आणला आहे म्हणत. खदिजेनंतर अली त्यांचे अनुयायी झाले. पैगंबर मक्केच्या सभोवतालच्या एकांतमय वाळवंटात जात. तेथे खदिजा व अली यांच्यासह ते प्रार्थना करीत. तिघांची कृतज्ञतापूर्वक एकत्र प्रार्थना. पहिली सामुदायिक प्रार्थना. एकदा ती तिघे अशी प्रार्थना करीत असता चुलते अबु तालिब यानी पहिले. ते मुहंमदास म्हणाले, “बेटा, हा कोणता धर्म तू आचरीत आहेस ?” मुहंमद म्हणाले, “ईश्वराचा. त्याच्या देवदूतांचा. त्याच्या पैगंबरांचा. आपल्या प्राचीन अब्राहामचा हा धर्म. लोकांना सत्यमार्गाकडे आणावे म्हणून परमेश्वराने मला पाठविले आहे. आणि काका, तुम्हीही ईश्वराचे अती थोर सेवक आहात. तुम्हाला ईश्वराचा सेवक म्हणून मी हाक मारावी हे उचित आहे. तुम्हीही या सत्याचा स्वीकार करा. या सत्याच्या प्रसारासाठी साहाय्य करा.” चुलते म्हणाले, “पूर्वजांचा धर्म मी सोडू शकत नाही. परंतु त्या परमश्रेष्ठ परमेश्वराची शपथ घेऊन मी सांगतो की, जोपर्यंत मी जिवंत आहे, तोपर्यंत कुणीही तुला अपाय करणार नाही.”

नंतर तो वृद्ध पुरूष आपल्या मुलाला विचारता झाला, "बेटा, तुझा धर्म कोणता ?" अली म्हणाले, "तात, त्या एका ईश्वरावर व त्यांच्या या पैगंबरावर विश्वास ठेवतो. मी पैगंबरांबरोबर जातो." अबु तालिब म्हणाले, "मुहंमद योग्य तेच तुला सांगेल. जा बाळ, त्याच्या बरोबर जा. तो वाईटाकडे तुला कधीही नेणार नाही. त्याच्याशी एकनिष्ठ राहण्याचे तुला स्वातंत्र्य आहे."

तिसरा अनुयायी झैद झाला. तो गुलाम, ज्याला मुहंमदांनी एकदम मुक्त केले होते, त्याने हा नवधर्म घेतला. आणि चौथे अनुयायी कोण झाले ? अबुबकर, ते मक्केतील श्रीमान व्यापारी होते. उदार, शहाणे, धोरणी, शांत, धीराचे होते. मुहंमदास 'अल-अमीन' म्हणत, तसे याना 'अस-सिद्दीक' म्हणजे सच्चा असे म्हणत. मुहंमदाहून दोनच वर्षांनी ते लहान होते. त्याना अब्दूल काबा म्हणजे काबाचा सेवक असेही म्हणत. अशा वजनदार व थोर पुरूषाने हा नवधर्म एकदम स्वीकरला, या गोष्टीचा मोठा नैतिक परिणाम झाला. त्यांच्या पाठोपाठ आणखी पाच या नवधर्मात आले. अबुबकर पुढे खलिफा झाले. तसेच पुढे खलिफा होणारे उस्मान हे मिळाले. उस्मान हा प्रतिस्पर्धी उमैय्या घराण्यातील होता. दूसरा अब्दुर रहमान तिसरा साद - ज्याने पुढे इराण जिंकून घेतला. चौथा खदिजेचा नातलग झुबैर आणि पाचवा तो शूर लढय्या तल्हा. उस्मानने नवधर्म स्वीकारला हे ऐकून त्याचे चुलते संतापले.

त्यांनी उस्मानला बांधले व विचारले, "पूर्वजांच्या धर्मापेक्षा तुला का हा नवा धर्म पसंत आहे ? जो नवा धर्म तू घेत आहेस तो जोपर्यंत तू सोडणार नाहीस, तोपर्यंत मी तुला सोडणार नाही." परंतु उस्मान उत्तरला,"त्या परमेश्वराचीच शपथ घेऊन मी सांगतो, की तो नवधर्म मी प्राण गेला तरी सोडणार नाही!"

काही अनुयायी कनिष्ठ व सामान्य जनतेतीलही मिळाले. मक्केतील काही निग्रो गुलाम या नवधर्माचा स्वीकार करते झाले. तो हबशी 'बिलाल' इस्लामी इतिहासात प्रसिद्ध आहे. इस्लामी धर्माचा पहिला मुअज्जिन म्हणून बिलाल प्रसिद्ध आहे. पैगंबरांचा हा अत्यंत निष्ठावंत शिष्य होता. अभंग श्रद्धेचा धर्मात्मा होता. मुहंमद प्रेमाने म्हणत, "बिलाल म्हणजे अबिसिनियाचे सर्वोत्तम फळ आहे !"

मुहंमदांच्या अत्यंत जवळचे आप्त मित्र त्यांचे पहिले अनुयायी. मुहंमदांची तळमळ, त्यांची दैवी स्फूर्ती, त्यांची पवित्र शिकवण, त्यांची उत्कटता याचा हा पुरावा आहे. या जवळच्या सुज्ञ मंडळींना मुहंमदांच्या शिकवणीत वंचना दिसती, अश्रद्धा वा केवळ ऐहिकता दिसती तर मुहंमदांची सामाजिक सुधारणेची व नैतिक पुनरूज्जीवनाची सारी अशा मातीत मिळाली असती. या अनुयायांनी छळ सहन केले. संकटे सोसली. शारीरिक वेदना व मानसिक दुःखे सहन केली. बहिष्कार, मरण यांनाही तोंड दिले. मुहंमदांच्या ठायी त्यांना यत्किंचितही काळे दिसते तर अशी अडग श्रद्धा जन्मती का ? ख्रिस्तावर त्याच्या भावांचा, जवळच्या मंडळींचा यत्किंचितही विश्वास नव्हता. परंतु मुहंमद या बाबतीत दैववान होते. मुहंमदांच्या अनुयायांची अचल श्रद्धा हीच त्यांच्या स्वीकृत कार्याविषयीच्या अत्यंत प्रामाणिकपणाची खूण आहे.

परंतु प्रचार फार झपाट्याने होईना. वडाचे झाड का एकदम वाढते ? मूर्तिपूजेपासून सवबांधवांस परावृत्त करण्यासाठी तीन वर्षे मुहंमद शांतपणे, परंतु अविरतपणे खटपट करीत होते. तीन वर्षांत तीस अनुयायी फक्त मिळाले ! मूर्तिपूजा फार दृढमूल झालेली. या प्राचीन धर्मात पुन्हा अन्य आकर्षणे होती.

या नवया विशुद्ध धर्मात तसे काही एक नव्हते. जुन्या मूर्तिपूजेत कुरेशांचा स्वार्थ होता. तो धर्म कायम राहण्यात त्यांची प्रतिष्ठा होती. मुहंमदांना या मूर्तिपूजेविरूद्ध व तदंतर्गत वतनदारीविरूद्ध, दोहोंविरूद्ध लढावयाचे होते आणि म्हणून अनुयायी वाढतना. तीन वर्षांत तीस. महिन्याला एकही पडला नाही ! परंतु मुहंमदांचे हृदय खचले नाही. परमेश्वरावर त्यांचा भरवसा होता. कुराणात पुन:पुन्हा म्हटले आहे की, "ईश्वरावर श्रद्धा ठेवून वाट पहा." ते उद्‌गार याच कसोटीच्या काळातील असतील.

तीन वर्षांपर्यंत फारसा उघड विरोध त्याना झाला नाही. कारण मुहंमदांनीही उघड बंड पुकारले नव्हते. लोक त्याना माथेफिरू, पागल म्हणत ! भुताने, सैतानाने पछाडले आहे असे म्हणत. मुहंमद जाहीरपणे अद्याप प्रचार नव्हते करीत. कोणा परकीयांशी बोलले तर एकदम त्याच्या मूर्तिपूजेवर हल्ला नसत चढवीत. शांतपणे व दृढतेने सांगत, तो एक प्रभू ओळखा. त्याची, त्या एकाची पूजा करा. हा शांतिदूत की, वेडा ? याच्या शब्दांत सत्य आहे का ? लोकांना आश्चर्य वाटे.



# १५

# प्रचारात प्रखरता



इ. स. ६१५ पासून मुहंमद उघड प्रचार करू लागले. मूर्तिपूजा सोडा असे जाहीरपणे सांगू लागले. सफा टेकडीवर त्यानी एक सभा बोलविली. त्या सभेत मुहंमद मूर्तिपूजेविरूद्ध बोलले. मूर्तिपूजेने त्या महान प्रभूचा अपराध होतो. ईश्वराच्या प्रेषिताचे शब्द न ऐकाल तर पस्तावाल, असे त्यानी सांगितले. ज्यांनी ज्यांनी आजपर्यंत देवाच्या पैगंबराचा संदेश ऐकला नाही त्यांची कशी दशा झाली, 'याचे त्यानी जळजळीत चित्र उभे केले.' ही जूनी पूजापद्धती सोडा. प्रेमाचा, सत्याचा व विशुद्धतेचा नव धर्म घ्या, असे त्यांनी सागिंतले. कोणत्याही अरबाने आजपर्यंत दिले नाही ते मी तुम्हाला देतो, या जगीचे सुख व परलोकीचेही सुख ! माझ्या या कार्यात कोण मदत कराल बोला." त्या सभेत एका अलीशिवाय कोणीही उत्साह दाखविला नाही ! अली म्हणाला, "देवाचया पैगंबरा, मी तुम्हाला मदत करीन." हे ऐकून सारे मोठ्याने खो खो हसले. सर्वांनी टर उडविली. टोमणे मारीत ते निघून गेले.

परंतु मुहंमदांचा जिवंत ज्वलंत प्रचार सुरु झाला. ती जळजळीत, रसरशीत वाणी होती. मी तुम्हाला सूचना द्यायला आलो आहे. "मी प्रभूचा संदेशवाहक आहे. माझे ऐका. नाही तर भेसून कठोर शिक्षा आहे तुम्हाला ! जोपर्यंत, अल्लाशिवाय दुसरा देव नाही. अल्लाच एक सत्य असे तुम्ही म्हणणार नाही, तोपर्यंत इह वा अन्यत्र तुम्हाला तरणोपाय नाही. ईश्वर हे न मानणा-यांना पूर्वी शासन केले. ज्यांनी नोहाचे ऐकले नाही ते कसे पुरात गेले ध्यानात धरा. या प्रखर जळजळीत सूर्याची शपथ घेऊन मी सांगतो. रात्रीच्या या भव्य तारांकित आवरणाची शपथ घेऊन सांगतो. भव्य उष:कालाची शपथ घेऊन सांगतो. न ऐकाल तर पुढे विनाश आहे. कोणी वाचवणार नाही. तो शेवटचा दिवस येईल. सर्वांचा हिशेब होईल. नरकाची आग एकीकडे, एकीकउे अनंत निर्मळ सुखांचा स्वर्ग. काय पाहिजे बोला. सत्य धर्म ऐका."

असा मुहंमदांचा प्रचार सुरू झाला. त्यांची ती तेजस्वी वाणी, जीवनाच्या श्रद्धेतून येणारी नि:शंक सत्याची वाणी ! श्रोते उचंबळत, रोमांचित होत. ती ईश्वरी शासनाची भयंकर वर्णने ऐकूण श्रोत्यांचा थरकाप होई.

कुरेश आता घाबरले. यो प्रकरणाचा वेळीच बंदोबस्त झाला पाहिजे, असे त्यांना वाटू लागले. मामला गंभीर होत चालला. मक्केतील मूर्ती फुटल्या तर या मंदिरात कोण येईल ? आणि मग कोठली प्रतिष्ठा, कोठले पैसे, उत्पन्ने ? परंतु मुहंमदास हात लावण्याचे त्यांना धैर्य नव्हते. मुहंमद थोर घराण्यातील होते. जरी गरिबी आली होती तरी त्यांच्या घराण्याविषयी पूज्जभाव सर्वांस वाटे. चुलते अबु तालिब याना सारी मक्का पूज्य मानी. ते मुहंमदांचे पालक होते. मानलेले वडील होते. मुहंमदांवर हात टाकणे कठीण

आणि इतरांवर तरी कासा टाकावा ? कारण रक्ताचा सूड ही भ्यानक गोष्ट होती. एकाचा खून झाला तर त्याची सारी जमात सूड घ्यायला उठे व प्रचंड यादवी माजे.

मक्का शहरात जे व्यापारी येत त्यांनाही मुहंमद उपदेश करू लागले. परंतु हे तर कुरेशांना मुळीच आवडेना. मक्केतील गोष्टी, हे नवीन क्रांतिकारक विचार बाहेर जाऊ नयेत असे त्यांना वाटे. ते काय करीत, मक्केत कोणी येत आहे की काय हे आधी पाहत आणि मक्केच्या बाहेरच त्यांना गाठून म्हणत, मक्केत एक वेडा पीर आहे. त्याचे नाव मुहंमद. तो काही तरी बोलतो. त्याचे ऐकू नका बरे. परंतु हे लोक आपापलया गावी परत जाताना मक्केतील सारी हकीकत घेऊन जात. एक स्फूर्तिदाता महान पैगंबर जन्मला आहे असे सांगत. त्याच्या प्राणावर संकट आहे तरीही जुना धर्म सोडा असे तो सांगत आहे असे म्हणत. सर्वत्र उत्सुकता वाढली.

मुहंमदांचे निकट आप्तेष्ट त्यांना सोडतील असे कुरंशांना वाटत होते; परंतु तो खोटे ठरले. चुलते अबु तालिब पूर्वधर्म सोडायला तयार नव्हते; परंतु मुहंमदांचा हा अकारण छळ पाहून ते संतापत. ते आपलया एका कवितेत म्हणतात -

"अनाथांचा दाता, विधवांचा वाली, पोरक्या पोरांचा पिता, जो अल-अमीन आहे, जो दिला शब्द मोडीत नाही, कर्तव्यच्युत होत नाही, त्याचा का बरे हे छळ करतात ?"

त्यांनी जाहीर केले की, हाशिम व मुत्तलिब यांची मुले स्वतःच्या प्राणांनी मुहंमदांचे रक्षण करतील याच वेळेस यसरिब (मदीना) येथील एका प्रमुख गृहस्थाने मक्कावाल्यास लिहिले : यादवी नका करू. नवीन मत ऐका. तुमच्यातील एक सन्मान्य पुरुष नवधर्म देत आहे. त्याचा छळ नका करू. मनुष्याचे हृदय एक परमेश्वरच वाचू शकतो.

या पत्राचा थोडा परिणाम झाला. प्रत्यक्ष छळण्याऐवजी ते निंदेने छळू लागले. शिव्या द्याव्या. वाटेल ते अभद्र बोलावे. कुरेशांनी मुहंमदांना काबा मशीदीत प्रार्थनेची बंदी केली. मुहंमद प्रार्थनेसाठी जात तेथे पाठोपाठ विरोधकही येत. ते प्रार्थना करू लागले म्हणजे हे शेणमार करीत. गावातील गुंडांना व वात्रट पोरांना मुहंमद व त्यांचे अनुयायी यांच्या पाठीस लावीत. मुहंमदांच्या एका चुलत्याची पत्नी उम्मेजमील ती ह्या छळण्यात पुढाकार घेई. ती मुहंमदांच्या प्रार्थनेच्या जागी काटे पसरून ठेवी. या बाईला कुरान ने 'हम्मालत उल-हतब' म्हणजे नरकाग्नीसाठी मोळी नेणारी - असे नाव दिले आहे. असा त्रास होई तरी मुहंमद शांतपणे कर्तव्य पार पाडीत होते. एकदा तर त्यांच्या प्राणांवरच पाळी आली होती. परंतु मुहंमदांच्या आत्मसंयमी, सौम्य स्वभावामुळे ते दुष्ट शेवटी माघारी गेले.

या छळाने नवधर्माचे सामर्थ्य वाढतच गेले. हुतात्म्यांचे रक्त हेच धर्माचे फोफावणारे बी. अब्दुल मुत्तलिब यांचा सर्वांत धाकटा मुलगा हमजा हाही मुहंमदांना मिळाला. मुहंमदांचा होत असलेला छळ,. त्याना मिळणारे शिव्याशाप, त्यांची होणारी निंदा, यामुळे तो त्याना येऊन मिळाला. हमजा मोठा शूर होता. त्याच्या तलवारीची सर्वांनी भीती वाटे. इस्लामसाठीच लढताना तो पुढे मरण पावला !

मुहंमदांची प्रखर वाणी सुरूच होती. अधिक लोक मिळू लागले. कुरेश घाबरू लागले. मुहंमदांच्या नवधर्माची शिकवण लोकशाही स्वरूपाची होती.

मुहंमदांच्या ईश्वरासमोर सारे सारखे होते. प्राचीन विशिष्ट भेद, ते श्रेष्ठकनिष्ठपणाचे प्रकार मुहंमद नष्ट करू पाहत होते. सनातन्यांना हे कसे सहन होणार ? खऱ्या देवाची पूजा सुरु झाली तर या प्रतिष्ठितांची पूजा कोण करणार ? सारे कुरेश संघटीत होऊ लागले. ज्याने त्याने आपल्या घराला जपावे, आपल्या घरात नवीन धर्माचे जंतू येऊ देऊ नयेत असे ठरले. ज्यांच्या ज्यांच्या घरात कोणी नवधर्मी होते, त्यांना त्यांना त्यांच्या कुटुंबियांनी तुरूंगात टाकले ! त्यांची उपासमार सुरु झाली. त्यांना काठ्यांनी बदडले. रमधा टेकडी व बथा ही जागा या छळासाठी प्रसिद्ध झाली ! जे पुरूष नवधर्म घेत त्यांना प्रखर उन्हात तप्त वाळूत उताणे निजवीत. उघडे करून निजवीत. छातीवर दगड ठेवीत. पिण्यास पाणी देत नसत. 'मूर्तिपूजा मान नाही तर मर' असे म्हणत. या छळामुळे काहीजण तात्पुरते कबुल करीत; परंतु पुन्हा मूर्तिपूजा त्याज्य मानीत. पुष्कळजण या असह्य छळातही टिकत. बिलाल अशांपैकी होता ! बिलाल निग्रो गुलाम होता. त्याने नवधर्म घेतला होता. त्याचा धनी उमय्या त्याला रोज बथा येथे नेई. मध्यान्ही सूर्य आला असे. तेथे सूर्याकडे तोंड करून उघडा करून पाठीवर त्याला निजवण्यात येई. छातीवर दगड ठेवीत व त्याला म्हणत, "नवीन धर्म, इस्लाम सोड नाहीतर मर !" त्या छातीवरच्या दगडावरही हे शब्द लिहिलेले असत. बिलालचा जीव गुदमरे, तहानेने तडफडे; परंतु तो तरीही 'अहदन अहदन !' एक एक (ईश्वर एक आहे) असेच म्हणे. या छळाने तो शेवटी मरणोन्मुख झाला. अबू बकरने त्याला त्याच्या धन्यापासून विकत घेतले व मुक्त केले ! गुलामांचा कुरेश छळ करीत, ज्या गुलामांनी नवधर्म स्वीकारला होता, त्या अबू बकरने छळल्या जाणाऱ्या अशा गुलामांना मुक्त केले. कोणी कोणी छळामुळे जरी कचरले तरी मुहंमद त्यांच्यावर रागावत नसत. करूणेने म्हणत, "तुम्ही वाईट नका वाटून घेऊ. तुमची मने माझी आहेत हे मला माहीत आहे." काही काहींचा इतका छळ झाला की ते मेले ! यासर व त्याची पत्नी शमिया यांना छळून मारण्यात आहे. त्यांचा मुलगा अम्मार याचाही अत्यंत छळ झाला. मुहंमद हे छळ पाहत होते. त्यांच्या हृदयाची कालवाकालव होत होती. या छळात दोन मेले. काही शरण गेले. एकीकडे असे छळ चालले असता दुसरीकडे मोठी मोठी अमिषे दाखवून मुहंमदास वश करून घेण्याचे प्रयत्न चालले होते. एके दिवशी काबाच्या सभागृहापासून दूर अंतरावर मुहंमद बसले होते. त्यांच्या विरोधकांपैकी जरा नेमस्त वृत्तीचे एक गृहस्थ त्यांच्याजवळ येत म्हणाले, "बेटा, तू गुणाने थोर आहेस. मोठ्या घराण्यातला आहेस. तू आमच्या लोकांत भांडणे लावीत आहेस. भेद पाडीत आहेस, वितुष्टे लावीत आहेस. तू आमच्या घरातील आनंद, ऐक्य, सलोखा नष्ट केलास. तू देवदेवतांचा उच्छेद मांडला आहेस. आमचे सर्व पूर्वज मूर्ख व पापी होते, अधार्मिक होते असा तू शेरा मारीत आहेस. तुझ्यासमोर एक योजना ठेवायला मी आलो आहे. बघ तुला पटली तर."

मुहंमद म्हणाले, "सांगा काय ते. वलीदचे बाबा, सांगा, बोला."

वलीदचे बाबा म्हणाजे, "ऐक. माझ्या भावाच्या मुला, ऐक. या नव धर्माचा मुख्य होऊन तुला का श्रीमंत व्हायचं आहे ? तसे असेल तर आमच्यातील सर्वांत श्रीमंत असेल, त्याच्याहूनही तुला अधिक श्रीमंत होता येईल इतकी संपत्ती तुला आम्ही गोळा करून देतो. तुला मानसन्मान पाहिजे असेल तर तुला आमचा नायक आम्ही करतो. तू म्हणशील ते प्रमाण. तुझ्या संमतीशिवाय आम्ही काही करणार नाही. तुला राज्य पाहिजे असेल तर आम्ही तुला आमचा राजा करतो. तुला भुतांनी पछाडले असेल तर आम्ही वैद्य बोलावतो

व तुला बरे करायला लागतील तेवढे पैसे आम्ही त्यांना देऊ."

पैगंबरानी विचारले, "वलीदचे बाबा, संपले का आपले बोलणे ?"

"संपले."

"तर मग माझे आता ऐका."

"सांग. ऐकतो."

"त्या परम दयाळू परमेश्वराची शपथ घेऊन मी सांगतो की मी जे सांगत आहे ती त्या प्रभूचीच शिकवण आहे. प्रभूने जे पुस्तक मला दिले, दाखवले तेच मी सांगतो. ज्यांना समजूत आहे, समजशक्ती आहे अशांना शिकण्यासाठी हे पुस्तक आहे. या अरबी भाषेतील कुराणात सज्जनांना आशा आहे, दूर्जनांना शिक्षा आहे. परंतु लोक न ऐकताच जातात. म्हणतात, तू जे सांगतोस त्याचा प्रकाश आमच्या हृदयात पडत नाही. आमचे कान बधीर आहेत. तुझ्यात व आमच्यात आडपडदा आहे. तुला योग्य वाटत असेल तसा तू वाग. आम्हाला योग्य वाटते तसे आम्ही वागू. म्हणतात की आमच्यासारखाच तू ! परंतु तुमचा ईश्वर एक आहे असे ज्ञान मला झाले आहे. म्हणून त्या एका परमेश्वराकडे तुम्ही सर्व चला. जे पूर्वीचे झाले त्याची क्षमा मागा आणि जे मूर्तिपूजक ठरवलेले दान करणार नाहीत, ठरीव भाग गरिबांसाठी देणार नाहीत, परलोकावर जे विश्वास ठेवणार नाहीत, त्यांचे भले होणार नाही. परंतु ते विश्वास ठेवतील, श्रद्धापूर्वक कर्तव्ये करतील, त्यांना अमर बक्षीस मिळेल."

कुराणातील सुरा म्हणून दाखवून ते म्हणाले, "आजोबा, ऐकलेत का ? आता योग्य ते करा."

एके दिवशी अब्दूल्ला इब्न मसूद हा काबाच्या अंगणात बसून धैर्याने कुराण पढू लागला. जमलेल्या कुरेशांनी त्याला मारहाण केली. तोंडावर गुद्दे दिले तरी तो उठेना, निघून जाईना. दुस-या दिवशीही तो तसेच करणार होता; परंतु मुहंमद म्हणाले, काल धैर्य केलेत तेवढे पुरे. "काल तुम्ही त्यांना बळजबरीने कुराण ऐकवलेत, जे ऐकण्याचा ते द्वेष करीत ते त्यांच्या कानात दवडलेत. पुरे, आता पुन्हा नका जाऊ." मुहंमद शक्यतो जपून जात होते.



# १६

# बाणेदार धर्मनिष्ठा



असे दिवस जात होते. छळ होत होते. आपल्या अनुयायांचा छळ पाहून मुहंमद अत्यंत दुःखी झाले. ते म्हणाले, "कुरेशांच्या मनात प्रभुकृपेने बदल होईपर्यंत तुम्ही अबिसिनीयात जावे. तेथील राजा धर्मात्मा आहे. ख्रिश्चन असला तरी उदार व न्यायी आहे. तेथे कोणावर अन्याय होत नाही. परमतसहिष्णू असा तो राजा आहे. आलेल्या पाहुण्यांचे तो स्वागत करतो. त्याच्या राज्यात जा."

मुहंमदांच्या धर्मप्रचाराच्या पाचव्या वर्षी इ. स. ६१६ मध्ये ११ पुरूष व ४ बायका अशी १५ माणसे गलबतात बसून गेली ! या गलबताला 'प्रथम अभिनिष्क्रमण' असे नाव इस्लामी इतिहासात आहे. पुढील वर्षी आणखी ७२ पुरुष व १४ बायका गेल्या. एकंदर १०१ संख्या झाली; परंतु कुरेश चिडले, खवळले. आपल्या हातातील बळी निसटले, छळ करण्याची साधने गेली म्हणून ते संतापले. कुरेशांनी हबशी राजाकडे वकील पाठविला व सांगितले, "आमचे लोक परत द्या. आम्ही त्यांना ठार मारू."

राजाने दरबारात वकिलास व त्या नवधर्मीयांस बोलविले. राजाने वकिलास विचारले, "यांचा काय अपराध ?"

"महाराज, यांनी स्वधर्म सोडला आहे व नवधर्म घेतला आहे."

"तुम्ही स्वधर्म सोडून खरेच का नवर्धम घेतलात ?"

"हो. ते लोक म्हणाले."

"ज्या नव्या धर्मासाठी तुम्ही सनातन धर्म सोडलात, परंपरागत धर्म सोडलात, तो तुमचा नवधर्म आहे तरी काय ?" राजाने विचारले.

अबु तालिबचा मुलगा, अलीचा भाऊ जाफर म्हणाला, "राजा, आम्ही अज्ञानात होतो. केवळ अडाणी जंगली होतो. आम्ही मूर्तीची पूजा करीत होतो. अपवित्र होतो. मृतमांस खात होतो. अभद्र बोलत होतो. माणुसकीची प्रत्येक भावना आम्ही पायांखाली तुडवीत होतो. शेजारधर्म, अतिथिधर्म यांची कर्तवये मानीत नव्हतो. विधिनिषेध आम्हाला उरला नव्हता. सत्तेचा व सामर्थ्याचा फक्त कायदा आम्ही ओळखीत होतो आणि अशा आम्हांत देवाने एक मनुष्य पैदा केला. त्याच्या जन्माची, त्याच्या सत्यवादीपणाची, सचोटीची, पावित्र्याची आम्हांला पूर्ण माहिती आहे. त्याने आम्हाला सांगितले, 'ईश्वर एक आहे. त्या अद्वितीय परमेश्वराशी दुस-या देवदेवता मिसळू नका. मूर्तिपूजा करू नका. खरे बोला. दिलेला विश्वास पाळा. दया दाखवा. शेजा-यांच्या हक्कांचे रक्षण करा. स्त्रियांची कुटाळकी, कुचेष्टा करू नका. अनाथ, पोरकी मुले; त्यांचे असेल ते लुबाडू नका. दुर्गुणांपासून दूर रहा. पापापासून परावृत्त व्हा आणि प्रार्थना

नियमाने करीत जा. गरिबांसाठी ठराविक रक्कम देत जा. उपवास पाळा.' राजा, अशी ही त्यांची शिकवण. ती शिकवण आम्ही अंगिकारली आहे. एका ईश्वराची पूजा करा, अन्य त्याच्याशी जोडू नका, ही त्याची आज्ञा आम्हास मान्य आहे. आमची या पैगंबरावर श्रद्धा आहे. आम्ही ही शिकवण अंगिकारली म्हणून कुरेश आमच्याविरूद्ध उठले आहेत. पैगंबरांविरूद्ध उठले आहेत. आमचा छळ त्यांनी मांडला. पूर्ववत दगडांच्या, लाकडांच्या त्या मूर्ती पूजा कडे परत या असे सांगू लागले. आम्ही ऐकले नाही. अधिकच छळ सुरू झाला. आमचा उच्छेद जणू त्यांनी मांडला. तेथे सुरक्षितता नाही असे पाहून तुझ्या राज्यात आलो आहोत. तू त्यांच्या छळापासून आम्हास सांभाळशील, अशी आम्हाला अशा आहे." असे म्हणून कुराणातील एक उतारा त्याने म्हटला. त्यात खिस्ताचा उल्लेख होता. तो खिश्चन राजा व त्याचे बिशप गहिवरले. राजा व बिशप रडले. राजाच्या दाढीवर अश्रू घळघळले.

राजाने त्यांना आश्रय दिला. कुरेशांचा वकील हात हलवीत माघारी गेला. अनुयायी गेले; परंतु मुहंमद तेथेच निर्भयपणे होते. अपमान, निंदा, अत्याचार यांच्यामध्ये उभे होते. मधूनमधून मानसन्मानाचा, धनदौलतीचाही मोह दाखविण्यात येई; परंतु मुहंमदांचे तेच तेजस्वी उत्तर.

दंभ कीर्ती मान । सुखें टाकितो थुंकून
जरे चाळवी बापुडीं । ज्यांना असे त्याची गोडी

हेच त्याचे नि:स्पृह उत्तर. ते म्हणाले, "धनाची, मानाची मला स्पृहा नाही. मला नको प्रतिष्ठा, नको राज्य. तुम्हाला शुभ संदेश देण्यासाठी देवाने मला पाठविले आहे. माझ्या ईश्वराचेच शब्द मी तुम्हाला देत असतो. त्याचीच वाणी मी तुम्हाला सांगतो. याद राखा. मी आणलेला संदेश स्वीकाराल तर इहपरलोकी परमेश्वर तुमच्यावर कृपा करील. माझा संदेश तुम्ही नाकारलात तरीही मी शांत राहीन. धीर धरीन. तुमच्यात व माझ्यात ईश्वराच न्याय देईल."

मुहंमदांचे असे हे शब्द ऐकून ते थट्टा करीत, हसत व निघून जात. मुहंमदांची श्रद्धा दिवसेंदिवस अधिकच दृढावत होती. कोणी त्यांना म्हणत, "तू खरोखर परमेश्वराचा प्रोषित असशील तर चमत्कार कर. रिकाम्या विहिरी वाहायला लाव. स्वर्ग खाली आण. पर्वत उचलून दाखव. सोन्याचे घर बांध. शिडीवरून स्वर्गात चढ." खिस्तालाही त्याचे विरोधक असेच म्हणायचे, "दाखव आकाशातला तुझा बाप, आण आकाशतील अग्नी खाली." मुहंमदांचे खरे अनुयायी होते त्यांनी चमत्काराची कधीही मागणी केली नाही. ते जे पहिले अनुयायी झाले ते पंडित होते, व्यापारी होते, सैनिक वीर होते. त्यांनी मुहंमदांच्या शिकवणीतील नैतिक श्रेष्ठता पाहिली आणि म्हणूनच एकाकी मुहंमदांभोवती सर्वस्वाच्या तयारीने ते उभे राहिले. त्यांना चमत्काराची जरूरी नव्हती. मुहंमदांच्या भोवती मरण मिळो वा जीवन, ते उभे राहिले. सारे जग त्या काळात चमत्कारासाठी हपापलेले असे; परंतु या चमत्कारप्रेमी विरीधकास मुहंमद म्हणले, "ईश्वराने चमत्कार करण्यासाठी मला पाठविले नाही, तुम्हाला शिकविण्यासाठी मला पाठविले आहे. त्या माझ्या परमश्रेष्ठ प्रभूचा जयजयकार असो. तुम्ही त्याची स्तुतिस्तोत्रे गा. मी पैगंबर असलो तरी माणसाहून का अधिक आहे? देवदूत सहसा पृथ्वीवर येत नाहीत. नाहीतर ईश्वराने प्रत्यक्ष सारे खजिने माझ्या हाती दिले आहेत असे मी कधीही म्हटले नाही. अदृश्य गोष्टी मी जाणतो किंवा मी देवदूत (फरीश्ता) आहे असेही कधी म्हटले नाही.

ईश्वराची कृपा असल्याशिवाय स्वत: माझी माझ्यावरही श्रद्धा बसत नाही. मी मलाही मदत करू शकत नाही."

स्वत:भोवती दिव्य तेजोवलय निर्माण व्हावे असे मुहंमदांना कधी वाटले नाही. ते नेहमी सांगत, "देवाच्या शब्दांचा मी संदेशवाहक. मी पाईक. तो मला बोलवतो, मी बोलतो. माझ्याद्वारा प्रभू आपला संदेश देत आहे." मुहंमद मानवांच्या पूजेविरूद्ध होता. ईश्वरासमोर अत्यंत नम्रपणे व सरळपणे ते उभे आहेत. अत्यंत साधेपणा त्यांच्या जीवनात होता. अत्यंत भावनामय प्रसंगीही अहंता त्याना शिवत नसे. केवळ मधूर कृतज्ञता व नम्रता त्यांच्या हृदयात भरलेली असे. मुहंमद एके ठिकाणी म्हणतात:

"दयाळू परमकृपाळू परमेश्वराच्या नावाचा जयजयकार असो. या पृथ्वीवर वा त्या स्वर्गात जे जे आहे, ते ते सारे परमेश्वराची स्तुती करते. सारे चराचर त्या प्रभूचे स्तोत्र गात आहे. तो परमेश्वर पवित्र आहे. अत्यंत शक्तिमान आहे. सर्वज्ञ आहे. तो एक आहे. अद्बितीय आहे. स्वत:ची सामक्षा दाखविण्यासाठी अज्ञानी अरबांत त्यानै पैगंबर पैदा केला आहे. अरबांना धर्मग्रंथ व ज्ञान देण्यासाठी, विशुध्द करण्यासाठी त्याने पैगंबर पाठविला आहे. अरब पूर्वी अज्ञानात होते; परंतु ईश्वराची दया सर्वांसाठी आहे. ती मुक्त आहे. इच्छा त्याची असेल तेथे तो आपली दया पाठवितो. ईश्वर परम दयाळू आहे आणि त्या परमेश्वराचे चमत्कार या निसर्गात सर्वत्र भरून राहिले आहेत. पहा, आसमांनात पहा. हे आश्चर्यमय जगत पहा. पहा हे चंद्र, सूर्य, तारे. अनंत निळया आकाशात कसे नियमितपणे आपल्या गतीने जात आहेत. या विश्वातील व्यवस्था पहा, कायदा पहा, पद्धती पहा. सुकलेल्या धरित्रीला हिरवीगार करणा-या या पावसाच्या सरी बघा. कसे मोत्यासारखे हे जीवनदायी थेंब आणि प्रचंड महासागरावर डौलाने जाणारी ती गलबते पहा. मानवांचा फायद्याचा असा माल नेतात, आणतात आणि ही खजुराने लादलेली झाडे पहा. ती ताडगोळयांनी भरलेली ताडांची झाडे पहा. अशी ही महान सृष्टी त्या तुमच्या दगडाधोंड्यातील देवाने का निर्मिली ? त्या लाकडी मूर्तीनी का निर्मिली ? तुम्हाला चमत्कार हवे आहेत. जेथे पहाल तेथे चमत्कार ! सारी सृष्टी ईश्वराच्या सामक्षांनी भरलेली आहे. हे शरीरच पहा. किती व्यवस्थित व सुंदर. आश्यर्चकारक गुंतागुंतीने भरलेले. परंतु कसे दिसते. आणि दिवसरात्रीची ही अभंग शाश्वत जोडी पहा. जीवनमरणही पहा. तुम्ही झोपता व जागे होता हाही चमत्कार नाही ? ईश्वराने जे विपुल दिले आहे ते जमवावे अशी तुम्हाला इच्छा होते. भरलेले मेघ आणणारे वारे, ईश्वराच्या करूणेचे जणू ते अग्रदूत सृष्टीतील विविधतेमधील मेळ पहा, तींतील एकता पहा. मानवजातीतही विविधता आहे व सदृशता, एकताही आहे. फुले, फळे, हे प्रणी, मानव या सर्वांवरून, या चराचर सृष्टीवरून कोणी तरी एक सर्वश्रेष्ठ महान परमेश्वर आहे असे नाही का दिसत ?"

असे मुहंमद सांगत, विचारीत. चमत्कारावर भर न देता ते बुद्धीवर भर देतात. विचाराला चालना देतात. भोळसरपणावर जोर देणारे ते नव्हते. प्रज्ञेचा डोळा त्याना प्रिया होता. बुद्धीचा महिमा ते जाणत. पैगंबरांनाही सारी सृष्टी ईश्वराचे अस्तित्व पुकारणारी असे वाटे. सर्वत्र ईश्वरी चमत्कार ! सारी सृष्टी परमेश्वराचा महिमा जणू मुक्याने गात आहे.

जेव्हा प्रत्येक पानांत । ध्वनि प्रत्येक निर्झरीं
सर्वत्र घुमते वाणी । वा-यावर धरेवरी
निरभ्र गगनी आहे । महान् पूरामधें असे
सर्वत्र ईश्वरी वाणी । नावेक न विसावते ।।

अद्वितीय केवळ एक अशा ईश्वराचा हा आचार्य सुष्टीचाही अचार्य आहे. त्या एकेश्वराचा हा पैगंबर सृष्टीचाही पैगंबर आहे. विश्वात सर्वव्यापी नियम आहे, व्यवस्था आहे, ऋतसत्य आहे, एक चिच्छक्ती सर्वत्र भासत आहे, एक संकल्पशक्ती, नियामक, विश्वशासक, विश्वमार्गदर्शक अशी आहे, असे पैगंबर सांगत आहेत आणि सर्वांत मोठा चमत्कार कोणता ? मुहंमद सांगतात, "निसर्गाची, सदसद्विवेकबुद्धीची, भविष्यासंबंधीची जी दैवी सत्ये संस्फूर्त वाणीने सांगितली गेली, ज्यांचे हे कुराण बनले, त्या कुराणाहून अधिक मोठा चमत्कार कोणता ?" मुहंमद विचारतात, "अरे अश्रद्धावंतांनो ! तुमच्या या सामान्य भाषेत जगातील असे अद्वितीय पुस्तक प्रकट व्हावे, ज्यातील लहानसा भागही सोन्याने मढवून ठेवलेल्या तुमच्या सर्व पद्यांना व गीतांना लाजवील, असे हे कुराण - त्या परमेश्वराच्या विश्वव्यापक करूणेची मंगल वार्ता देणारे, अहंकारी घमेंडनंदनांना, जुलमी जालिमांना धोक्याची सूचना देणारे, असे हे कुराण. त्याहून थोर चमत्कार कोणता?"

परंतु मुहंमद काहीही सांगोत, कुरेशांचे शेपूट वाकडेच असे. मुहंमदांचे सारे सांगणे पालथ्या घड्यावरचे पाणी होई. ते परमेश्वराच्या खुणा पाहत ना ईश्वरी संदेश ऐकत ना. डोळे असूनआंधळे व कान असून बहिरे ते झाले. पूर्वीच्या दुष्ट रूढी, वाईट रीतिरिवाज सोडायला ते तयार होत ना. ते मुहंमदांचे कट्टे शत्रू बनले. ते म्हणाले, "एक तू तरी मरशील, मातीत मिळशील. नाही तर आम्ही तरी मरू, जमीनदोस्त होऊ परंतू तुझा पिच्छा पुरविल्याशिवाय आम्ही राहणार नाही. तुझा अधर्मिक प्रचार बंद करायला लावल्याशिवाय आम्ही राहणार नाही. ध्यानात धर."

असे दिवस जात होते. मक्केतील जीवन फार अशांत व भयाण झाले होते. त्यांच्या अनुयायांचे जे छळ होत होते, ते नाही कमी करता येणार? नाही का हे विरोध मिटवता येणार ? एकेश्वरी धर्माचा परंपरागत धर्माशी समन्वय नाही का करता येणार ? मक्केतील ही भांडणे कमी होऊन गुण्यागोविंदाने नाही का राहता येणार ? असे का विचार पैगंबरांच्या मनात या वेळेस खेळत होते ? एके दिवशी काबाजवळ तन्मय होऊन कुराणातील त्रेपन्नाव्या सुरे नजममधील भाग मुहंमद म्हणत होते. "अल-लात, अलउज्जा, मनात यांच्याविषयी काय ?" जवळच एक मूर्तिपूजक होता. मोठ्याने म्हणाला, "त्या परमेश्वराच्या कन्या. त्याही ईश्वराजवळ भक्तांसाठी रदबदली करतील." जुन्या धर्मातील या तीन चंद्रदेवता. काबाच्या मंदिरात यांच्या मूर्ती होत्या. अल्ला त-आला म्हणजे सर्वश्रेष्ठ परमेश्वराच्या त्या मुली असे मानीत. "या देवतांचे काय?" असे मुहंमद म्हणत आहेत तोच तो मूर्तिपूजक म्हणाला, "त्याही देवकन्या. त्या ख-या आहेत." इतर लोकास, आसपास जे होत त्यांना, वाटले की कुराणातीलच हे शब्द आहेत. या देवतांना कुराण मान्यता देत आहे. कुरेश आनंदले. कोणी म्हणतात की मुहंमदांचा हा तडजोडीचा प्रयत्न असावा. त्या विचारांच्या तीव्रतेत असताना "त्याही देवता आहेत." असे शब्द त्यांच्या तोंडून बाहेर पडले. "त्या देवतांना

मान द्या. ईश्वराजवळ तुमच्यासाठी क्षमेची रदबदली त्या करतील. म्हणून त्या परमेश्वरासमोर नमा, लवा. त्याची सेवा करा." आणि जमलेले तमाम सारे लोक लवले, प्रणाम करते झाले. सर्वांना बरे वाटले. तडजोड जणू झाली. मक्केचा द्वितीय धर्म झाला. परंतु मुहंमदांच्या चित्ताला चूकचूक लागली. नाही, या परमेश्वराच्या कन्या नाहीत. तो परमेश्वर कोणाचा मुलगा नाही, त्यालाही मुलेमुली नाहीत. असत्यावर मुहंमद कसे स्थिर होणार ? सत्य असत्याशी तडजोड कशी करील ? जे नाहीच ते आहे कसे म्हणावे ? मुहंमदांनी पुन्हा या पूर्वविधानाचा निषेध केला व म्हणाले, "या देवता नाहीत. ही तीन पोकळ नावे आहेत. तुम्ही व तुमच्या पूर्वजांनी ती शोधून काढली."

मुहंमदांच्या मनात तडजोड करावी असे प्रथम असेलही कदाचित; परंतु असा विचार मनात आला म्हणून का मुहंमद हिणकस ठरतात ? ख्रिश्चन चरित्रकार मुहंमदांचा अध:पात, घसरले मुहंमद, घाबरले वगैरे... या गोष्टीसंबंधी लिहितात. मुहंमद क्षणभर परम सत्यापासून जरा खाली आले तरी ते का खाली आले ? त्यांच्या अनुयायांचे अपार हाल होत होते. मूर्तिपूजेविरूद्ध मुहंमद झगडत होते. यश येत नव्हते. छळ पाहून त्यांचे दयार्द्र मन दु:खी होई आणि म्हणून करावी थोडी तडजोड, असे आलेही असेल त्यांच्या मनात. परंतु सा-या जीवनात ही पहिली व अखेरीचीच तडजोड ! या प्रसंगाने मुहंमद हिणकस न दिसता अधिकच उदात्त दिसतात. अनुयायांच्या छळाने क्षणभर कसे खाली येतात, परंतु पुन्हा धैर्याने उभे राहून, "नाही, त्या देवता नाहीत. मला मोह पडला, सैतानाने मला क्षणभर भूल पाडली." असे ते जाहीर करते झाले. सत्यासत्याचा हा केवढा झगडा ! क्षणभर डोकावलेले असत्य त्यानी साफ उडवून दिले. पुन्हा स्वत:ला व स्वत:च्या अनुयायांना आगीत घालण्यासाठी ते उभे राहिले. किती झाले तरी मुहंमद मर्त्य मनुष्यच होते. ते काही ईश्वर नव्हते. ते स्वत:ला साधा मर्त्य मानवच म्हणत. मुहंमदांचे जीवन मानवी आहे आणि त्या छळामुळे क्षणभर झालेली जी ही चलबिचल, तिच्याविषयी पुढे ते कितीदा तरी बोलत. आपल्या प्रवचनांतुन सांगत.



# १७

# कसोटीचा काळ



क्षणभर हुरळलेले कुरेश आता अधिकच चेकाळले. मुहंमदांची स्वत:च्या दैवी प्रेरणेवर श्रद्धा होती. हळूहळू त्यांची शिकवण रूजत होती. सत्याचे बीज आज ना उद्या अंकुरल्याशिवाय कसे राहील ? वाळवंटातील अरब व इतर व्यापारी मक्केच्या यात्रेस येत. पैगंबरांची वाणी ते ऐकत. पैगंबरांच्या आत्म्याचे निर्मळ व तेजस्वी असे प्रकटीकरण ऐकत. ती वाणी ऐकून ते थक्क होत. परत जाताना तो नवसंदेश, तो नवप्रकाश घेऊन ते जात. नवजीवन घेऊन जात. शत्रूच्या उपहासाने, निंदाप्रचुर काव्यांनी मुहंमदांची शिकवण अधिकच सर्वांना माहीत झाली. ही वाढती कीर्ती, हा वाढता प्रसार कुरेश कसा सहन करतील ? "तुमच्या पूतण्याची ही वटवट बंद करा." असे चुलते अबु तालिब यांच्याकडे येऊ न कुरेश सांगत. मुहंमदांचे मूर्तिपूजेवरील व खोट्या धर्मावरील हल्ले अधिकच तीव्र होऊ लागले. काबाच्या जागेत ते प्रवचन देत. तेथून त्यांना हाकलून देण्यात आले. एके दिवशी सारे कुरेश संतापून अबु तालिबांकडे आले व म्हणाले, तुमच्या पिकल्या केसांना आम्ही मान देतो. तुमचे स्थानही उच्च आहे; परंतु तुमच्याविषयी असणा-या आदरालाही काही सीमा आहे. आमच्या देवदेवतांची निंदा तुमच्या पुतण्याने सतत चालविली आहे. किती दीवस हे आम्ही सहन करावे ? आमच्या पूर्वजांचीही तो नालस्ती करतो. ते मूर्ख होते असे म्हणतो. तुम्ही हे बंद करावा. नाही तर उघड त्याची बाजू घ्या. म्हणजे तुमच्याशीही मग आम्हाला लढता येईल परंतु सध्याच्या तुमच्या दुटप्पी धोरणाने आम्हाला काही करता येत नाही. एक तर त्याचे व्हा, नाहीतर आमचे व्हा. मग लढाई करू. कोणाचे तरी एकाचे निर्मूलन होईल." असे म्हणून ते गेले. वृध्द अबु तालिबांच्या मनाची स्थिती केविलवाणी झाली होती. आपल्या लोकांपासून वियुक्त होणे हेही कठीण आणि निर्दोष पुतण्याला मूर्तिपूजकांच्या हाती सोपविणे हेही कठीण. काय करावे ? वृद्धाने मुहंमदांना बोलविले. मुहंमद नम्रपणे परंतु निश्चयाने बसले. चुलते म्हणाले, "हे पहा मुहंमद, सोड हा नाद. तू मला ही वाचव व स्वत:लाही वाचव. बेटा, मला झेपणार नाही इतका बोजा माझ्यावर नको घालु."

मुहंमद अभंग निश्चयाने म्हणाले, "काका, माझ्या उजव्या हातावर सूर्य व डाव्या हातावर चंद्र ठेवून, मला स्वीकृत्त कार्यापसून ते परावृत्त करू पाहतील तरीही ते शक्य होणार नाही. मी मरेन, तेव्हाच माझे कार्य थांबेल !"

आपल्या चुलत्यांना सोडावे लागेल या विचाराने हे शब्द बोलल्यावर त्यांचे हृदय भरून आले. ते एकदम उठले. भावना लपवण्यासाठी निघाले; परंतु वृद्ध चुलत्याने पुन्हा हाक मारली व ते म्हणाले, "मुहंमद, शांत मनाने जा. ज्यात तुझ्या आत्म्यास आंनद आहे ते सांगत जा. ईश्वराची शपथ, मी तुला कधीही

सोडणार नाही, त्यांच्या हातात देणार नाही." आणि तद्नंतर वृद्ध अबु तालिब यानी बनी हाशिम व बनी मुत्तलिब या घराण्यातील सर्वांना बोलावून सांगितले, "मुहंमदांची तुम्ही सारे बाजू घ्या. त्याच्या वतीने उभे रहा." सार्वांनी ऐकले व तदनुसार करण्याचे ठरविले. फक्त अबु लहब विरूद्ध बाजूला गेला. 'आगीचा बाप' असे त्याला इस्लामी इतिहासात टोपण नाव मिळाले आहे.

चौथ्या वर्षी मुहंमद अल अरकमच्या घरी राहायला गेले. ते घर मध्यवर्ती होते. यात्रेला येणारेणजाणारे तेथे भेटत. या अल अरकमच्याच घरामागे एकदा कुराण ऐकत असता मुसब इब्न उमायर हा मुस्लिम झाला होता. तो आपल्या आईचा व जमातीचा लाडका होता; परंतू तो मुस्लिम झालेला पाहून ते प्रेम गेले ! ते त्याचा छळ करू लागले. तो अबिसिनियात जाणा-यांपैकी एक होता. अल अरकमच्या घरी मुहंमदांना मुसबची आठवण येई.

परंतु याच वेळेस मुहंमदास एक मोठी जोड मिळाली ती म्हणजे उमरची. उमरचे नाव इस्लामी इतिहासात अतिविख्यात आहे. उमरचे वडील मुहंमदांच्या अनुयायांचे छळक म्हणून प्रसिद्ध आहेत. स्वत: उमरही मुहंमदांचे प्रथम कट्टे विरोधकहोते. त्याची बहीणही मुहंमदांच्या धर्माची झाली होती. एके दिवशी उमर हातात नंगी समशेर घेऊन मुहंमदांना ठार मारण्यासाठी जात होता.

"कोठे जातोस उमर ? एकाने विचारले."

"मी मुहंमदास शोधीत आहे. तो कुरेशांना मूर्ख म्हणतो. धर्माची निंदा करतो. आमच्यादेवांची टिंगल करतो. ते अपकीर्तित करतो. आमच्यात तो भांडणे लावीत आहे. भेद पाडीत आहे. त्याला ठार करतो." उमर म्हणाला.

"तुझ्या घरातल्यांचे आधी शासन कर. त्यांना रस्त्यावर आण. त्यांना कर ठार."

"माझ्या घरात नवधर्मी कोण आहे ?"

"तुझी बहीण फातिमा व तिचा नवरा सैद हे मुस्लिम झाले आहेत."

हे ऐकूण उमर एकदम बहिणीकडे जायला निघाला.

बहिणीच्या घरी खब्बाब कुराण शिकवीत होता.

उमर हातातल्या नंग्या समशेरीसह एकदम घरात घुसला व म्हणाला,"कसला आवाज मी ऐकला?"

"काही नाही उमर."

"नाही कसा ? काहीतरी तुम्ही म्हणत होतात. तुम्ही मुहंमदांचे अनुयायी झाला आहात नाही ?" असे म्हणून सैदवर त्याने वार केला. फातिमा पतीला वाचवायला मध्ये पडली. तिलाही लागले. ती म्हणाली, "होय, आम्ही मुस्लिम झालो. नवर्धम घेतला. एक ईश्वर व त्याचा पैगंबर यावर आमचा विश्वास आहे. तुझी इच्छा असेल तर कर आम्हाला ठार."

जखमी बहिणीच्या तोंडावरचे रक्त पाहून उमरचे हृदय द्रवले. तो एकदम मृदू झाला. तो म्हणाला, "तुम्ही जो कागद वाचीत होता, तो मला द्या. मला पाहू दे." आणि बहिणीने शेवटी धीर करून तो कागद भावाच्या हाती दिला. कुराणाचा विसावा सुरा तो होता. उमरने ती दैवी वाणी, संस्फूर्त वाणी वाचली. वाचल्यावर तो म्हणाला, "खरेच किती सुंदर, किती उदात्त ही वाणी !" पुन:पुन्हा त्याने तो कागद वाचला आणि म्हणाला, "मलाही घ्या तुमच्या धर्मात. मुहंमदांकडे मला न्या. तुमचा धर्म मी स्वीकारला, असे

त्याना सांगू दे."

उमरने मुहंमदांच्या हातांचे चुंबन घेतले. नंतर तो म्हणाला, "मलाही तुमच्या संघात सामील करा.." सर्वांना आनंद झाला. सर्वांनी प्रार्थना केली व सर्वांनी प्रभूचे आभार मानले.

हा धर्म अत:पर अंधारात राहिला नाही. मुहंमदांच्या भोवती आता केवळ खालच्या दर्जाचेच लोक नव्हते तर बुद्धिमान, शूर, उत्साही अशी माणसे त्यांच्या झेंड्याखाली होती. हमजा, अबुबकर, उमर अशी मातब्बर व शूर माणसे त्यांच्या धर्मात होती. अली तर होताच. तो फार मोठ्या पदवीस चढत होता. उच्च वृत्तीचा होत होता. हमजा, तल्हा, उमर यांच्यासारखे तलवारबहादूर थोडेच असतील !

हे नवधर्माचे लोक, हे मुस्लिम आता उघडपणे उघड्यावर प्रार्थना करू लागले. उमरने नवधर्म स्वीकारताच कुरेशांना अंगावर वीज पडल्यासारखे झाले ! निर्णायक प्रहार करण्यासाठी ते संधी पाहत होते. अबिसिनियातील शिष्टमंडळही हात हलवीत परत आले होते. प्रखर उपाय योजावे असे कुरेश म्हणून लागले. शेवटी इ. स. ६१६ मध्ये मुहंमदांच्या मिशनच्या सात्व्या वर्षी कुरेशांनी हाशीम व मुत्तलिब यांच्या घराण्यांवर बहिष्कार घातला. हाशीम व मुत्तलिब यांच्या घराण्यांशी कोणीही रोटीबेटी व्यवहार करू नये, त्यांच्याशी सौदा विक्री देवघेव करू नये, असा करार लिहून काबामंदिरात त्यांना ठेवला.

हाशिमी व मुत्तलिब मंडळी शहरभर विस्कळितपणे वसलेली होती. ते सारे अबु तालिबांच्या मोहल्ल्यात राहायला आले. मक्केच्या पूर्वेस पर्वतांच्या अरुंद घळीत ही जागा होती. हा भाग भिंती व प्रचंड फत्तर यांमुळे शहरापासून जसा काही अलग झालेला होता. या भागात यायला व बाहेर पडायला एकच लहान दरवाजा होता. या घराण्यातील अबुलहब तेवढा शत्रूकडे गेला.

तीन वर्षे अशा बहिष्कृत स्थितीत गेली. धान्याचे संचय संपत आले. हाशिमी व मुत्तलिबी सारे मरणार का ? भुकेलेल्या मुलांच्या आरोळया कानांवर येत. काही दयाळू लोक चोरून धान्य वगैरे पाठवीत. मिशनच्या या सातव्या वर्षी मक्केत बाराशिवाय जास्त वजनदार लोक मुहंमदांकडे नव्हते ! मोठी कठीण वेळ होती. सर्व जगाला जवळ घेऊपाहणारे मुहंमद बहिष्कृत होते. जो जगाला जवळ घेऊ पाहतो त्याला जग प्रथम दूर लोटते, असाच या वक्रतुंड जगाचा इतिहास आहे !

कुरेशांनाही मनात आता लाज व शरम वाटू लागली. काही तरी पुन्हा तडजोड व्हावी वाटत होते. एक दिवशी वृद्ध अबु तालिब काबाच्या मंदिरात गेले होते. तो तेथे लावलेला करार उधईने खाऊन टाकला होतो! अबु तालिबानी ते पाहिले. ते कुरेशांना म्हणाले, "तुमचा बहिष्कार देवालाही आवडत नाही. तो पहा उधईने खाल्लेला करार. किती निर्दय आहात तुम्ही !" आणि कुरेशांच्या घराण्यातील पाच प्रमुख लोक अबु तालिबांकडे गेले व म्हणाले, चला आमच्या बरोबर. या कोंडलेल्या जागेतून बाहेर पडा. बहिष्कार संपला. इ. स. ६१९ मध्ये मिशनच्या दहाव्या वर्षी ही तडजोड झाली. हाशीम व मुत्तलिब घराणी पुन्हा घेण्यात आली. सारे मक्कावाले एकत्र राहू लागले.

ही जी बहिष्काराची तीन वर्षे, त्या वर्षांत फक्त यात्रेच्या वेळेस मुहंमद प्रचार करीत. यात्रेकरून कोणी श्रोता मिळतो का पाहत; परंतु खुनशी अबु लहब पाठोपाठ असेच. तो ओरडून म्हणे, "याचे ऐकू नका. हा सैतान आहे. झूठ आहे."

मुहंमद म्हणत, "देवा, अहोरात्र मी माझ्या लोकांना सांगत आहे, टाहो फोडीत आहे; परंतु ते माझ्यापासून अधिकच दूर त्यामुळे जात आहेत. मी तुझा संदेश त्यांना सांगू लागलो की ते कानांत बोटे घालतात. परंपरागत चुका चालू ठेवतात. अधर्म व अनाचार सुरू ठेवतात. ते तुझ्या धर्माला तुच्छ मानतात. प्रभो, नवधर्म घ्या म्हणून रात्रंदिवस त्यांना सांगतो; आणि त्यांना क्षमा कर म्हणून तुलाही सदैव सांगतो."

आणि मुहंमदांवर याच वेळेस अतिमहान प्रहार झाला. दैवाचा दुष्ट घाव. अबु तालिब व खदिजा दोघे थोड्या अंतराने मरण पावली ! मुहंमदांना सोडून गेली, परलोकी गेली. आतापर्यंत मुहंमद व त्यांचे शत्रू यांच्यामध्ये वृद्ध व सन्मान्य अबु तालिब हेच पहाडाप्रमाणे खडे होते. त्यांनीच या पोरक्या मुलाला पाळले, पोसले, प्रेम दिले. त्यांनी त्याला कधी सोडले नाही आणि खदिजेचे मरण हा तर फारच दारूण आघात होता. ज्या वेळेस सर्वत्र शंका व संशय होते, मुहंमदाचाही स्वत:वर विश्वास नव्हता, सर्वत्र अंधार व निराशा यांचे राज्य होते, अशा वेळेस तिच्या प्रेमानेच मुहंमदास आधार दिला. त्यांच्या आशेची व सांत्वनाची ती देवता होती. मरेपर्यंत खदिजेची प्रेम आठवण मुहंमदांना होती. अतिहळूवार प्रेमाने ते तिचा उल्लेख करीत.

या दोघांच्या मरणाने मुहंमद जसे उघडे पडले ! त्याना खूप वाईट लागले. इस्लामी इतिहासात हे शोकाचे वर्ष. सुतकी वर्ष म्हणून प्रसिद्ध झाले. अबु तालिब मेल्यावर विरोधकांचा रस्ता मोकळा झाला. आतापर्यंत ते थोडी मर्यादा पाळीत होते. अत:पर मर्यादा पाळण्याची जरूरच उरली नाही. त्यांना हा इस्लामी धर्मं - हा नवधर्म समूळ नष्ट करणयचे ठरविले.



# १८

# आशानिराशांचे झोके



मूहंमद जरा कष्टी होते. मक्का सोडून अन्यत्र जावे असेही त्यांच्या मनात येऊलागले. मक्केने माझा त्याग केला तरी इतरत्र का कोठे माझे स्वागत होणार नाही ? एकेदिवशी झैदला बरोबर घेऊन ते ताइफ या शहरी गेले. त्यानी तेथील लोकांना नवर्धम सांगितला; परंतु ते लोक हा नवधर्म ऐकून संतापले. "परंपरेच्या विरूद्ध सांगणारा हा कोण आला, हाकला त्याला. मारा दगड." अशा गर्जना झाल्या. त्यांनी झैद व मुहंमद यांना गावाबाहेर घालवले. दुष्ट लोक तर संध्याकाळ होईपर्यंत त्यांच्या पाठोपाठ दगड मारीत जात होते. मुहंमद घायाळ झाले होते. रक्तबंबाळ झाले होते. ते थकले, गळून गेले. एका झाडयाखाली बसून प्रार्थना करु लागले. आकाशाकडे हात पसरून ते म्हणाले, "प्रभो, मी दुबळा आहे म्हणून तक्रार करीत आहे. माझ्या इच्छांच्या पोकळपणामुळे मी प्रार्थना करीत आहे. लोकांच्या दृष्टीने मी तुच्छ आहे. हे परम दयाळा, हे दुर्बळांच्या बळा, तू माझा प्रभू, तू आधार. तू नको हो मला सोडू. मला परकीयांचे भक्ष्य नको करू. माझ्या शत्रूच्या तावडीत मला नको हो देऊ. तुझा माझ्यावर जर राग नसेल तर मी सुरक्षित आहे. तुझ्या मुखचंद्राचा प्रकाश हाच माझा आधार. तुझ्या मुखप्रकाशाने माझा सारा अंधार नष्ट होतो. या जगी व परलोकी शांती मिळते. तुझा क्रोध माझ्यावर न उतरो. देवा, माझ्या अडचणी सोडव. तुझी इच्छा असेल त्याप्रमाणे या अडचणी निस्तर. तूच माझी शक्ती. तूच आधार. तुझ्याशिवाय ना आधार, ना बळ."

प्रार्थनेने शांती आली व ते उठले. मक्केस परत आले. वाटेतील एका बागवानाने थोडी द्राक्षे दिली. वाटेत एके ठिकाणी झोपले असता त्याना एक स्वप्न पडले. 'लोकांनी सोडले आहे. भूते दिसत आहेत; परंतु सारी भुते ईश्वराच्या पाया पडत आहेत.' असे ते स्वप्न पडले. भूते पळतील असे त्याना वाटले. त्याना धैर्य आले. उत्साह आला. झैद म्हणाला "पुन्हा मक्केत कशाला जायचे ? त्या शत्रूंच्या हातात पुन्हा कशाला ?" मुहंमद म्हणाले, "ईश्वर आपल्या धर्माचे व पैगंबराचे रक्षण करील !"

यात्रेच्या वेळेस जे लोक येतील त्यांच्यात मुहंमद प्रचार करीत. ते गावोगवचे यात्रेकरू आपला संदेश दूरवर नेतील असे त्याना वाटे. एकदा मुहंमद काही लोकांना नवधर्म सांगत होते. तो पलीकडे यसरिब (मदीना) शहरचे सहा इसम अपसांत काही बोलत आहेत असे मुहंमदांना दिसले. मुहंमद त्यांनाही म्हणाले, "या. बसा, ऐका. ते बसले."

"कोण तुम्ही ? कुठले ?"

"यसरिबचे. खजरज जमातीचे."

"ज्यूंचे मित्र ?"

"हो."

"जरा बसाल ? मी बोलेन"

ते बसले. मुहंमदांचा नवधर्म त्यांनीही ऐकला. ती तळमळ, भावनोत्कटता, ती सत्यमय वाणी ऐकूण त्या सहांवर मोठा परिणाम झाला.

"आम्ही तुमच्या धर्माचे होतो आणि यसरिबमध्ये सारखी भांडणे असतात. तुम्ही या आमच्यात व सारे एक करा."

"तुमच्याबरोबर येऊ?"

"आधी नका येऊ. आम्ही व बनू औस आधी एक होऊ. मग तुम्ही या."

आणि ते मुहंमदांचे अनुयायी व भक्त होऊन परत गेले. हे सहा लोक यसरिबला परत गेल्यावर नवधर्माची वार्ता फैलावू लागले. त्यांनी आणलेली बातमी विजेसारखी पसरली. "अरबांत पैगंबर जन्मला आहे. तो नवधर्म देत आहे. एका ईश्वराकडे बोलावीत आहे. शेकडो वर्षे चाललेल्या भांडणांस तो आळा घालील. तो अरबांचे अभंग ऐक्य निर्मील." अशी भाषा सर्वत्र झाली.

पुढच्या वर्षी या सहांबरोबर आणखी सहा आले. यसरिब येथे एकंदर तीन तट होते. अरबांत दोन जमाती होत्या. खजरज व औस अशी त्यांची नावे. तिसरा पक्ष ज्यूंचा. ज्यूंनाही वाटत होते की कोणीतरी आपल्यात नवधर्म-दाता येणार म्हणून. अरबांनाही वाटत होते. ज्यूंना वाटले की मुहंमदाच्या पैगंबरत्वाचा आपण अरबांना कबजात घेण्यासाठी साधन म्हणून उपयोग करू. येऊ देत मुहंमद येथे, ते म्हणाले आणि अरबांच्या ज्या दोन मुख्य जमाती होत्या, त्यांचे ते बारा प्रतिनिधी आले होते. एका घराण्याचे दहा व दुस-या घराण्याचे दोन.

पूर्वीच्या त्या ठरलेल्या जागी मुहंमदा वाट पाहत होते. त्या घळीत वाट पाहत होते. तेथे ते यसरिबचे बारा प्रतिनिधी भेटले. मुहंमदाचे ते अनुयायी झाले. ते म्हणाले, "आम्ही एक ईश्वर मानू. त्याच्याशी अन्य देवदेवता मिसळणार नाही. आम्ही चोरी करणार नाही. व्यभिचार करणार नाही. आम्ही आमच्या मुलींस जीवंत मारणार नाही. परनिंदा करणार नाही. कोणाला उगीच नावे ठेवणार नाही. जे जे योग्य आहे त्या बाबतीत पैगंबरांची आज्ञा पाळू. सुखात वा दुःखात त्यांच्याशी निष्ठावंत राहू." अशी त्यांनी शपथ घेतली. ज्या टेकडीवर ही शपथ घेतली, त्या टेकडीचे नाव अकबा असे होते. म्हणून 'अकबाची शपथ' असे या शपथेला नाव आहे. या प्रतिज्ञेला 'स्त्रियांची प्रतिज्ञा' असेही म्हणतात. कारण पुढे जी दुसरी प्रतिज्ञा यसरिबच्या लोकांनी घेतली ती हातात शस्त्र घेऊन केली होती. या वेळेस हातात शस्त्र घेतले नव्हते, म्हणून स्त्रियांची प्रतिज्ञा म्हणतात.

या वेळेस अबिसिनियात गेलेले मुसब परत आला होता. तो या यसरिबच्या लोकांबरोबर गेला. नवधर्म शिकवण्यासाठी, कुराण सांगण्यासाठी गेला. एके दिवशी मुसब कुराण सांगत होता. अद्याप पुष्कळ खजरज पुढारी नवधर्मी झाले नव्हते. असाच एक उसयद नावाचा पुढारी कुराण शिकवणे चालले असता आला.

“हे काय चालवले आहेस येथे ? दुबळयांना वळवू पाहतोस. हे बरे नाही. प्राण प्रिय असतील व हवे असतील तर निघून जा.” तो मुसबला म्हणाला.

“तुम्हीही जरा खाली बसा. ऐका. तुम्हाला आवडते का पहा. आवडले तर घ्या.” सौम्यपणे मुसब म्हणाला.

उसयद भाला रोवून बसला. कुराण ऐकू लागला. ऐकता ऐकता डोलू लागला. आनांदाने उचंबळला.

“या तुमच्या धर्मात येण्यासाठी मी काय करू ?” त्याने विचारले.

“हातपाय धुऊन या, शुचिर्भूत व्हा आणि म्हणा की एका ईश्वराशिवाय दुसरा कोणीही ईश्वर नाही. मुहंमद ईश्वराचे पैगंबर आहेत. ही शपथ घेतलीत की नवधर्मी, इस्लामी तुम्ही झालेत.”

त्याने तसे तत्काळ केले. नंतर तो म्हणाला, “तुम्ही सादचेही मन वळवा म्हणजे चांगले होईल.”

पुढे सादही कुराण ऐकूण इस्लामी झाला. कुराणाची विलक्षण मोहिनी पडे. भाषेचे व विचारांचे, त्यातील सामर्थ्याच्या प्रत्ययाचे अपूर्व आकर्षण ऐकणा-याला वाटे.

साद नंतर आपल्या जमातीत गेला व म्हणाला, “अबुल अशालाच्या संतानांनो, तुमचे माझे काय बरे नाते ?”

“तुम्ही आमचे नेते, सर्वांत शहाणे पुढारी. आमच्यातील सर्वश्रेष्ठ, सुप्रसिद्ध असे तुम्ही.” लोक म्हणाले.

“तर मग मी शपथपूर्वक सांगतो की जोपर्यत तुम्ही एक ईश्वर मानणार नाही, त्याच्या पैगंबरास मानणार नाही, तोपर्यंत माझ्या जीवाला चैन पडणार नाही.”

“आम्ही सारे तसे करतो.” लोक म्हणाले आणि ते सारे इस्लामी झाले. खजरज सारे इस्लामी झाले. बनु औस जमात राहिली होती. त्यांचा नेता कवी अबु कयास हा होता. त्याला इब्नुल अस्लात असेही म्हणत. तो अद्याप विरोधी होता.

आणि पुन्हा मक्केला, यात्रेला जाण्याची वेळ आली. मुहंमदास यसरिबला बोलवायचे की नाही ? अरब म्हणाले, “पैगंबर असोत वा नसोत, मुहंमदा आमचा नातलग आहे. त्याची आजी यसरिबची आहे. तो आमचा आहे. ज्यूंना निष्प्रभ करायला तो उपयोगी पडेल. आणि तो देवाचा पैगंबर असेल तर फारच छान. सोन्याहून पिवळे. हे ज्यू नेहमी मेशिया येणार, मेशिया येणार म्हणत असतात. तो आमच्यात आला असे आम्ही अभिमानाने सांगू. मुहंमदांची शिकवण ज्यूंसारखीच दिसते. ऐक ईश्वरवादच ओहे. म्हणून या नवधर्माचा व ज्यू धर्माचा समन्वयही करता येईल. भांडणे जातील. सारे सुखाने राहू. ऐकश्वरी मत आम्हाला अपरिचित नाही. येऊ दे मुहंमदाला. पैगंबर म्हणून, मेशिया म्हणून, आमच्यात शांतिकर्ता म्हणून कोणात्याही नावे येवो.”

ज्यू व अरब सारे म्हणाले, “येऊ दे.” यसरिबंचे जीवन सारे फाटले होते. पक्षोपक्षांच्या द्वेष्मत्सरांनी विदीर्ण झालें. होते. म्हणून पैगंबरांचे स्वागत करायला सारे उत्सुक होते.

मुसब यसरिबचे पाऊणशे लोक घेऊन निघाला. त्यांमध्ये काही चारपाच मूर्तिपूजकही होते. त्यांनी अद्याप नवधर्म घेतला नव्हता; परंतु मुहंमदास पाहावयास व त्याना आमंत्रण देण्यास तेही आले होते.

ती पहिली प्रतिज्ञा घेऊन व मुसबला घेऊन बारा लोक गेले व आता पाऊणशे पुन्हा आले, या मधला काळ मोठा आणीबाणीचा गेला. मुहंमदांच्या मनात या काळात आशानिराशांचा भीषण झगडा चालला होता. त्या झगड्यातून शेवटी आशा डोकावे. मुहंमद म्हणत, "एक दिवस असा उजाडेल, ज्या दिवशी सत्याचा प्रकाश पसरेल. मी जिवंत नसलो तरी पसरेल."

मक्केत सर्वत्र धोका होता. वाघाच्या तोंडात जणू ते होते. आपल्या शूर व निष्ठावंत अनुयायांसह तेथे ते निर्भयपणे वावरत होते. ते धैर्य असामान्य होते. ती श्रद्धा अलोट होती. अद्वितीय होती. याच आंतरिक झगड्याच्या काळात मुहंमदांना ते एक अपूर्व दर्शन घडले. "आपण स्वार्गात गेलो आहोत. तेथे प्रभूचे भव्य मंदिर पाहत आहोत." असे त्यानी पाहिले. कुराणातील सतराव्या सु-यामध्ये हे वर्णन आले आहे.

मुहंमद म्हणतात, "त्या प्रभूचा जयजयकार असो. त्या प्रभूने या आपल्या बंदा (सेवकाला) त्या रात्री पृथ्वीच्या मंदिरातून स्वार्गाच्या मंदिरात नेले. तेथील दैवी खूणा पाहाव्या म्हणून आम्ही त्याला नेले. ज्या मंदिराची आम्ही देवदूत नेहमी स्तुती करतो त्या मंदिरात पैगंबरास नेले." कुराणातील हे जे उल्लेख्र आहेत, त्यांभोवती सुंदर कावे जन्मली आहेत. किती तरी भव्य दिव्य दंतकथा गुंफिल्या गेल्या आहेत. स्टॅन्ले लेनपूल म्हणतो, "काही असो. हे दर्शन, भव्य दर्शन जरी काव्यमय असले तरी ते अत्यंत अर्थपूर्ण आहे. त्यात ख्रोल अर्थ होता." कोणता बरे तो ख्रोल अर्थ ? तो अर्थ हा की निराशेतही मुहंमद आशेच्या स्वार्गात जणू वावरत होते !

आणि आशा घेऊन मुसब आला. ज्या टेकडीवर त्या बारा जणांनी पूर्वी ती पहिली शपथ घेतली होती, त्या टेकडीच्या पायथ्याशी ते सारे भक्त जमले. रात्रीची वेळ होती. पैगंबरांचे आवडते तारे चमकत होते. अपूर्व शांती होती. विरोधक झोपले होते. मुहंमद त्यांना म्हणाले, "तुम्ही मला व मक्केतील माझ्या अनुयायांना तुमच्या यसरिब शहरात बोलवीत आहात; परंतु यात धोका आहे. मक्कावाले हल्ला करतील. संकटे येतील."

परंतु ते सारे एका आवाजाने म्हणाले, "संकटांची कल्पना ठेवूनच आम्ही नवधर्म स्वीकारला आहे. हे प्रभूच्या प्रेषिता, सांग, कोणतीही शपथ घ्यायला सांग. प्रभूसाठी व तुझ्यासाठी वाटेल ती शपथ आम्ही घेऊ"

पैगंबरांनी कुराणतील काही भाग म्हटले. नंतर सर्वांसह त्यानी नमाज केला. त्यानंतर या नवधर्मावर प्रवचन दिले. मग ती पूर्वी बारांनी जी प्रतिज्ञा घेतली होती, तिचा पुनरूच्चार सर्वांनी केला; परंतु त्या प्रतिज्ञेत पुढील शब्द जोडले गेले, "मुहंमद व त्यांचे अनुयायी यांचे आम्ही रक्षण करू. जसे आम्ही आमच्या बायकामुलांचे रक्षण करतो !"

नंतर यसरिबच्या लोकांनी विचारले, "देवासाठी आम्ही मेलो तर आम्हाला कोणता मोबदला मिळेल ?"

"परलोकी सुख्र. पैगंबर म्हणाले.

"तुम्हाला चांगले दिवस आले तर तुम्ही आम्हांस सोडणार तर नाही ना ? तुमच्या लोकांकडे परतणार नाही ना ?"

"नाही, कधीही नाही. तुमचे रक्त तेच माझे. मी तुमचा, तुम्ही माझे."

"तर मग द्या तुमचा हात." एक म्हातारा एकदम उठून म्हणाला.

मुहंमदांनी हात पुढे केला. प्रत्येकाने तो आपल्या हाती घेतला. प्रत्येकाने मुहंमदांच्या हातावर बेदुइनांच्या पद्धतीने हात ठेवून शपथ कायम केली.

हे सर्व होते न होते तो पाळतीवर असलेल्या एका मक्कावाल्याचा आवाज आला. सारे घाबरले; परंतु पैगंबरांच्या धीरगंभीर वाणीने सर्वांना आश्वासन मिळाले. या पाऊणशेतील बारा जणांना पैगंबरांनी आपले प्रतिनिधी केले. 'नकीब' म्हणून नेमले आणि महणाले, "मूसाने असेच बारा निवडले होते. तुम्ही बारा इतरांची जणू ग्वाही आणि मी सर्वांसाठी ग्वाही."

यसरिबला परत जाण्यापूर्वी मुसबला आईला भेटावे असे वाटले. तो आईचा व आपल्या जमातीचा फार लाडका होता; परंतु नवधर्म घेतल्यापासून तो अप्रिय झाला होता. तो म्हणून अबिसिनियात गेला होता.

तो आईकडे गेला.

"अरे आज्ञाभंगका, मक्केत तुझी आई राहते. त्या आईला आधी का नाही भेटलास ? मी तुला निरोप पाठवला होता की आधी मला भेट; परंतु तू दुसरीकडे गेलास." आई म्हणाली.

"आई, पैगंबर देवाचे आहेत; म्हणून त्यांची आधी भेट. मग तुझी, इतरांची."

"अजूनही तू धर्मच्युतच आहेस वाटते ?"

"मी पैगंबरांचा आहे. इस्लामवर निष्ठा ठेवणारा आहे."

"मुसब, तू अबिसिनियात गेलास. हल्ली यसरिबला राहतोस. किती कष्ट व दगदग ! तू घरी सुखाचे राहणे सोडून असा वनवास का पत्करतोस ? ते कष्ट का तुला बरे वाटतात ?"

"आई, हे काय सांगत आहेस ? का माझ्या खऱ्या धर्मापासून वळवू पाहत आहेस ? आणि येथे मला पकडण्याचा तर नाही ना तुमचा बेत ? परंतु मी निर्धाराने सांगतो की, माझ्यावर हात टाकील त्याचा मुडदा पाडल्याशिवाय मी राहणार नाही."

"जा नीघ, माझ्या समोरून कर तोंड काळे !"

आणि प्रेमळ माता रडू लागली. तिचे त्याच्यावर फार प्रेम होते. त्याचा वियोग तिला सहन होत नव्हता. मुसब सद्‌गदित होऊन म्हणाला, "आई, ऐकशील ? मी तुला प्रेमाचा सल्ला देतो. ईश्वर एक आहे व मुहंमद त्याचा पैगंबर आहे, अशी शपथ घे. मग तू-मी एकत्र राहू शकू."

आई, म्हणाली, "त्या चमचम करणाऱ्या ताऱ्यांची शपथ. मी तुझ्या धर्मात शिरण्याचा मूर्खपणा कधी करणार नाही. मी तुझ्यावर पाणी सोडले. आजपासून तुझा संबंध सोडला. मी माझ्या धर्माला चिकटून राहीन."

मुसब निघून गेला.



# १९

# विरोधकांच्या गुप्त मसलती



मुहंमदांची व यसरिबच्या लोकांची जी गुप्त बैठक झाली, तिची वार्ता कुरेशांना कळली. सा-या मक्केत ती बातमी पसरली. कुरेश यसरिबवाल्यांकडे गेले व म्हणाले, "कोणी कोणी शपथ घेतली सांगा." परंतु कोणीच बोलेना. कुरेश रागावून परत गेले.

यसरिबचे यात्रेकरू जायला निघाले.

"मी येथले लोक हळूहळू तुमच्याकडे पाठवतो. सारे संपले म्हणजे शेवटी मी येईन." मुहंमद निरोप देताना म्हणाले.

"पाठवा. या सारे."

"जे पाठवीन त्यांचे रक्षण कराल ना ?"

"हो करू. आम्ही कडवे वीर आहोत. युद्धाची बाळे आहोत. चिलखती गडी आहोत. शूर पूर्वजांना शोभेसे आम्ही त्यांचे वारसदार आहोत. निर्धास्त रहा."

यसरिबचे लोक गेले. मुसब गेला. मक्केतील वातावरण अधिकच तीव्र झाले. जास्त काळजीपूर्वक पहारा, देखरेख सूरू झाली. कुरेशांचे हेर पाळतीवर असत.

एके दिवशी मक्केतील आपल्या अनुयायांना मुहंमद म्हणाले, "तुम्ही सारो यसरिबला जा. तेथे देवाने तुम्हाला घर दिले आहे. आधार दिला आहे. तेथे जा. येथे एखादे वेळेस सर्रास कत्तलही होईल आपली. एकदम नका सारे जाऊ. दोन दोन, तीन तीन कुटुंबे अशी जाऊ देत."

आणि मक्केतील इस्लाम घेतलेली कुटंबे यसरिबला जाऊ लागली. इ. स. ६२२ मधली ही गोष्ट. दोन महिने अनुयायी जात होते. यसरिब मक्केपासून अडीचशे मैल लांब होते. दगदगीचा कष्टाचा रस्ता; परंतु धन्य त्यांची निष्ठा. शंभर कुटुंबे गेली. मोहल्लेच्या मोहल्ले ओस दिसू लागले. रबियाचा मुलगा ओतबा म्हणाला, "प्रत्येक सुखी घर आज दुःखी होत आहे. गजबजलेल्या घरातून आता केवळ वारे भिरभिर करतील आणि हे सारे आपल्याच भावाच्या मुलामुळे. त्याने आमच्यात भेद पाडले, भांडणे निर्मिली."

येशू ख्रिस्त एकदा म्हणाले, "होय, मी शांती देण्यासाठी नाही आलो. मी तलवार देण्यासाठी आलो. मुलगा बापाच्या विरूद्ध जाईल. मुलगी आईच्या विरूद्ध जाईल. सून सासूच्या विरूद्ध जाईल."

पैगंबर असे स्वतः म्हणाले नाहीत; परंतु विरोधकांनी हेच पैगंबर करीत आहेत असे म्हटले ! नवीन क्रांतिकारक विचार जेव्हा येतो तेव्हा तेव्हा असाच देखावा दिसतो. नव्याजुन्याची ओढाताण असते.

आणि सुहैब नावाचा एक ग्रीक गुलाम होता. तो आता श्रीमंत झाला होता. नवधर्म घेऊन तोही

यसरिबला जायला निघाला.

"अरे, तू येथे आलास तेव्हा दीनदरिद्री होतास आणि आता सारी संपत्ती बरोबर घेऊन निघालास वाटते ?" त्याचा पहिला श्रीमंत व्यापारी धनी म्हणाला.

"मी संपत्ती सोडली तर जाऊ द्याल ना ?"

"जाऊ देऊ."

आणि सुहैब सारी संपत्ती सोडून, परंतु धर्माची शाश्वत संपत्ती घेऊन निघाला. मुहंमद म्हणाले, "फार फायदेशीर सौदा केला सुहैबने ! ग्रीस देशाची इस्लामला ही पहिली जोड मिळाली."

मक्केत केव्हा वादळ सुरु होईल नेम नव्हता. घरांना कुलुपे लागत होती. सारे गेले. अली. अबुबकर व मुहंमद तिघेच आता राहिले. मुहंमद निसटून जातील, अशी कुरेशांना भीती वाटली. कुरेशांची एक सभा भरली. इतरही घराण्यांचे व जमातींचे मक्केतील प्रमुख लोक तेथे बोलावण्यात आले होते. सभा जोरात चालली. प्रक्षूब्ध होते वातावरण. हा जीवनमरणचा प्रश्न आहे असे म्हणू लागले.

"मुहंमदास येथून हाकलून द्यावे." कोणी म्हणाले.

"त्याला मरेतो तुरुंगात ठेवावे." दुसरे म्हणाले.

"त्याचा खून करावा." आणखी काहींनी सुचवले.

अनेक सूचना येऊ लागल्या. एकाने खून केला तर त्याचे सारे कुटुंब व तो यांच्याबरोबर हाशिमांची व मुत्तलिबाची सूडाची लढाई सुरु होईल. तेव्हा एकट्याने खून करणे हे बरे नाही. "मी युक्ती सुचवितो" अबुजहल म्हणाला.

"अबुजहल म्हणजे अबुल हिकम - अकलेचा बाप. सांगा, तुमची युक्ती सांगा." लोक म्हणाले.

निरनिराळ्या कुटुंबांतून मारेकरी घ्यावे. त्यांनी एकदम मुहंमदांच्या अंगात तलवारी खुपसाव्या. म्हणजे खुनाची जबाबदारी त्या सर्वांवर येईल. मुहंमदांच्या नातलगांना या सर्वांच्या घराण्यांशी मग सूडाची लढाई करावी लागेल. तशी ते करणार नाहीत. त्यांची हिम्मत होणार नाही."

"वा ! असेच करावे." सारे म्हणाले.

अबुल हिकम याला अबुजहल हे नाव मुहंमदांनी दिले होते. अबुजहल म्हणजे अज्ञानाचा बाप. ज्ञानाचा बाप नसून हा मनुष्य अज्ञानाचा बाप आहे, असे मुहंमद म्हणत. महाकवी सनाई म्हणतो,

"अहमद-इ-मुर्सल निशिस्त कैरवा दारद खिरद."

"दिल असीर-इ-सीरत-इ-बू जहले-इ-काफिर दाश्तन."

तुमच्यामध्ये पैगंबर बसले असता तुमची बुद्धी तुमच्या हृदयाला अश्रद्धाळू अबुजहलच्या गुणाचे गुलाम होऊ देणार नाही.

असो. त्या रात्री मुहंमदांच्या घराभोवती मारेकरी निरनिराळ्या स्थानी बसले. मुहंमद पहाटे तरी बाहेर येतील, अशी त्यांना आशा होती. मधूनमधून ते खिडकीतून डोकावत; परंतु मुहंमद कधीच निघुन गेले होते ! अली मुहंमदांच्या बिछान्यावर पडून राहिला होता. मुहंमदांनी आपले हिरवे वस्त्र त्यांच्या अंगावर घातले होते. मुहंमदाच झोपले आहेत, असे मधूनमधून डोकावणा-या त्या मोरेक-यांस वाटत होते.

मुहंमद तेथून निसटले. ते अबुबकरच्या घरी गेले आणि दोघे मक्का सोडून रात्री बाहेर पडले. जन्मभूमी सोडून बाहेर पडले. सौर पर्वतावरील गुहेत दोघे काही दिवस लपून राहिले. हा पर्वत मक्केच्या दक्षिणेस आहे. मुहंमद निसटले, हे जेव्हा कुरेशांना कळले तेव्हा त्यांच्या संतापाला सीमा राहिली नाही. ते चवताळले. पाठलागासाठी घोडेस्वार दौडले. मुहंमदांच्या डोक्यासाठी शंभर उंटांचे बक्षीस जाहीर करण्यात आले ! एकदा तर पाठलाग करणारे गुहेच्या अगदी जवळ आले होते.

"ते येणार. आपण सापडणार. आपण दोघेच." असे अबुबकर घाबरून म्हणाले.

"दोघे का ? आपण तिघे आहोत. तिसरा परमेश्वर आहे." मुहंमद शांत श्रद्धेने म्हणाले-

त्या गुहेच्या तोंडावर कोळयाने जाळे विणले होते ! पाठलाग करणारे म्हणाले, "या गुहेत नसणारच. गुहेत शिरते तर ते जाळे कसे टिकते !" आणि ते गेले. प्रभूची जणू कृपा. त्या गुहेत रोज अबुबकरांची मुलगी गुप्तपणे अन्न आणून देई. कुरेश पाठलाग करून थकले, कंटाळले. तीन दिवसांनी पाठलाग थांबला. तिस-या दिवशी सायंकाळी हे दोघे गुहेतून बाहेर पडले. दोन उंट वाटेत त्यांनी मिळविले. उंटावर बसून निघाले. रस्तोरस्ती बक्षिसाची लालूच असलेले मारेकरी दौडत होते. एकदा तर एक घोडेस्वार पाठीस लागला.

"संपले सारे !" अबुबकर म्हणाले.

"भिऊ नकोस. ईश्वर राखील." मुहंमद म्हणाले.

पाठलाग करणा-याचा घोडा उधळला. घोडेस्वार पडला. तो चकित झाला. तो पैगंबरांजवळ आला व क्षमा मागता झाला. एका कातडयाचा तुकड्यावर क्षमा लिहून अबुबकर यानी दिली. तो घोडेस्वार गेला. तीन दिवसांच्या प्रवासानंतर दोघे यसरिबच्या दक्षिणेस असलेल्या कुब्बा गावी येऊन पोहोचले. यसरिबच्या मनो-यावरून एक ज्यू पाहत होता. त्याला हे दोघे दिसले. कुराणाच्या सहाव्या सु-यामध्ये विसावी कविता आहे. तीत पुढील मजकूर आहे.

"ज्यांना पूर्वी बायबल मिळाले, देवाचे पुस्तक मिळाले' ते मुहंमदांना ओळखतात. ज्याप्रमाणे ते स्वत:ची मुलेबाळे ओळखतात."

कुब्बा गाव फार रमणीय व समृद्ध होता. सुखी व सधन होते. खाऊनपिऊन बरे होते. या गावी मुहंमद व अबुबकर दोघांनी काही दिवस मुक्काम केला. येथे अलीही त्यांना येऊन मिळाले. मुहंमद गेल्यावर मागे अलींना बराच त्रास झाला. ते मक्केहून पायीच निघाले. दिवसा लपून राहत, रात्रभर चालत. शेवटी येऊन मिळाले. कुब्बाचा प्रमुख "येथेच रहा" असे मुहंमदांना म्हणाला; परंतु मुहंमदांसमोर कर्वव्य होते. ते यसरिबला जाण्यास निघाले. बरोबर कितीतरी अनुयायी होते.

त्या दिवशी शुक्रवार होता. इ. स. ६२२ जुलैची २ तारीख होती. त्या दिवशी मुहंमदांनी मक्का सोडली. या दिवसापासून मुहंमदी पंचांग सुरू होते. यालाच 'हिजरी सन' ही संज्ञा आहे.



# २०

# नवराष्ट्र निर्मितीचे प्रयत्न



यसरिब येथे आल्यापासून मुहंमदांच्या जीवनाची बारीकसारीक माहिती मिळू लागते. येथे आल्यापासूनचे त्यांचे जीवन जगासमोर उघडे आहे. अतिमहान, लोकोत्तर विभूती ! आईबापांच्या प्रेमाला बाल्यातच पोरका झालेला हा मुलगा. त्याचे लहानपण किती केविलवाणे ! आणि पुढे कौमार्यावस्थेतून तारुण्यावस्थेत ते आले. ते तारुण्यही किती पवित्र व सत्यमय. पुढे जरा प्रौढपणा आल्यावर पहा किती निष्ठा व प्रखरता दीनदरिद्रांसाठी अनाथां दुबळयासाठी किती कळवळा ! दुस-याचे दुःख ऐकायला, दुसयांची हाक ऐकायला कान सदा टवकारलेले. प्राणिमात्रांकडे सहानुभूतीने पाहणारे त्यांचे हदय. प्रेमाने पाहणारे त्यांचे मोठे डोळे. अत्यंत विनम्र व विशुद्ध असे जीवन. मुहंमद जाऊ लागले म्हणजे बोट करुन लोक म्हणत, "तो पहा अल अमीन चालला! सच्चा, न्यायप्रिय, विश्वासू पुरुष. प्रामाणिक विश्वासू मित्र, प्रेमळ निष्ठावंत, पती. जीवनमरणाची गुढे उलगडू पाहणारा ऋषी. मानवी कर्तव्यांचा विचार करणारा हा तत्तवज्ञ. मानवी जीवनाचे गन्तव्य काव्य, याचे चिंतन करणारा योगी. असा हा महापुरुष नवराष्ट्र-निर्मितीच्या उद्योगास आरंभ करतो. सा-या जगाला सुधारु बघतो. पदोपदी विघ्ने; परंतु हा महावीर डगमगत नाही. पदोपदी पराजय : परंतु निराशा त्याला शिवत नाही. उदम्य आत्म्याने सदैव पुढे जाण्यासाठी धडपड करतो, जीवनाचे कार्य पुरे करण्यासाठी धडपडतो. शेवटी त्याचे पावित्र्य व त्याची उदात्तता, ईश्वराच्या दयेवरची त्याची जीवंत श्रद्धा व त्याची तळमळ यांमुळे शेकडो अनुयायी त्याला मिळतात आणि शेवटी त्या सर्वांना यसरिबमध्ये सुरक्षित पाठवीपर्यंत आपण मागे वाघाच्या तोंडी राहतो! आपण सर्वांच्या शेवटी त्या उदार आश्रय देणा-या, स्वागत करणा-या यसरिबला येतो. यसरिबला आल्यावर मुहंमद सर्वांचे पुढारी झाले. जणू राजे झाले. मानवी हृदयाचे सम्राट बनले. सर्वाचे नेते बनले. ते सल्ला देणारे, तेच स्मृती देणारे तेच न्यायधीश, तेच सेनापती ! परंतू गर्व तिळभरही नाही. केवळ अगर्वता व नम्रता होऊन राहत. नवीन लोकसत्ता त्यांनी स्थापिली. ते स्वत: त्या सत्तेचे केंद्र होते. स्वत:च्या हाताने स्वत:चे कपडे शिवणारा, कधी कधी उपाशी राहणारा हा धर्मसंस्थापक पृथ्वीवरील सामर्थ्यवान सम्राटांपेक्षाही अधिक सामर्थ्यवान तो होता.

मुहंमदांचे उदात्त, उज्जवल स्वरुप जगाला दिसले इतकी वर्षे खटपट व कष्ट करुन आज त्यांचे ३००च फकत अनुयायी होते! परंतु या ३०० चे ३० कोटी पुढे होणार होते. अपरंपार पीक पुढे याचे होते. रोप वाढणार होते. त्यांची उदात्तता, अढळ मैत्री सहनशीलता, निस्सीम धैर्य, उत्कटता, तळमळ उत्साह, स्फुर्ती, प्रेरणा, सत्याची लागणी हे सर्व गुण त्यांच्या बारीकसारीक गोष्टींतून प्रकट होत होते. मुहंमद हे वीर आहेत, महान वीर आहेत, ही गोष्ट जगाला कळली. येथे लेचेपेचे मन नव्हते. निश्चयाचा महामेरु अशी ही

मूर्ती होती. त्यांच्यावर प्रेम न करणे शक्यच नव्हते. त्यांची आज्ञा न पाळाणे शक्य होत नसे हळूहळू यसरिबचे लोक त्यांच्या चरणी नमले. त्यांच्या भोवती जमले. शरीर व मन मुहंमदांना अर्पिते झाले आणि ही श्रद्धा सा-या अरबस्थानभर पेटत गेली. सारे अरबस्थान पुढे त्यांच्या चरणाशी आले. स्वत: चे कपडे शिवणा-या या मुहंमदांपेक्षा मुकुटधारी सम्राटांना अधिक मान नव्हता. माणसांवर छाप पाडण्याची अद्‌भुत शक्ती मुहंमदात होती आणि ही जी छाप पडे, ती कल्याणावह असे, मंगलावह असे.

मक्केपासून मदिनेला यायला दहा दिवस लागत. मुहंमद आले त्या वेळेस यसरिब भोवती भिंती नव्हत्या. मुहंमदांनी शहराभोवती खंदक करवाला. यसरिबच्या आसपास अमलकी लोक राहत असत. रोमन, ग्रीक व बाबिलोनच्या सदैव स्वा-यांमुळे ज्यु उत्तरेकडून खाली आले. त्यांनी अमलकींचा पराजय करुन हिजाजच्या या उत्तर भागात वस्ती केली. ज्यु आले व नीट तटबंदीच्या जागी राहिले! तेथे राहून आसपासच्या अरबांवर ते प्रभुत्व स्थापित. यसरिब शहरातही ज्यूंच्या दोन शाखा होत्या. पुढे या यसरिब शहरात औस व खजरज या दोन अरब शाखा आल्या. त्यांनी ज्यूंचे वर्चस्व कमी करुन त्यांना एकप्रकारे मांडलिक केले. परंतु आपसांत लढाया, मारामा-या सदैव चालतच. मुहंमदांनी मक्केत आपले जीवनकार्य जाहीर केले, त्या सुमारासच यसरिबमधील भांडणे तात्पुरती तरी मिटली होती.

मुहंमद आल्यावर औस व खजरज या दोन्ही अरब जमाती भांडणे मिटवून एक होऊन नवधर्म स्वीकारुन मुहंमदांच्या झेंडयाखाली उभ्या राहिल्या. या लोकांना अन्सार म्हणजे साहाय्यक असे नाव मिळाले. इस्लामच्या कठीण प्रसंगी साहाय्य केले म्हणून अन्सार अन्सारी. मक्केमधून घरदार सोडून जे मुहंमदांबरोबर यसरिबला आले त्यांना महाजिरीन म्हणजे निर्वासित लोक, परागंदा लोक असे नाव पडले अन्सार व मुहाजिरीन यांच्या खरा बंधुभाव उत्पन व्हावा म्हणून मुहंमदांनी नवीन परंपरा पाडल्या, नवीन संबंध निर्मिले. यसरिब शहराचे नावही त्यानी बदलले.मदीनत - उन् -नबी म्हणजे पैगंबराचे शहर असे नाव दिले. नबी म्हणजे पैगंगर. याचाच संक्षेप होऊन मदिना नाव झाले आणि स्वत:च्या हातांनी पहिली मशीद त्यांनी बांधली ते दगड आणीत होते. घाम गळत होता. ही पहिली मशीद जेथे बांधली गेली ती जागा दोघा भावांची होती. त्यांनी ती जागा बक्षीस दिली: परंतु हे दोघे भाऊ पोरके होते. मुहंमदांनी त्यांना जमिनीची किंमत दिली. इस्लामची ही पहिली मशीद ! ती अत्यंत साधी होती. माती-विटांच्या भिंती.ताडाच्या पानांचे छप्पर. ज्याना स्वत:चे घरदार नसेल अशांना राहण्यासाठी मशिदीचा काही भाग राखून ठेवलेला होता. येथे सारे अत्यंत साधेपणाने चाले. मुहंमद उभे राहून प्रार्थना करीत, उपदेश करीत. एका ताडाच्या झाडाला टेकून ते उभे राहत आणि हृदय उचंबळवणारे प्रवचन देत. श्रोते सर्वेंद्रियांनी जाणू पीत. मुहंमद एके दिवशी म्हणाले, जो देवाच्या प्राण्यांवर प्रेम करणार नाही, स्वत:च्या मुलांबाळांवर प्रेम करणार नाही, त्याच्यावर देवही प्रेम करणार नाही.जो जो मुसलमान उघड्या माणसाला पांघुरवील, अंवस्त्राला वस्त्र देईल, त्याला प्रभू स्वार्गात दिव्यांबरानी नटवील. एकदा भूतदयेविषयी प्रवचन चालले होते आणि मुहंमद म्हणाले, ईश्वर पृथ्वी निर्माण केली त्या वेळेस ती नवीन पृथ्वी भरभरत होती. त्याने तिच्यावर ती हलू नये म्हणून पर्वत ठेवले ! तेव्हा देवदूतांनी ईश्वराला विचारले, तुझ्या सृष्टीत पर्वतांहून बलवान काय?

' लेखंड. कारण ते पर्वतांनाही फोडते. '

' आणि लोखंडाहून बलवान काय ?'

' अग्नी ; कारण अग्नी लोखंडास वितळवतो. '

' आणि अग्नीहून प्रबळ काय? '

' पाणी. पाण्याने अग्नी विझतो.'

' पाण्याहून प्रबळ काय'

' वारा.'

' आणि वाऱ्याहून ? '

' दान देणारा सज्जन ! उजव्या हाताने दिलेले डाव्या हातालाही जे कळू देत नाही आसा दाता ! तो सर्वांहून बळी. '

मुहंमदांच्या भूतदयेच्या कल्पनेत सारे काही येई. एकदा ते म्हणाले, " प्रत्येत्क सत्कर्म म्हणजे भूतदयाच आहे. तुम्ही आपल्या भावांसमोर प्रेमाने व प्रसन्नपणे हसलात तर तीही भूतदयाच आहे. दुसऱ्याने सत्कर्म करावे म्हणुन कधी रागाने बोललात तरी तीही भूतदयाच. दानाइतकीच अशा उपदेशरुप प्रवचनांची योग्यता आहे. रस्ता चुकलेल्यास रस्ता दाखविणे, आंधळयास मदत करणे, रस्त्यातील दगडधोंडा, काटाकुटा दूर करणे, तहानलेल्यास पाणी देणे, भुकेल्यास अन्न देणे ही सारी भूतदयेचीच कर्मे. या जागात मनुष्य जे काही भले करील तेच परलोकी बरोबर येईल. इहलोकीची सत्कर्मे हीच परलोकीची पुंजी. तेच परलोक्चे त्याचे धन. मनुष्य मरतो तेव्हा लोक विचारतात, "त्याने किती मालत्ता, किती धनदौ लत मागे ठेवली आहे?" परंतु देवदूत विचारतात, "तू आपल्यापूर्वी कोणती सत्कर्मे पुढे पाठविली आहेस?"

असे सुंदर उपदेश चालत. एकदा एका शिष्याने विचारले. " पैगंगर, माझी आई मेली. तिच्या आत्म्याच्या शांत्यर्थ मी कोणते दान देऊ ? कोणते दान उतकृष्ट."

" पाणी. वाळवंटात पाण्याची टंचाई. पाण्याचा दुष्काळ. तिच्या नावाने विहीर खण व तहानलेल्यास पाणी मिळेल असे कर." मुहंमद म्हणाले.

त्या शिष्याने त्याप्रमाणे केले. त्याने विहीर खणली व म्हणाला, " ही आईच्या स्मृतीसाठी. तिच्या आत्म्यास शांती मिळो !"

आणि वाणीची भूतदया मुहंमद पुन : पुन्हा सांगत. " गोड मृदू बोला. फुकटांचे गोड बोलायला काय जाते? गोड मृदू वाणी बोला. फुकटांचे गोड बोलायला काय जाते? गोड न खुपणारी वाणी म्हणजे मोठी आहिंसा आहे. वाणी गोड असण्याकडे कोणी फारसे लक्ष देत नाही; परंतु किती तरी दु:ख यामुळे कमी होईल."

बसऱ्याचा एक रहिवासी अबुरियान एकदा पैगंबरांच्या दर्शनास आला. त्याने विचारले, "मुहंमद, वागण्याचा एखादा मोटा नियम सांग. "

कोणाविषयी वाईट बोलू नाक्नेस. पैगंबर म्हणाले.

अबुरियान लिहितो, "त्या दिवसापासून मी कोणालाही, मग तो स्वतंत्र असो वा गुलाम असो -

टाचून बोललो नाही. "

इस्लामाची शिकवण जीवन सुसंस्कृत स्निग्ध, सौम्य व प्रेमळ करायला सांगत आहे. घरात येताना सर्वांना नमस्कार करा. बाहेर जातानाही करा. मित्र व परिचित यांनी केलेला प्रणाम सप्रेम परत करावा. रस्त्यात कोणी जाणारे त्यांनाही सलाम केला तर त्यांना परत आपणही करावा. घोडयावर बसणा-याने पायी चालणा-यास आधी सलाम करावा. चालणा-याने बसणा-यास करावा. लहान समुदायाने मोठ्या समुदायास, लहानाने मोठ्यास. "

असा सुंदर धर्मप्रसार होत होता. जीवनाला नवीन वळणे मुहंमद देत होते. नवीन आचारविचार, सभ्य चालरीत, स्वच्छता, सारे देत होते. या वेळेस मदिनेत तीन पक्ष होते.

१ मुहाजिरीन व अन्सार यांचा

२ मुनाफिकिनांचा

३ ज्यूंचा

मुहाजिरीन व अन्सार यांची एकजूट होऊन त्यांची दिलजमाई झाली होती. मक्केहून आलेले व त्यांचे ज्यांनी मदिनेत स्वागत केले, त्यांचा हा पक्ष होता. या दोहोत भ्रातृभाव निर्माण झाला होता. ईश्वरासाठी व त्याच्या पैगंबरासाठी जास्तीत जास्त. करण्याची त्यांची सात्विक स्पर्धा चाले. श्रद्धावान व त्यागी लोकांचा हा जथा होता. बलिदानार्थ सिध्द झालेल्या वीरांचा हा संघ होता.

मुनाफिकीन म्हणजे असंतुष्ट दुसरा पक्ष असंतुष्टांचा होता. अर्धवट सहानुभूती दाखविणा-यांचा, संधिसाधूंचा हा पक्ष. त्यांचा नेता अब्दुल्ला इब्न उबय हा होता. मदिनेचे आपण राजा व्हावे, अशी त्याची महत्त्वाकांक्षा होती. मुहंमदांच्या येण्यामुळे त्याचे सारे बेत फिसकटले. इस्लामचा स्वीकार करायलाही त्याला लोकांनी भाग पाडले. त्याने वरपांगी नवधर्माचा स्वीकार केला; परंतु तो व त्याचे लोक केव्हा उलटतील त्याचा नेम नव्हता. धोकेबाज व दगलबाज ते होते. त्यांच्यावर सदैय जागरुकपणे पाळत ठेवण्याची जरुर असे; परंतु मुहंमद आशेने होते. हे सारे एक दिवस आपणास मिळतील असे ते म्हणत. धीर धरून ते होते. पुढे हा अब्दुल्ला मरण पावला. त्यामुळे हा मुनाफिकीन पक्ष जरा हातबल झाला.

तिसरा पक्ष ज्यूंचा. हा सर्वांत मोठा धोका होता. या ज्यूंचे कुरेशांजवळ व्यापारधंद्याचे संबंध असत. तसेच नवीन धर्म जो इस्लाम, त्याला विरोध करणा-या अनेक गटांशी व भागांशी त्यांचे संबंध होते. मुहंमदाच्या शिकवणीकडे प्रथम ते सहानुभूतीने बघत ; परंतु त्यांचा जो अंतिम पैगंबर येणार होता तोच हा, असे मानायला ते तयार नव्हते. मुहंमद एक सामान्य धर्मोपदेशक आहेत. पैगंबर असलेच तरी खालच्या दर्जाचे आहेत, असे ते म्हणत. ज्या औस व खजरज या अरबी जमातींच्या आतिथ्यामुळे मुहंमदांचे आसन स्थिर होत होते, त्या दोन्ही जमाती ज्यूंना प्रिय नव्हत्या. त्या पूर्वीच्या शत्रू होत्या. त्या वैरस्मृती नष्ट नव्हत्या झाल्या. मुहंमदांना आपल्या बाजूस घेऊन अरबांना जिंकावे, नवराज्य स्थापावे, असे ज्यूंच्या मनात होते. म्हणून प्रथम पैगंबरांच्या स्वागतसत्कार समारंभात तेही अर्धवट उत्साहाने सामील झाले होते. काही दिवस जरा सबुरीने शांतीने ते राहिले; परंतु महिना झाला असेल नसेल तोच त्यांनी बंड सुरु केले! ज्यूंची उपजतच बंडखोर वृत्ती. त्या वृत्तीमुळेच त्यांनी स्वत:चे पैगंबर क्रॉसवर चढविले !



# २१

# नवशासनतंत्र



मदिनेत आल्यावर मुहंमदांचे पहिले काम हे होते की मदिनेमधील सा-या परस्परभिन्न जातिमातींचे ऐक्य करुन एक लोकसत्ताक राज्य. बनविणे त्यांचे एक संघराज्य करणे. त्यांनी हक्कांची एक सनद दिली. तीत मुसलमानांनी एकमेकिविषयी कर्तव्ये तसेच मुसलमान व ज्यू यांचे अन्योन्य संबंध कसे असावेत, याविषयी नीट खुलासा केलेला आहे. ज्यूनीही हा करार मान्य केला होता. ह्या करारावरुन मुहंमदांचे व्यापक व थोर मन, तशीच त्यांची व्यवहारी बुद्धिमत्ता ही दिसून येतात. मुहंमद हे लोकोत्तर बुद्धीचे महान मुत्सद्दी होते. केवळ विध्वंसक, जुन्याची पाडापाड करणारे नव्हते तर विधायक वृत्तीही त्यांच्याजवळ होती. अरबस्थानात तो काही मांलमसाला मिळाला, ज्या नाना जातिजमाती होत्या, त्यांनाच हाताशी धरुन माणुसकीच्या विस्तृव व विशाल पायावर ते नवशासन तंत्र निर्मू पाहत होते.

विशाळा पावना बुद्धि । विशाळा सुखकारकी ।।

ही जी समर्थ रामदासानी सांगितलेली बुद्धी तशी मुहंमदांची होती. ही जी हक्कांची सनद किंवा करार त्यात आहे.

जो परम दयाळू परमेश्वर, त्याच्या नावे ही सनद मुहंमद पैगंबर मुस्लिमास देत आहेत. मुस्लिम कोठलेही आसोत कुरेश असोत वा मदिनेचे असोत, कोणत्याही ठिकाणी जन्मलेले असोत, ते सारे मिळून एक राष्ट्र होईल. असे लिहुन नंतर मुस्लिमांनी एकमेकांशी कसे वागावे त्याचे नियम दिले आहेत. पुढे ही सनद सांगते:

शांती वा युध्द कोणतेही परिस्थिती असो, ती सर्व मुस्लिमांस समान बंधनकारक आहे. स्वतः च्या धर्माच्या शत्रुशी परभारा तह वा लढाई कोणीही करावयाची नाही. ज्यूही आमच्या लोकसत्तेत समील होत आहेत. तेव्हा त्यांचा अपमान आम्ही होऊ देणार नाही. त्यांना कोणी सतावणार नाही, याची आम्ही काळजी घेऊ. आमच्या मदतीवर व सदिच्छेवर आमच्या लोकांच्याइतकाच त्यांचाही हक्क आहे. या यसरिबचे सर्व शाखांचे ज्यू व मुसलमान मिळून एक संयुक्त राष्ट्र होईल. ज्यूंना पुर्ण धर्मस्वातंत्र्य आहे. त्यांचे पक्षकार व मित्र यांनाही स्वातंत्र्य आहे, संरक्षण आहे. मात्र जे गुन्हेगार ठरतील त्यांना अवश्य शासन केले जाईल. सर्व शत्रूंविरुद्ध मदिनेचे रक्षण करण्याच्या कामी ज्यू मुसलमानांना मिळतील. हा करार पाळणा-यास मदिनेचा अंतर्भाग पवित्र रहील. मुसलमानांचे व ज्यूंचे जे संरक्षित लोक असतील, दोस्त असतील, तेही सन्मान्य मानले जातील. जे खरे मुसलमान असतील ते अपराध करणा-यांस, अशांती पसरवणा-यास, अन्याय्य वर्तन करणा-यास दूर ठेवतील. अगदी जवळाचा नातलग असला तरी त्याचीही गय करणार

नाहीत.

यापुढे मदिनेचा अंतर्गत कारभार कसा चालवायचा त्यासंबंधी लिहून शेवटी म्हटले आहे की: अत : पर जे कोणी हा करार मानतात ते आपली सारी भाडंणे ईश्वराच्या आदेशाने त्यांचा निर्णय व्हावा म्हणून पैगंबरांकडे आणीत जातील.

या कराराने मदिनेतील भांडणांना मूठमाती मिळाली. आतापर्यंत जो तो आपल्याच हाती न्याय घेत असे. सुड घेत असे. अत:पर हे बंद झाले. नवराष्ट्र निर्माण झाले. मुहंमद पहिले न्यायमूर्ती झाले. ते पैगंबर होते म्हणूनही व लोकांचा नि त्यांचा तसा खरोखरच संबंध होता म्हणूनही. ज्यूंच्या काही शाखा मदिनेच्या आसपास राहत असत. त्यांचा या करारात प्रथम अंतर्भाव नव्हता; परंतु काही दिवसांनी त्यांनीही हा करार मान्य केला.

प्रथम प्रथम ज्यूही प्रार्थनेस येत, प्रवचन ऐकत. नंतर होणा-या चर्चेत भाग घेत. प्रार्थनेच्या वेळेस प्रथम जेरुसलेमकडे सारे तोंडे करीत. ज्यूंची प्रीती मिळावी, ज्यूंना परके वाटू नये म्हणून महंमद किती जपत होते! मोझेस, खिस्त वगैरे पूर्वी होऊन गेलेल्या पैगंबराविषयी मुहंमदांना अत्यंत आदर वाटत असे; म्हणून जेरुसलेमकडे तोंड करण्यात त्यांना अवघड वाटले नाही. त्यांनीही एकश्वरी धर्मच, निर्गुण निराकार परमेश्वराचाच धर्म दिला होता. ज्यूंनाही तिकडे तोंड केले म्हणजे समाधान वाटेल व पैगंबराविषयी आपलेपणा वाटेल असे सर्वांना वाटत होते; परंतु मुहंमदांनी कितीही आपलेपणा व औदार्य दाखविले तरी ज्यू प्रसन्न झाले नाहीत. अरबस्थानाचे ज्यूस्थान करण्याचे का त्यांच्या मनात होते ? मुहंमदाला आपल्या हातचे एक साधन बनवावे असे का त्यांना वाटत होते ? परंतु मुहंमद तर सत्ताधीश झाले. ज्यू जळफळू लागले आणि शेवटी या नव धर्माच्या शत्रुंना ते मिळाले! मुहंमदांचा धर्म साधा होता. ज्यूंच्या धर्मातुन जेवढे घेणे शक्य तेवढे त्यांनी घेतले होते. आणखी घेणे म्हणजे व्यापक धर्माला कमीपणा आला असता.

ज्यूंचा विरोध वाढु लागला. ते सातवू लागले. कुराणातील शब्दांचा, वाक्यांचा मुद्दाम वेडावाकडा चुकीचा उच्चार करीत व त्यामुळे सुंदर अर्थ विकृत होई. ज्यू मुहंमदांना मुद्दाम कठीण प्रश्न विचारीत. कुराणातील ज्यूंसंबंधीचा मजकूर चुकीचा आहे म्हणत. मुहंमद म्हणत, मी नाही चुकलो. तुम्हीच तुमच्या पुस्तकात बदल केला असेल. तुम्ही त्यांतला मजकूर दडपून टाकला असेल." नवधर्माचा उपहास करण्यासाठी ते स्वत:च्या धर्मासंबंधीही खोटे बोलू लागले. ते मूर्तिपुजाच खरा धर्म आहे असे म्हणून लागले. इस्लामची नालस्ती करु लागले. कोणी जर "तुम्हाला इस्लाम आवडतो की, मूर्तिपुजा " असा प्रश्न केला तर खुशाला "मूर्तिपूजा" असे उत्तर देत. त्यांनी जयू कवी, कवयित्र्य यांचेही रान उठविले. काव्यातील इस्लामच्या नालस्तीला सीमाच राहिली नाही! मुस्लिम स्त्रियांसंबंधीही वाटेल ते अभद्र त्यातुन असे पैगंबरांची, मुस्लिम भगिनींची नालस्ती व बेआब्रु करूनच ते राहीले नाहीत तर मदिनेच्या शासनसंस्थेशीही त्यांनी द्रोह. मांडला. मक्केच्या कुरेशांना मदिनेतील मुसलमानांचे बळ किती आहे वगैरे माहिती त्यांनी पुरविली. ज्यु व असंतुष्ट अब्दुल्ला - उबय याचा मुनाफिकीन पक्ष हे कुरेशांशी कारस्थाने करु लागले "मुहंमदांशी आम्ही केलेला करार वरपांगी आहे. तुम्ही मदिनेच्या दरवाजात येताच आम्ही तुम्हा मूर्तिपुजकांस मिळू ! असेही त्यांनी कळविले. मदिनेत या राष्ट्रद्रोह्यांचा, दगलबाजांचा सुळसुळाट झाला. मदिनेची सत्त्वपरीक्षा होती. बाहेरुन

हल्ला आला व आतही बंड झाले तर?

मुहंमदांसमोर कठीण समस्या होती. पैगंबर या नात्याने त्यांनी सारे अपमान सर्व निंदा यांना पोटोत घेतले; परंतु आपल्या लोकांच्या स्वातंत्र्याचे व जीविताचेही ते आता रखवालदार होते. ते केवळ आता धर्मसंस्थापक नव्हते तर राज्याचे प्रमुख होते अणि वेळही कठीण होती. सर्वत्र युद्धाचे वातावरण होते. मदिना स्वत:च्या बचावासाठी तयार होत होती. अशा वेळेस लष्करी शिस्त लागते. गुळमुळीत धोरण सर्वनाशी ठरते. अशा वेळेस स्वजनद्रोह अक्षम्य असतो. त्या द्रोहाची उपेक्षा करून चालत नसते. पैगंबर या नातयाने मुहंमदानी ज्यूंच्या कारवायांकडे दुर्लक्ष केले असते, केलेही; परंतु मदिनेचे रक्षक व शासक या नात्याने त्यांने दुसरे कर्तव्य होते. सहासात जणांना पकडण्यात आले. त्यांतील काहींना हद्दपार करण्यात आले. काहींना देहान्त शासन मिळाले! मुहंमद मदिनेची अशी तयारी करीत आहेत तोच कुरेशांचे सैन्य आल्याची बातमी आली.



# २२

# रक्ताचे पाट वाहिले !



वास्तविक मुहंमदांचा किती प्रेमळ स्वभाव ! अपरंपार करुणेचे ते सिंधू होते. कोठेही कोणी दुःखी दिसला तर ते द्रवत, त्यांचे डोळे भरुन येत. अरब लोक मर्द, परंतु मुहंमद तर स्त्रीप्रमाणे रडत ! एखादा अनुयायी मेला, मुले मेली तर त्यांचे डोळे भरत. 'बायकी स्वभावाचा', असे त्यांचे शत्रु त्याना म्हणत. अशा त्या करुण्यमूर्तीला परिस्थितीमुळे हाती शस्त्र धरावे लागले.! स्वत : च्या लोकांच्या संरक्षणासाठी, बाल्यावस्थेतील नवराष्ट्राच्या रक्षणासाठी ते संघटित सेना उभारु लागले. आपल्यावर एकदम हल्ला होऊ नये म्हणून पुढे जाऊन हल्ले करावे लागले. ते टेहळणी करणा-या तुकड्या पुढे पाठवित; कारण अरब रात्री किंवा अगदी उजाडत अचानक हल्ले करतात.

मक्कावाले मदिनेच्या जवळ मुसलमानांची फळझाड तोडीत, लुटालुट करीत आले. शेळयामेंढ्यांचे कळप त्यांनी लांबविले. अबु जहल एक हजार लोक घेऊन मदिनेवर चालून आला. त्यांचा एक तांडा युद्धाची सामुग्री घेऊन येत होता. त्याचे रक्षण करणे व मदिनेतील मुसलमानांचा नाश करणे, हे अबु जहलचे काम होते. मदिनेवर अबु जहल येत आहे हे मुसलमानांना आधीच कळले. म्हणून ते बाहेर बद्रची दरी होती तेथे जाऊन बसले. तीनशे तेरा निवडक लोक घेऊन मुहंमद तेथे तयार होते. अबु जहल येत होता. मुहंमदांनी आकाशाकडे हात केले व म्हटले, प्रभो, तु मदतीचे दिलेले अश्वासन विसरु नकोस. तू नभोवाणी दिली आहेस. माझी ही धर्मभीरुंची, शूरांची सेना नाश न पावो. देवा, हा शूरांचा जथा जर नष्ट झाला, तर तुझी विशुद्ध पूजा कोण करील?

कुरेशांचे सैन्य आले. त्या सैन्यांतून तिघे पुढे आले व म्हणाले, "तुमच्यातून तीन निवडा. तिघांचा सामना होऊन लढयांचा उघड निकांल ठरवू." मुहंमदांकडील हमजा, अली व ओबैदा यांनी हे द्वंद्वयुध्दाचे आव्हान स्वीकारले आणि ते तिघे विजयी झाले ; परंतु कुरेश वचन पाळणारे थोडेच होते? त्यांनी एकदम हल्ला चढवला आणि खणाखणी सुरु झाली. हातघाईची लढाई. आपण हरणार असे मुहंमदांना वाटू लागले. शत्रूचे तिप्पट सैन्य होते आणि एकाएकी वादळ उठले. जणू देवाची मदत आली. मुहंमदानी रफूर्तिप्रद संदेश दिला, हा पहा परमेश्वर आला. हे पहा वारे उठले." आणि ते तीनशे जणू तीन हजार झाले! वाळूचे लोट उठले. जणू देवदूत येऊन लढू लागले. मक्कावाले हटले, माघार घेऊ लागले. त्यांचे पुष्कळ पुढारी मारले गेले. अबु जहल मारला गेला. पुष्कळ कैदी झाले. त्यांतील फक्त दोघांचा शिरच्छेद करण्यात आला. अरबांच्या युध्दनीतीप्रमाणे ही शिक्षा झाली. इतर कैद्यास माणुसकीने वागविण्यात आले. मुहंमद आपल्या अनुयायांना म्हणाले, "आपत्तीत अपमान करु नका. सहानुभूतीने दयेने वागवा." हे कैदी ज्या मुसलमानांच्या

स्वाधीन होते, त्यांनी मुहंमदांची आज्ञा पाळली. जेवतानाही त्या कैद्यांना ते आपल्याबरोबर घेत, आपले अन्न त्यांना देत. आपली भाकर त्यांना देऊन स्वत: नुसता खजूर खात. या कैद्यांपैकी एक जण पुढे म्हणाला, "धन्य या मदिनेवाल्या मुसलमानांची. ते पायी चालले व त्यांनी आम्हास घोड्यावर बसवले. त्यांनी आम्हास गव्हाची रोटी दिली जरी त्यांना खजुरावर राहणे भाग पडे. मदिनेत ज्यांच्याजवळ घरेदारे होती अशांकडे हे कैदी वाटून दिले होते!

जी लूट मिळाली तिच्या विभागणीविषयी भांडणे सुरु झाली! मुहंमदांनी स्वत: सर्वांना सारखी वाटून दिली आणि पुढे अशी भांडणे होऊ नयेत म्हणून काही नियम घालून दिले. कुराणात एक स्वतंत्र प्रकरणच (सुरा) आहे. अल-अनफाल म्हणजे लुटीविषयी. "जो शासनसत्तेचा प्रमुख असेल तो वाटणी करील. लुटीतील पाचवा हिस्सा सार्वजनिक तिजोरीत जमा होईल. त्यातून गरीब व गरजू यांना मदत दिली जाईल."

या बद्रच्या लढाईचा नैतिक परिणाम मोठा झाला. परमेश्वराचा आपणास पाठिंबा आहे असे मुस्लिमांनाना वाटू लागले. त्यांना उत्साह मिळाला. स्फुर्ती संचरली. कुराणामध्ये परमेश्वराच्या युध्दात देवदूत कसे भाग घेतात, याची उदात्ता, भव्य काव्यमध्ये वर्णन आहेत. येशु व इतर संत महात्मे मानतात त्याप्रमाणे मुहंमदही परमेश्वर व मानवजात यांच्यामध्ये जा-ये करणारे देवदूत असतात असे मानीत असावेत. प्राचीनांचे जे देवदूत ते आजचे निसर्गनियम झाले आहेत ! परंतु खरोखर देवदूत म्हणून काही आहे का? देवालाच माहीत. मुहंमद 'असत्' चे ही एक तत्व मानीत. असत्तत्वाचे अस्तिव मानीत.

हे तुमचे असत हा सैतान राहतो कोठे ? असा एकाने एकदा पैगंबरास प्रश्न केला.

" तुमच्या ह्दयात, मनुष्याच्या ह्दयात." मुहंमदानी उत्तर दिले. खिस्ती धर्मात तो नरकाच्या सम्राट आहे. मुहंमद इतके मूर्तत्व त्याला देत नाहीत. असतचे अमूर्त तत्त्व ते मानीत असे दिसते.

त्यां लढाईत शत्रुपक्षाकडचे जे पडले होते त्यांना एका मोठ्या खड्ड्यात मुठमाती देण्यात आली. स्वत: मुहंमद तेथे होते. एकेकाचे नाव घेऊन त्यला मूठमाती दिली जात होती. मुहंमद गंभीरपणे म्हणाले, "अरे, तुम्ही सारे माझेच जातभाई होतात. मी खोटे बोलतो असे तुम्ही म्हणत असाल. काहींचा माझ्यावर विश्वास होता. तुम्ही मला घराला परागंदा केलेत; परंतु दुस-यांनी माझे स्वागत केले. आणि आता तुमची काय ही दशा झाली? देवाची अवकृपा झाली की असे व्हावयाचेच."

ज्या दोन कैद्यांचा शिरच्छेद झाला त्यांतील एकाचे नाव ओकबा असे होते. वधस्थळी नेले जात असता ओककबाने विचारले, "माझ्या मुलाबाळांना कोण?" त्या वेळेस मुहंमदांनी "नरकाग्नी"असे उत्तर दीले, असे काही पाश्चिमात्य चरित्रकार म्हणतात व मुहंमद किती निर्दय होता ते रंगवतात; परंतु हा गैरसमज आहे. ओकबा ज्या जमातीचा होता; ती जमात स्वत : ला बनी उन - नाद म्हणजे अग्नीचे वशज असे म्हणत. या नावारुन ही दंकथा शत्रुंनी निर्मिली असावी. मुहंमदाना मुले किती प्रिय वाटत हे ज्यांना माहीत आहे, विशेषत : अनाथ पोरक्या मुलांविषयी व गतधवांविषयी कुराणात जे शेकडो सह्दय उल्लेख आहेत ते ज्यांना माहीत आहेत, ते वरील गोष्ट सत्य मानणार नाहीत.

'यतो धर्म स्ततो जय:' असे आपण म्हणत असतो. बद्रच्या लढाईने तरी हे दाखविले. आपली बाजू सत्याची आहे मुहंमदांच्या अनुयायांना नक्की वाटले. या लढाईच्या वेळेस मुहंमदांची आवडती मुलगी रुकैय्या ही मरण पावली. अबिसिनियांतून परत आलेल्या उस्मानजवळ तिचा नुकताच विवाह लागला होता.पैगंबराना अश्रू गाळावयास वेळ नव्हता ! कुरेश कैद्यांना त्यांनी मोकळे केले. हे कैदी मक्केला माघारी गेले. ते मुहंमदांची स्तुतीच गाऊ लागले. कुरेश पढा-यांना हे आवडले नाही. अबु सुफियान हा दोनशे लोक बरोबर घेऊन मारु किंवा मरु अशा निश्चयाने निघाला. विजेसारखा तो आला. आसपासची मदिनंवाल्यांची फळझाडे तोडू लागला. बाहेर येणारे जाणारे मारु लागला. मदिनावाले बेसावध होते; परंतु तेही सूड घ्यायला बाहेर पडले. तेव्हा अबु सुफियानचे लोक खाण्याच्या पिशव्या टाकून पळून गेले. पिठाच्या थैल्यांची लढाई म्हणून ही प्रसिध्द आहे. ( सवीकांच्या पिशव्यांनी लढाई : सवीक हा एक खाण्याचा पदार्थ आहे. अरब लोक हिरवे दाणे भाजतात. मग ते दळतात. त्यात साखर व खजूर मिसळून प्रवासात खातात.) याच लाढाईच्या वेळची ती सुंदर सहृदय सत्यकथा आहे. मुहंमद त्यांच्या तळापासुन जरा दूर एकटेच एका झाडाखाली झोपले होते. इतक्यात कसल्या तरी आवाजाने ते जागे झाले. समोर पाहतात तो दरथुर उभा. दरथुर हा शत्रूपक्षाचा होता. मोठा वीर होता.

आता तुला कोण वाचवील ? तो मुहंमदाना म्हणाला.

" प्रभू" मुहंमद म्हणाले.

वाळवंटातील तो बेदुइन हे शांत सश्रध्द उत्तर ऐकून चकित झाला ! त्याच्या हातातील तलवार गळून पडली ती एकदम मुहंमदांनी उचलली.

"दरथूर आता तुला रे कोण वाचवील ?" मुहंमदांनी विचारले.

" अरेरे, कोणी नाही वाचवायला !" तो म्हणाला.

" माझ्यापासुन दयाळु होण्यास शीक." त्याची तलवार परत करुन पैगंबर म्हणाले.

त्या अरब वीराचे हृदय विरघळले. तो पुढे पैगंबरांचा अत्यंत निष्ठावंत अनुयायी झाला.



# २३

# ज्यूंशी झगडा



मक्केचे मूर्तिपूजक सूडासाठी जळत होते. मोठ्या युध्दाची त्यांनी पुन्हा तयारी चालविली. त्यांनी इतरही जतिजमाती बोलावल्या. तीन हजार सेना सिध्द झाली. तो निर्दय व करारी अबु सुफियान मुख्य नेता झाला. सेना निघाली. मदिनेच्या ईशान्येस तळ देऊन बसली. एक टेकडी व दरीच काय ती मध्ये होती.येथे तळ देऊन हे सैन्य मदिनेस सतावू लागले. शेते, फळांच्या बागा सारे उद्‌ध्वस्त करु लागले.शेवटी मुहंमद एक हजार लोकांनिशी बाहेर पडले ; परंतु ऐन वेळी ज्यूंच्या चिथावणीमुळे अब्दुल्ला इब्न उबयाचे तिनशे लोक फुटले. हे मुनाफिकीन होते. ते अलग झाले. लाढयाला येत ना. तरी मुहंमद कचरले नाहीत. रात्रीच्या वेळेस ते हळूच बाहेर पडले. ओहोद टेकडी त्यांनी गाठली. रात्रभर टेकडीवर राहून सकाळी प्रार्थाना करुन ते निघाले. अर्धचंद्राकार रचनेने शत्रुसैन्य पुढे आले. अबु सुफियान त्यांच्या देवदेवतांच्या मुर्ती मध्ययभागी होत्या. ओहोदची टेकडी मदिनेपासून तीन मैलांवर होती. मुहंमदांनी काही तीरंदाजांना उंच जागी मागे ठेवले. जागचे हलू नका सांगितले अणि निघाले. कुरेशांचा पाहिला हल्ला पिटाळला गेला. हमजाची बहादुरी अपूर्व होती. परंतु तिरंदाज कर्तव्य विसरले. ते एकदम विजयच मिळाला असे समजून लुटालूट करायला निघाले! शत्रुपक्षाकडील खलिद बिन वलीद याच्या लक्शात ही चूक आली. तो एकदम आपले घोडदळ जमवून महंमदांच्या पिछाडीवर तुटून पडला. मुसलमान मध्ये सापडले.शूर हमजा या लढाईत पडला! आणखीही मोठमोठे मोहरे प्राणास मुकले. अली, उमर, अबुबकर सारे जखमी झाले. शत्रूंया मुहंमदांवर डोळा होता. काही एकनिष्ठ अनुयायांची मांदी मुहंमदांभोवती होती. मुहंमद जखमी झाले होते. रक्त गळत होते. एक अनुयायी ते थांबवू पाहत होता. त्याच्या हाताचे तशा प्रसंगातही पैगंबरानी प्रेमाने चुंबन घेतले. किती प्रेमळ त्यांचे हृदय ! आणि प्रेमळ हृदये त्यांच्या आसपास मरत होती; परंतु इतक्यात अली आपल्या शूर अनुयायांसह मुहंमदांच्या बचावासाठी धावून आले. मुहंमदासह ते ओहोद टेकडीवर परत आले. अलीने आपल्या ढालीतून पाणी आणले. त्याने प्रेमाने मुहंमदांचे तोंड धुतले, जखमा धुतल्या अणि भर दुपारी सर्वांनी प्रार्थना केली. कुरेशही थकले होते. मदिनेवर चालून जाण्याचे किंवा टेकडीवर प्रार्थना करणा-यांवर चढाई करण्याचे त्यांना धाडस झाले नाही. मुहंमदांकडील जे धर्मवीर मरुन पडले होते, त्यांची प्रेते छिन्नभिन्न करीत ते बसले. त्या वीरांच्या मृतदेहांची ते विटंबना करीत होते. अबुसुफियानची पत्नी हिंद व इतर कुरेश स्त्रिया,ज्या लढायांत हुरुप व उत्साह द्यायला आल्या होत्या, त्यांनी क्रुरपणाची कमाल केली. त्या बायांनी शूर व दिलदार हमजाचे काळीज कापून घेतले ! मृत वीरांचे कान कापून घेतले, नाके कापून घेतली. त्यांचे अलंकार करून त्यांनी कानात गळयात घातले. त्यांची काकणे करुन हातात घातली. ही विटंबना पाहून शांतमूर्ती व क्षमामूर्ती मुहंमदही सात्त्विक संतापाने लाल झाले. ते संतापाने म्हणाले,

“अत:पर यांनाही असेच वागवू.”परंतु पुन्हा शांत झाले व म्हणाले, “नको, असे नको. अन्याय सहनशीलपणे सोसू या. सहन करु या. जो शांतीने सहन करील त्याचेच कल्याण होईल.बुरे सोसणा-याचे भले होईल.” मुहंमदांच्या या उद्‌गारांनी मुसलमानांना शत्रूशी दिलदारपणे वागावयास शिकविले आहे. शत्रूची विटंबना करणे, हालहाल करुन मारणे ही गोष्ट मुस्लिम धर्मास संमत नही . मुहंमदांना हे पसंत नव्हते. पाहिल्या महायुद्धात शत्रुच्या कैद्यास सर्वांत चांगल्या रीतीने तुर्कस्थानने वागविले, असे सा-या राष्ट्रांनी कबुल केले.

या लढाईत अनिर्णितच सामना राहिला. कुरेशही माघारी गेले. मुहंमद मदिनेत परत आले, परंतु आपण हताश झालेलो नाही, निरुत्साही झालेलो नाही हे दाखविण्यासाठी शत्रूचा पाठलाग करण्यासाठी त्यांनी एक टोळी पाटवली. अबु सुफियान त्वरा करुन मक्केस पोहोचला. “ लवकरच तुमचे निर्मूलन करण्यासाठी पुन्हा येऊ ” असा त्याने निरोप पाठविला. तो निरोप ऐकून महंमद म्हणाले, “ आमच्याबरोबर परमेश्वर आहे तेवढा पुरे. तोच खरा संरक्षक ! ”

आसपासच्या टोळयाही मदिनेस आता वरचेवर त्रास देऊ लागल्या. मुहंमदानी ताबडतोब या गोष्टीचा बंदोबस्त केला. काही जमाती आम्हास उपदेश करयला कोणी पाठवा. आम्ही मुसलमान होऊ असा निरोप पाठवीत ; परंतु प्रचारक गेले की, त्यांची कत्तल करीत. एकदा असे सत्तर जण मारले गेले. नवधर्माची सत्त्वपरीक्षा प्रभूने चालविली होती. बालिदानाच्या पाया घातला जात होता. शुद्ध बी पेरले जात होते.

एकदा बनी आमिर जातीचे दोन नि:शस्त्र लोक मुहंमदांपासून संरक्षण घेऊन जात होते; परंतु मुहंमदांच्या एका अनुयायाकडून चुकीने ते शत्रु पक्षाचे समजून त्यांतील एकजण मारला गेला. मुहंमदांनी त्याच्या कुटुंबास नुकसान भरपाई देण्याचे ठरविले. मदिनेत मुहंमद ‘दियत’ म्हणजे नुकसानभरपाईची रक्कम गोळा करु लागले. ते ज्युंजवळही मागायला गेले; परंतु ज्यू टाळटाळ करु लागले. इतकेच नव्हे तर मुहंमदाना दगा करण्याची त्यांची लक्षणे दिसू लागली. मदिनेतील लोकसत्तेविरद्ध ज्यू कारवाया करु लागले. ते बाहेरच्या जातिजमातींनाही चिथांवणी देऊन उठवू लागले. पैगंबरानी दोघांना मरणाची शिक्षा दिली. शहरात दंगाधोपा होऊ नये, रक्तपात टाळावा, परंतु शासनही व्हावे या हेतुने या दोघांचा निमूटपणे अज्ञात माणसाकडून वध करण्यात आला ! त्या वेळेस कोर्ट, कचे-या, कोर्ट मार्शल किंवा इतर शांततेच्या काळातील सुव्यवस्था नव्हती; म्हणुन मुहंमदांना असे करावे लागले. ते फसवून खून नव्हते करवले, तर ती शिक्षा देण्यात आली होती ! बनी कैनुकाच्या लोकांना मदिनेतून हाकलून देण्यात आले. त्याचे कारण असे झाले की, एकदा एक मुस्लिम कुमारी बाजारातून जात असता एका जयूने तिचा आपमान केला. एक जाणा-या मुस्लिमाने मुलीची बाजू घेतली . तो ज्यु झटापटीत मारला गेला. इतर ज्यू धावून आले. तो मुसलमानही मारला गेला. तेथे लढाईच सुरु झाली. मुहंमद तेथे धावून आले. त्यांनी सर्वांना शांत केले. परंतु मदिनेचे वातावरण शांत कसे होणार? तेव्हा मुहंमदानी या ज्युंना जायला सांगण्याचे ठरवले. बनी कैनुकाचे लोक हे करारागीर वर्गाचे होते. त्यांची शेतीभाती वगैरे नव्हती. तेव्हा त्यांना जा म्हणून सांगण्यात काही नुकसान नव्हते; परंतु ते मुहंमदाना म्हणाले, अरे मुहंमदा, कुरेशांचा पराजय केलास म्हणून चढून जाऊ नकोस.

कुरेशांना युध्दकला नीट माहीत नाही. आमच्याशी दोन हात करायची इच्छा आहे का ? ये कर. आम्ही मर्द आहोत. तुझी खुमखुमी जिरवू "असे बोलून बनी कैनुकाच्या जमातीचे ज्यू आपल्या गढीत जमले व मुहंमदांची सत्ता झुगारते झाले. त्यांनी बंड उभारले. मुहंमदानी त्यांच्या गढीला वेढा दिला. पंधरा दिवसांनी ते शरण आले. मुहंमद म्हणाले", इस्लामी धर्म स्वीकारून या लोकसत्तेत सामील होणार असाल तर राह. नाहीतर मदिना सोडून जा. ते गेले.

आता बनी उन - नझीर या जमातीचे ज्यू राहिले होते. त्यांच्या मनात शल्य टोचत होते. मुहंमद जेव्हा 'दियत' मागायला गेले तेव्हा बरा सापडला असे त्यांना वाटले ! मुहंमदांनी त्यांची हालचाल जाणली व स्वत:ला व आपल्या अनुयायांना वाचविले. मुहंमदांनी यांनाही "मदिना सोडून जा. राहायचे असेल तर इस्लामी होऊन रहा." असा निरोप पाठवला. त्यांनीही पूर्विच्या ज्यूंसारखेच घमेंडी उत्तर पाठविले. ते आपल्या गढीत एक होऊन बंड करते झाले. मुनाफिकीनाची आपणास मदत होईल, असा त्यांना भरवसा होता; परंतु ती मदत मिळाली नाही. गढील वेढा घालण्यात आला. पंधरा दिवसांनी शरण आले. मुहंमद म्हणाले, "राहायचे असेल तर इस्लामी बनून, लोकसत्तेत सामील व्हा. नाही तर जा." ते जायला निघाले." हत्यारांशिवाय बाकीचे सारे तुमचे घेऊन जा." असे मुहंमदांनी सांगितले. जाण्यापूर्वी आपली घरेदारे मुसलमानांना उपयोगी पडू नयेत म्हणून ती मोडूनतोडून मग ज्यू निघून गेले!

मुहंमदांबरोबर मक्केची घरेदारे सोडून जे लोक आले होते त्यांना मदिनेतील मित्रांकडे वाटून देण्यात आले होते. त्यांना घरदार काही नव्हते; परंतु या लोकांना ही ज्यूंची घरे द्यावी असे मुहंमदांच्या मनात आले. अन्सार जरी या मुहाजिरीनाला मदत करीत होते तरी त्यांची कुचंबणा होत होती. मुहंमद अनसारांना म्हणाले," देऊ का ज्यूंची घरे, जमिनी व हत्यारे मक्केहून आलेल्यांना? " अनसार आनंदाने म्हणाले, " द्या. द्या. ज्यूंचे द्याच.परंतु तेवढ्याने भागणार नाही म्हणून आमच्या मालमत्तेतीलही त्यांना काही द्या." मुहंमदांनी मुहाजिरीनांना व अनसारांतीलही दोघा दरिद्र्यांना ज्यूंची घरेदारे, शेतीवाडी वाटून दिली अत:पर अशी रुढीच पडली की, प्रत्यक्ष लढाईत न मिळालेली अशी शत्रूंची मालमता राज्याच्या मालकीची समजावी. ह्या मालमत्तेची विल्हेवाट कशी लावायची ते राज्याचा प्रमुख ठरवील.

अशा रीतीने मदिनेतून बहुतेक बंडखोर ज्यू गेले. परंतु थोडे ज्यू मागे राहिले होते. ते सूडाच्या इच्छेने राहिले. होते." आम्ही पूर्वीचा जुना करार पाळू " असे ते मुहंमदास म्हणाले. म्हणून विषाचा पुन:पुन्हा कटू अनुभव आला तरीही त्यानी त्यांना राहू दिले; परंतु आपल्या वळणावर ते गेले. त्यांची कुरेशांजवळ करास्थाने सुरु झाली. मक्कावाले स्वस्थ नव्हतेच. सर्व अरबस्थानातील मूर्तिपूजक जातिजमाती मुहंमदांविरुद्ध उठविण्याची त्यांची खटपट चालली होती. कुरेशांचा व इतरांचा एक प्रबळ संघ स्थापला गेला आणि दहा हजारांचे सैन्य मदिनेवर निघाले ! अबु सुफियानच सेनापती होता. मदिनेपासून थोड्या अंतरावर हे प्रचंड सैन्य तळ देऊन तयारीने राहिले. मदिनेत तीन हजारांचेच सैन्य अभे राहू शकले. शहरातील असंतुष्ट मुनाफिकीनांच्या दगाबाजीची भीती होतीच. मदिनेभोवती खंदक होता. तो आणखी खोल करण्यात आला. ज्या बाजूस संरक्षण नव्हते त्या बाजूचा खंदक अधिकच खोल खणला गेला. तटबंदीच्या ठिकाणी बायकामुले ठेवण्यात आली. मदिनेतील सैन्य बाहेर पडले. शहराच्या बाहेर त्यांनी छावणी दिली.

समोर खंदक होता. ज्यूंची बनी कुरेझा ही एक जमात मदिनेच्या नैऋत्येस राहत असे. ते तटस्थ राहतील, असा भरवसा होता. ते कराराने मदत करण्यास बांधलेले होते. करार मोडा व मूर्तिपूजकांना मिळा, असा त्यांना कुरेशांचा निरोप आला. मुहंमदाना ही दगलबाजी कळली. त्यांनी बनीनुझैरांकडे दोन जबाबदार लोकांबरोबर निरोप पाठविला की, "तुम्ही कर्तव्यास जागा." परंतु ज्यूंनी उर्मट उत्तर दिले "हा मुहंमद कोण? ज्याची आम्ही आज्ञा पाळावी असा हा कोण मुहंमद पैगंबर ? तचा व आमचा कोणताही करार झालेला नाही."ज्यूंना मदिना शहराची सारी बातमी होती. ते ती शत्रूला पुरवतील, अशी भीती वाटत होती. शहरातील मुनाफिकीनही गडबड करू लागले. मुसलमानांत संताप, प्रक्षोभ व अशांती वाढत होती; परंतु मुहंमद त्यांना शांत ठेवीत होते. कुराणातील तेहतिसाव्या सु-यात या वेळच्या परिस्थितीचे फारच सुंदर वर्णन आहे. मुस्लिम सेना पुढे मैदानात आली की, अचानक जाऊन मदिनेवर हल्ला करावा, असे बनी कुरेझा मनात म्हणत होता. आतही असंतुष्ट लोक होतेच. परंतु मुहंमद खंदक ओलांडून पुढे जात ना. मदिनेच्या भिंतीस पाठ लावून ते उभे होते. शेवटी मूर्तिपूजकांचे ते दहा हजार सैन्य माशा मारून कंटाळू लागले. अनेक जातिजमातींचे ते कडबोळे होते. त्यांच्यात भांडणेही सुरु झाली. मुस्लिमांनी त्यांच्यात आणखी भेद पाडले. फाटाफुटी केल्या. ऐक्य नष्ट होऊ लोगले. अन्नाचा तुटवाडा पडू लागला. घोडे मरू लागले. शेवटी या मैदानी सेनेनेच खंदकातून जाऊन चढाई करायची असे ठरविले. हल्ले होऊ लागले; परंतु प्रत्येक हल्ला हाणून पाडण्यात आले. हे प्रचंड सैन्य पांगू लागले, नष्ट होऊ लागले. संमिश्र फौजा वा-यावर गेल्या. ईश्वराची मदत आली. प्रचंड वारे उठले आणि मुसळधार पाऊस आला. तंबू उडून गेले. मैदानी सैन्याची फार दुर्दशा ! एक दिवा टिकेना. हिलाल राहिना. अबु सुफियान व त्याचे सैन्य पळाले. या लढाईला खंदकाची लढाई असे म्हणतात.

मुसलमान आनंदाने शहरात आले. काही शत्रूंकडील लोक ज्यू बनी कुरेझा यांच्या आश्रयाखाली राहायला गेले; परंतु बनी कुरेझा मदिनेच्या जवळ असणे धोक्याचे होते. केलेले करार मोडून ते देशद्रोही झाले होते. मदिनेवर अचानक हल्ला करून सर्वांची कत्तल करण्याचे त्याच्या मनात होते; परंतु खंदकाच्या लढाईचा निराळाच परिणाम झाला. बनी कुरेझांकडे मुहंमदांनी पुन:पुन्हा जाब मागितला. पुन:पुन्हा त्यांनी उर्मट उत्तर पाठविले. शेवटी त्यांच्या वस्तीस मुसलमानांनी वेढा घातला. ते शरण आले.

" तुमचा काय निकाल द्यावा, कोणती शिक्षा ? "त्यांनी विचारण्यात आले.

"आम्हाला काय शिक्षा द्यावयाची ते औसांच्या जमातीचा पुढारी साद याने ठरवावे. तो योग्य न्याय देईल."ते म्हणाले. हा साद मोठा शूर पुरुष होता. खंदकाच्या युध्दात तो जखमी झाला होता. ज्यूंच्या करारभंगाने तो संतापलेला होता. स्वत: मरणाच्या दारी होता. त्याने कोणता निकाल दिला ?

" लढू शकणारे सारे ठार करावे. स्त्रिया व मुले यांना गुलाम करावे ! "सादच्या निर्णयाप्रमाणे शिक्षा दिली गेली.

या गोष्टीमुळे युरोपियन ख्रिश्चन इतिहासकार मुहंमदाना रक्तार्थ तहानलेला वगैरे विशेषणे देत असतात. इंग्रज सेनापती वेलिंग्टन याने स्पेनमधून त्या मोहिमेच्या वेळेस शेकडो लोकांना रस्त्याच्या दुतर्फा कसे फाशी देऊन टाकले, ते युरोपियन इतिहासकरांनी ध्यानात घ्यावे. हिंदुस्थानातील सत्तावन्नच्या स्वातंत्र्युध्दाच्या

वेळेस इंग्रजांनी ज्याचे ज्याचे नाव नानासाहेब होते, त्याला त्याला फाशी दिले, हे या टीकाकारांनी ध्यानात घ्यावे आजच्या युध्दातही कशा गोष्टी होत आहेत पहावे.

ज्यूंचा अपराध मोठा होता. ऐन लढाईच्या वेळेस त्यांनी द्रोह केला. करार भंग करून दगाबाजी केली. कोणते शासन द्यावे ? आजचीही राष्ट्रे अशा आणीबाणीच्या वेळेस कोणती शिक्षा देतील ? सादने निकाल दिला तो त्या काळातील युध्दनीतीप्रमाणे दिला. आणि सादने निकाल द्यावा अशी ज्यूंची मागणी होती. ज्यूंनी जिंकले असते तर त्यांनी तेच केले असते. खिस्त्यांनी का आरंभी व नंतर थोड्या कत्तली केल्या? खिश्चन नीतिशास्त्रज्ञ तर स्पष्ट सांगत व लिहीत की, "दुस-या निर्मळ व निष्पाप जीवांना पापी पापप्रवृत्त करतात. अशा पाप्यांना व दुष्टांना जिवंत ठेवण्यापेक्षा शंभर वेळा नष्ट करणे बरे."परंतु मुस्लिम इतके निर्दय नाहीत. ते एवढेच म्हणतात, " त्या वेळेस मुहंमद व त्यांचे अनुयायी यांच्यासमोर जगण्यामरण्याचा प्रश्न होता. बाल्यावस्थेतील अरब राष्ट्र जगते ना. मुस्लिम धर्म टिकता ना. पुढे पसरता ना; व पुढे जी भव्य संस्कृती फुलली, पुढील अज्ञान काळात मुस्लिम संस्कृतीने जी ज्ञानाची मशाल पेटवली, नवसंस्कृतीला सर्वत्र चालना दिली, जीतून पुढील युरोपियन संस्कृती संभवती झाली ते सारे होते ना."

खिश्चन नीतिशास्त्रज्ञ लिहितात तेवढे वाटते बरोबर ? खिश्चन करतात तेवढे वाटते रास्त ? इंग्लंडमधील ऑलिव्हर क्रॉमवेलने आयरिश कॅथॅलिकांची कशी एकजात कत्तल केली ! कोणी लांडगा मारला तर त्याला बक्षीस देत त्याप्रमाणे कॅथॉलिकांचे मुंडके आणले तर त्याला कसे बक्षीस दिले जाई ? आणि पुन्हा या सतराव्या शतकातील गोष्टी. आणि क्रॉमवेल म्हणे अत्यंत धर्मभीरू होता ! धर्मात्मेच फक्त त्याच्या सैन्यात असत ! रोज प्रार्थना करणा-यांनाच तो आपल्या सैन्यात घेई ! तोंडाने प्रार्थना म्हणत ते हल्ला करीत आणि क्रॉमवेलच्या या क्रूरतेचे समर्थन करतातना तत्त्वज्ञ व इतिहासकार कार्लाईल लिहितो:

"न्यायी ईश्वराचा मी शिपाई आहे, या भावनेने जागृत असलेला वीर पुरुष मृत्यूप्रमाणे कठोर बनतो. नशिबाप्रमाणे, भवितव्यतेप्रमाणे, त्या अंतिम न्यायदिनाप्रमाणे कठोर बनतो आणि देवाच्या शत्रूंवर देवाचा निकाल जणू देत असतो."

स्त्रिया व मुले गुलाम केल्यावर त्यांची वाटणी झाली ! कोणी इतिहासकार म्हणतात, "रेहान नावाची ज्यू स्त्री मुहंमदांसाठी ठेवली गेली होती !"परंतु या गोष्टीस पुरावा मिळत नाही. मुहंमदांच्या इतर सर्व स्त्रियांची हकीकत मिळते; परंतु ती मुहंमदांची स्त्री होती असा कोठेही उल्लेख येत नाही. तेव्हा ही एक कल्पित कथा असावी.



## २४

# अपार उदारता



ज्यूंचा निकाल लागला. परंतु आसपासचे बेदुइन आता सतावू लागले. त्यांचा बंदोबस्त करण्याचे काम सुरू झाले. या सुमारासच सिनाई पर्वतावरील सेंट कॅथेराइन मठाला व सर्वच ख्रिश्चन लोकांना मुहंमदांनी जी सनद दिली ती सुप्रसिद्ध आहे. जगाच्या इतिहासातील ती अपूर्व सहिष्णुता होती. विशेषत: सेमिटिक धर्मामध्ये तरी ही वस्तू नि:संशय अपूर्व होती. ख्रिश्चनांना त्यांच्या स्वत:च्या धर्माच्या राजांकडूनही ज्या सवलती मिळाल्या नाहीत, त्या मुहंमदांनी दिल्या आणि "जो कोणी मुस्लिम मी दिलेल्या या आज्ञापत्राविरूद्ध वागेल तो धर्मच्युत समजला जावा. ईश्वरी आज्ञेचा भंग करणारा मानला जावा," असेही त्यानी जाहीर केले. "ख्रिश्चनांना सांभाळ करणे, त्यांच्या मंदिरांचे, चर्चेस्‌चे रक्षण करणे, त्यांच्या धर्मोपदेशकांची वसतिस्थाने रक्षिणे; सर्व अपायांपासून सांभाळणे, अन्याय्य कर ना बसविणे, कोणत्याही बिशपला वगैरे न काढणे, कोणाही ख्रिश्चनास स्वधर्मत्याग करावयास भाग न पाडणे, मठांतून ख्रिश्चन साधूंस न हाकलणे, यात्रेपासून कोणाही यात्रेकरूस न रोखणे, ख्रिस्ती धर्मीयांची घरे वा चर्च यांचा मशिदीसाठी उपयोग न करणे, मुस्लिमांशी ख्रिश्चन स्त्रियांनी लग्ने केली तर त्या स्त्रियांना स्वत:चा धर्म पाळण्याची मुभा असणे, धर्माची सक्ती न करणे, ख्रिश्चनांना स्वत:चे मठ वा चर्च यांच्या दुरूस्तीसाठी मदत लागली तर ती देणे; त्यांच्या इतरही धार्मिक गोष्टीस साहाय्य हवे असेल तर ते देणे; परंतु याचा अर्थ त्यांच्या धर्मात आपण सामील झालो असा कोणी करू नये, त्यांच्या गरजेसाठी त्यांना आपण मदत दिली इतकाच याचा अर्थ. बाहेरच्या ख्रिश्चनांशी लढाई चालू असली तरी स्वत:च्या देशातील ख्रिश्चनांस ते केवळ ख्रिश्चन आहेत म्हणून त्रास देऊ नये. जर कोणी त्यांना त्रास देईल तर तो पैगंबरांना कमीपणा आणील !"

किती सुंदर ही हक्काची सनद ! मुहंमदांचा अंतरात्मा किती थोर होता. येशू ख्रिस्ताविषयी त्याना अत्यंत पूज्यबुद्धी वाटे. तसेच ते सर्व शेजा-यांशी गुण्यागोविंदाने राहू इच्छित होते. ख्रिश्चन धर्मात नाना चर्चा चाललेल्या होत्या व कत्तली होत होत्या. अशा वेळेस ते जर मुस्लिम राज्यात राहावयास आले तर त्यांना केवढे आश्वासन !

अपकारांची फेड अपकाराने करण्याची शक्ती असतानाही जो दया दाखवितो तोच खरा महात्मा. मुहंमद शासनाधिकारी या नात्याने स्टेट चालवणारे, जनतेच्या मालमत्तेचे व जीविताचे, जनतेच्या स्वातंत्र्याचे वाली या नात्याने न्याय देताना अपराध्यास कठोरपणे शासनही करीत; परंतु पैगंबर या नात्याने, ईश्वराचे प्रेषित या नात्याने ते केवळ क्षमामूर्ती होते. मोठ्यांतल्या मोठ्या शत्रूसही ते क्षमा करीत. न्याय व दया यांचे मधूर मिश्रण त्यांच्या ठायी होते.

मऊ मेणाहूनी आम्ही विष्णुदास ।
कठिण वज्रास भेदू ऐसे ।।

अशाच कोटीतील मुहंमद होते. किती उदाहरणे द्यावी ? एकदा वाळवंटातील एक बेदूइन अरब कैदी मुहंमदांकडे आणण्यात आला. पैगंबरांच्या दयाळूपणाचा त्याच्यावर अत्यंत परिणाम झाला. तो शत्रुत्व विसरून अत्यंत निष्ठावंत अनुयायी झाला. मुहंमदांच्या भक्त होऊन तो गेला. तो मग आपल्या प्रांतातून मक्कावाल्यांस धान्य वगैरे पाठविणारा झाला. मक्केत धान्य मिळेना. मक्कावाल्यांची मोठी करूणस्थिती झाली. शेवटी त्यांनी मुहंमदांकडे अर्ज पाठविला आणि मुहंमद द्रवले. जे मक्कावाले त्याना पुन:पुन्हा मारण्यासाठी उठत होते, त्यांना जगविण्यासाठी मुहंमद उभे राहिले. त्यानी त्या निष्ठावंत अरबाला, थुमामला सांगितले की, मक्कावाल्यांना लागेल ते देत जा. अपकारांची फेड ते प्रेमाने व क्षमेने करते झाले. मुहंमदांनी पुढे जेव्हा मक्का घेतली त्या वेळेस हब्रार नावाचा एक खूनी मुहंमदांसमोर आणण्यात आला. एकदा मुहंमदांची एक मुलगी मक्केहूना निसटून जात होती. ती उंटावर बसणार इतक्यात हा कुरेश हब्रार तेथे आला. त्याने त्या मुलीच्याअंगात भाला खुपसला ! ती गरोदर होती. ती जमिनीवर पडली व लगेच मेली. स्वत:च्या गरोदर मुलीचा निर्दय खून करणारा तो हब्रार विजयी मुहंमदांसमोर उभा करण्यात आला. पैगंबराना त्या प्रिय कन्येचे स्मरण झाले. हब्रार मुहंमदांच्या पाया पडला व क्षमा मागता झाला. मुहंमदांना तो पश्चात्ताप खरा वाटला. त्यानी क्षमा केली; कारण तो अपराध त्यांच्या वैयक्तिक बाबतीतला होता. त्या अपराधाचा शासन-संस्थेशी संबंध नव्हता. पैगंबर स्वत:च्या बाबतीतले सारे अपराध क्षमा करीत. शासनसंस्थेचा संबंध येई तेथे ते कठोर बनत. ते कठोर कर्तव्य त्याना करावे लागे. एका ज्यू स्त्रीने मुहंमदाना मारण्याचा प्रयत्न केला. तिलाही त्यानी क्षमा केली. अबु जहलचा मुलगा अक्रमा यानेही मुहंमदांजवळ हाडवैर केले; परंतु तरीही त्याला क्षमा केली गेली. पैगंबरांचे महानुभवित्व असीम होते. पैगंबर या नात्याने त्यानी सदैव क्षमाच केली; परंतु शास्ते या नात्याने त्याना तत्कालीन परिस्थितीमुळे कठोर व्हावे लागले. ज्यूंनीही पुन:पुन्हा त्याना सतावले, फसवले, दगलबाजी केली. नाही तर मुहंमद किती सौजन्याने वागू पाहत होते ! तोंडही प्रार्थनेच्या वेळेस जेरूसलेमकडे करीत !

काही ख्रिश्चनधर्मी बेदुइनही मदिनेस त्रास देऊ लागले. लुटालूट व रस्तेमार करीत. त्यांच्या बंदोबस्तासाठी मुहंमदानी जी तुकडी पाठविली, तिच्या प्रमुखास ते म्हणाले, “कोणाला फसवू नका, दगलबाजी कोणाशी करू नका. दिला शब्द पाळा. लहान मुलांना तर मुम्ही हात नाहीच लावता कामा.” मुहंमदांची ही सुंदर आज्ञा; परंतु ज्यूंच्या धर्मसंस्थापकाने काय सांगितले होते ? “जा आणि अमलकांवर हल्ला करा. सारे नष्ट करा. स्त्रिया, पुरुष, लहान अंगावरचे मूल, कोणी ठेवू नका. सारी मारा. गुरेढोरे मारा. वृद्ध, तरूण सारे मारा.” मुहंमदांची उदारता खरोखरच अपार व अपूर्व होती. कधीही तुकडी पाठवायची झाली तर ते सांगत, “दुबळयांना धक्का नका लावू. घरातील निरपराधी लोकांना मारू नका. स्त्रियांना वाचवा. अंगावर पिणारी मुले त्यांची हत्या नका करू. प्रतिकार न करणा-यांची घरेदारे पाडू नका. त्यांच्या उपजीविकेची साधने नष्ट नका करू. फळझाडे तोडू नका. ताडांची झाडे, तीही नका तोडू.”

पैगंबरांची ही शिकवण पुढील खलिफांसमोरही असे. अबुबकर जो पुढे पहिला खलिफा झाला, त्याने यझीद बीन अबु सुफीयन याला जेव्हा बायझंटाइनावर स्वारी करायला पाठविले तेव्हा पुढील शिकवण दिली :

"यझीद, स्वत:च्या लोकांना असंतुष्ट व अशांत करू नको. त्यांच्यावर कोणताही जूलूम नको करू. त्यांचाही सल्ला घेत जा व योग्य ते करीत जा. मी सांगतो आहे याविरूद्ध जे वागतील त्यांना यश येणार नाही. शत्रूंशी गाठ पडल्यावर मर्दासारखे वागा. पाठ नका दाखू. आणि विजयी झालात तर स्त्रिया, वृद्ध व मुले यांना मारु नका. फळझाडे, ताडाची झाडे तोडू नका. शेते जाळू नका. गुरेढोरे मारू नका. पोटासाठी जरूर पडली तरच ती मारा. शत्रुशी करार कराल तर तो पाळा. दिल्या शब्दाप्रमाणे वागा. धर्मप्रवृत्तीचे लोक मठांतून वगैरे असतात. एकांतात ईश्वराची सेवा, पूजा करतात. त्यांना त्रास देऊ नका. मारू नका मठ उद्ध्वस्त करू नका."

किती संयमी हे आज्ञापत्र ! शांतीचा संदेश देणा-या ख्रिस्ताच्या अनुयायांच्या लीला व ख्रिस्ती शासकांची आदेशपत्रे - आगलावी आदेशपत्रे वाचली म्हणजे पैगंबर व त्यांचे अनुयायी यांची ही त्या काळातील शासने किती उदात्त वाटतात ! चीनमध्ये एकोणिसाव्या व विसाव्या शतकात सुधारलेले म्हणवणा-या ख्रिश्चन राष्ट्रांनी कथा कत्तली केल्या, ग्रंथालये, कलालये कशी जाळली ते वाचा आणि मग मुहंमदांकडे पहा. त्यानी शिकविलेल्या उदार धर्माकडे पहा.



# २५

# संकटांचा मुकाबला



मुहंमद अशा रीतीने शांती प्रस्थपित होते. लुटणा-यांचा बंदोबस्त करीत होते. प्रेमाने, कठोरपणाने सर्वांना जिंकीत होते. मक्का सोडून त्याना आता सहा वर्षे झाली होती. त्यांचे शब्द ऐकायला दूरदूरचे लोक येऊ लागले. त्यांचा सल्ला विचारायला येऊ लागले. रोजच्या जीवनात कसे वागावे ते विचारण्यासाठी येऊ लागले. मुहंमद नाना विषयांवर सांगत. त्यातून इस्लामी धर्माच्या स्मृती तयार होऊ लागल्या. नीतिशास्त्र, कायदेशास्त्र तयार होऊ लागले. मुहंमदांबरांबर जे मक्का सोडून आले होते, ती आपली घरे, त्या टेकड्या सारे सोडून आले होते. त्यांना पुन्हा एकदा ती जन्मभूमी पाहावी, असे वाटू लागले. मुहंमदांनाही मक्केची फिरून फिरून आठवण येत होती. ते परंपरेचे पवित्र मंदिर काबा पाहण्याच्या इच्छेने सारे उत्कंठित झाले होते. काबा सर्व अरबस्थानचे होते. कुरेश केवळ तिथले पंड्ये होते. काबाच्या दर्शनास शत्रूही आला तरी कुरेश कायद्याने त्याला बंदी करू शकत नव्हते.

आणि यात्रेचा महिना जवळ आला. मक्केस जाऊन पवित्र स्थाने पाहण्याचा आपला इरादा पैगंबरांनी जाहीर केला. सातशे मुसलमान नि:शस्त्र असे निघाले. या सातशेत अन्सार, महाजिरीन सारे होते; परंतु कुरेशांचा वैराग्नी विझला नव्हता. ते मक्केपासून काही अंतरावर सशस्त्र आडवे आले. परंतु नंतर मागे हटत हटत मक्केत जाणारे सारे रस्ते रोखून बसले ! मुहंमदांनी त्यांच्याकडे एक प्रतिनिधी पाठवला; परंतु कुरेशांनी त्याला नीट वागवले नाही. मुहंमद व त्यांचे अनुयायी यांना काबा मंदिरात आम्ही येऊ देणार नाही, अशी त्यांनी प्रतिज्ञा केली. मक्कावाले मुहंमदांच्या तळाभोवती घिरट्या घालीत होते. एखादा एकटाच आढळला तर त्याला ठार मारता यावे म्हणून टपून बसत. काहींनी पैगंबरांवरही दगड फेकले, बाण मारले. यांतील काही पकडले गेले व मुहंमदांसमोर आणले गेले. पैगंबरांनी त्यांना क्षमा केली. नंतर कुरेशांकडे पैगंबरांनी उस्मानला पाठविले. त्याला कुरेशांनी धरून पकडून ठेवले ! मुहंमदांना यादवी थांबवावयाची होती. त्यांनी कुरेशांना कळविले, तुमच्या अटी काय त्या कळवाव्या. काही करार करू. शेवटी एक करार झाला. दहा वर्षेपर्यंत दोघांनी आपसांत लढावयाचे नाही असे ठरले. तसेच कुरेशांपैकी बिगरपरवाना कोणी मुहंमदांकडे आला तर त्यांनी त्याला पुन्हा कुरेशांच्या स्वाधीन करावे; परंतु मुसलमानांपैकी कोणी मक्केत मक्केवाल्यांकडे गेला तर त्याला मुहंमदांकडे परत पाठवायला कुरेश बांधलेले नाहीत. कोणत्याही जातिजमातींस, मुहंमदांना वा कुरेशास मिळण्याची मुभा असावी. या वेळेस मुसलमानांनी परत जावे. पुढील वर्षी काबा दर्शनास यावे. तीन दिवस मक्केत राहावे. हत्यारांसह यावे. अशा अटी ठरल्या. कुरेशांकडचा एक दूत मुहंमदांकडे आला होता. पैगंबरांविषयी सारे किती पूज्यभाव, भक्तिभाव दाखवतात

ते पाहून तो चकित झाला ! तो परतल्यावर कुरेशांना म्हणाला, “अनेक राजे-महाराजे यांचे दरबार मी पाहिले, परंतु कोणाही राजामहाराजाला असा मान दिलेला मी पाहिला नाही. अशी आदरबुद्ध कोणाविषयी दाखविलेली मला दिसली नाही.”

करार झाला. कुरेशांनी कराराप्रमाणे आपल्यातील मुहंमदांकडे गेलेल्या काही लोकांची ताबडतोब मागणी केली. मुहंमदांनी त्यांना पाठविले. काही लोक असंतुष्ट झाले; परंतु मुहंमद दूरवर पाहणारे. नम्रतेने ते जिंकू पाहत होते. सरळता व उदारता दाखवून जिंकू पाहत होते. मुहंमद अनुयायांसह मदिनेस परत आले. आपला नवीन धर्म, साधा, सरळ, उदार बंधुभावाचा धर्म, सर्व जगाने घ्यावा असे मुहंमदांना वाटू लागले. त्यांनी अनेक राजेरजवाड्यांकडे दूत पाठविले. हा नवधर्मामृताचा पेला घ्या, असे त्यानी सर्वांनी लिहिले. ग्रीकांचा सम्राट हिरेक्लिअस व इराणचा खुश्रू पर्वेज यांच्याकडेही दूतपत्रे देऊन पाठविले. ते पत्र वाचून खुश्रू रागावला. हा कोण बरोबरीच्या नात्याने लिहिणारा, असे म्हणून त्योन पैगंबरांच्या पत्राचे तुकडे केले ! ते ऐकून मुहंमद म्हणाले, “त्याच्या राज्याचे असेच तुकडे होतील !” आणि पुढे लवकरच ती भविष्यवाणी खरी ठरली. ग्रीक सम्राट हिरेक्लिअस याने पैगंबरांच्या दूतास अधिक चांगल्या रीतीने वागविले. पैगंबरांनी पाठविलेल्या दूताचे सोबत अबु सुफियान. हे आपल्या स्वत:च्या कामासाठी गेले होते त्यांना राजाने दरबारी बोलावून प्रश्न विचारले.

“तुमचे पैगंबर काय शिकवतात ?” ग्रीक सम्राटाने विचारले.

“एका ईश्वराची पूजा करा. जुन्या मूर्तिपूजेस रजा द्या. गरिबांसाठी उत्पन्नाचा काही भाग देत जा. सत्याने रहा. पवित्र रहा. दुर्गुणांपासून दूर रहा. पापांपासून, घाणीपासून दूर रहा.असे पैगंबर शिकवतात.”अबु सुफियानने उत्तर दिले.

“त्यांचे अनुयायी वाढत आहेत का ?”

“हो वाढत आहेत. आणि जो एकदा त्यांचा होतो, तो पुन्हा त्यांना कधी सोडीत नाही.”

या हिरेक्लिअसचा एक मांडलिक राजा दमास्कसजवळ राहत असे. त्याच्याकडेही इसलामचा दूत गेला; परंतु त्याचा दुस-या एका मातबराकडून खून झाला ! यामुळेच पुढेच इस्लामचे व ख्रिस्ती राष्ट्रांचे युद्ध सुरु झाले.

ज्यूंचा पराजय झाला तरी आसपासच्या ठिकाणाहून ते त्रास देत असत. मदिनेपासून तीन चार दिवसांच्या प्रवासाच्या अंतरावर अत्यंत तटबंदीच्या बळकट ठिकाणी बनी नजीर व कुरेझा या ज्यू जमाती राहू लागल्या होत्या. तेथे मजबूत किल्लेकोट होते. या जागेस खैबर म्हणत. खैबर म्हणजे तटबंदीची जागा. खैबरचे ज्यू मुहंमदांवर जळफळत होते. पैगंबरांना खाऊ की चावू करीत होते. या ज्यूंनी बेदुइनांच्या एका जमातीशी संयुक्त फळी करण्याचे ठरविले. बेदुइनांचे शौर्यधैग्र मुसलमानांना माहीत होते. संयुक्त फळी होऊन बेदुइन व ज्यू यांचे संयुक्त सैन्य मदिनेवर चालून येण्यापूर्वीच मुसलमानांचे १४०० लोकांचे सैन्य खैबरवर चालून गेले ! ज्यूंना कोणाचीही मदत आली नाही. किल्ल्यापाठीमागून किल्ला पडू लागला. शेवटी ज्यू शरण आले; ज्यूंना त्यांची शेतीवाडी, घरदार सारे ठेवले गेले. त्यांचे धार्मिक स्वातंत्र्यही राखण्यात आले; परंतु अत:पर त्यांचे रक्षण मुस्लिम सत्ता करणार, यासाठी ज्यूंनी कर (जझीया) द्यावे असे ठरले. ज्यूंची जंगम

मालमत्ता तेवढी घेण्यात आली. ती मुसलमानांत वाटली गेली. घोडेस्वारास तीन भाग तर पायदळ शिपायास एक भाग याप्रमाणे सर्वांना भाग दिला गेला. याच वेळेस एका ज्यू स्त्रीने मुहंमदांना विष चारण्याचा प्रयत्न केला होता. मुहंमदांचा एक अनुयायी मेलाच; परंतु मुहंमद वाचले. त्यांच्या शरीरावर विषाचा परिणाम झाला. या वेळेपासून त्यांची प्रकृती बिघडली आणि नेहमी त्रास होत असे. मुहंमदांनी या स्त्रीस क्षमा केली. तिच्या लोकांत तिला सुखरूप राहू दिले.



# २६

# विजयी वीराप्रमाणे पुन्हा मक्केत



हिजरीचे सातवे वर्ष संपत आले. आदल्या वर्षी ठरल्याप्रमाणे मुहंमद मक्केला जावयास निघाले. या यात्रेला 'उमरतुलकझा' - धन्यतेची यात्रा असे नाव अहे. इ. स. ६२९ चा मार्च महिना होता. पैगंबरांच्या संगे दोन हजार अनुयायी होते. यात्रेचे नवे विधी ते करणार होते. ही छोटी यात्रा होती. कुरेशांनी एक शब्दही बोलायचा नाही असे ठरविले होते. कुरेश तीन दिवस शहर सोडून गेले. आसपासच्या डोंगरांवरून व टेकड्यांवरून ते सारे पाहत होते. तो देखावा मोठा अपूर्व होता ! जगाच्या इतिहासातील ते अपूर्व दृशय होते. शहरातील घरात कोणी नव्हते. शहरातले बाहेर पडत होते व बाहेरचे शहरात शिरत होते. आपली जुनी घरेदारे आलेले लोक पाहत होते. त्यांनी यात्रेचे विधी केले. सर्वांनी नमाज केला. मक्केचे रहिवाशी बाहेर तंबूतून होते. मदिनेहून आलेल्या मातृभक्तांकडे ते पाहत होते. मुहंमद व त्यांचे अनुयायी यांनी काबाला प्रदिक्षिण घातल्या. अस्सफा व मर्वा यांचीही यात्रा करण्यात आली. या आलेल्या यात्रेकरूंत आपले मित्र, आप्तेष्ट वगैरे दिसतात का, ते मक्केवाले वरून पाहत होते. ज्या वेदनांनी इस्लामला जन्म दिला त्यामुळे हा प्रसंग शक्य झाला आणि तीन दिवस झाले. यात्रेकरू शांतपणे निघून गेले. मुहंमदांच्या या शांतिपूर्वक वचनपालनाचा फार परिणाम झाला. कुरेशांपैकी पुष्कळच नवधर्माचे होऊ लागले. मुहंमदांची क्षमा, सत्यता, उदात्त स्वभाव यांमुळे मक्कावाले दिपले. मोठेमोठे प्रतिष्ठित विरोधकही विरोध विसरून उपासक बनू लागले.

परंतु कुरेश व त्यांचे साथीदार यांनी दहा वर्षेपर्यंत शांतीने राहावयाचे असा केलेला करार मोडला. मुहंमदांच्या संरक्षणाखली असलेल्या बनी खझाआ या जमातीवर त्यांनी हल्ला चढविला. पुष्कळ खुझाआंची त्यांनी कत्तल केली. ते मुहंमदांकडे गा-हाणे घेऊन आले. न्याय द्या म्हणाले. तिकडे मक्केतही अन्याय जोरजुलूम सुरू झाला होता. मक्कावाल्यांनी हुदैबियाच्या कराराच्या त्या अटी मोडल्या. प्रमुख कुरेशांनी खझाआंच्या कत्तलीत भाग घेतला होता.

मुहंमदांना या गोष्टीची क्षमा करणे अशक्य होते. एकदा सोक्षमोक्ष करायचे त्यांनी ठरविले. दहा हजारांची सेना घेऊन मुहंमद मक्केवर निघाले. कुरेशही आले. झटापटी सुरू झाल्या; परंतु मक्कावाल्यांनी फार विरोध केला नही. पुष्कळ लोक कुरेशांच्या विरूद्ध झाले होते. पुष्कळांना या यादवीचा वीट आला होता. मुहंमदांचा जवळजवळ बिनविरोधच मक्केत विजयप्रवेश झाला. ज्या मक्केतून ते निराधार व अगतिक होऊन निघून गेले होते, त्या मक्केत आज विजयी महान वीराप्रमाणे ते शिरले !

आणि मक्का हाती घेतल्यावर त्यानी का सूड घेतला ? कत्तली केल्या ? नाही. क्षमेचे उदात्त व अद्वितीय स्वरूप त्यानी दाखविले. जे शहर मुहंमदांच्या व त्यांच्या अनुयायांच्या जिवावर उठलेले असे ते शहर आज त्यांच्या चरणी नमले होते ज्यांनी पूर्वी माणुसकीस काळिमा लावणारी निर्दय कृत्ये केली ते सारे मुहमदांसमोर होते; परंतु या विजयाच्या क्षणी मुहंमद सारे विसरून गेले. ते क्षमा करते झाले. सर्व मक्कावाल्यांना सार्वजनिक माफी जाहीर करण्यात आली. फक्त चार जणांस शिक्षा देण्यात आली. सारे सैन्य शांतपणे शहरात शिरले. लुटालूट नाही. काही नाही. स्त्रीचा कोठे अपमान नाही. जगाच्या इतिहासात असा विजयप्रवेश क्वचितच सापडेल !

मक्कावाल्यांना त्रास दिला गेला नाही; परंतु त्यांच्या त्या मूर्तींना त्रास झाला. जुने मूर्तिपूजक आपल्या मूर्तींचा भंग शांतपणे पाहत होते. त्या सर्व मूर्ती मुहंमदांनी स्वत:च्या हातांनी फोडून टाकल्या ! प्रत्येक मूर्तीसमोर मुहंमद उभे राहत व म्हणत, "सत्य आले आहे. असत्य नष्ट होते आहे." असे म्हणत व मूर्ती फोडीत. अशा रीतीने सर्व मूर्ती भंगून सारे जुने धर्मकांड रद्द करून जमलेल्या सर्वांना उद्देशून त्यानी भाषण केले. कुराणातील मानवांच्या ऐक्याचे मंत्र त्यानी प्रथम म्हटले. नंतर भाषण झाले. भाषणानंतर कुरेशांना त्यानी विचारिले.

"मी तुमच्याशी कसे वागावे असे तुम्हास वाटते ?"

"दयेने व प्रेमाने. सहानुभूतीने व अनुकंपेने." ते म्हणाले. आणि मुहंमदांस "हे प्रेमळ व दयाळू भावा, हे प्रेमळ व मायाळू पुतण्या" अशा त्यांनी हाका मारल्या. मुहंमदांना गहिवर आला. ज्यांनी द्वेषमत्सराची आग पाखडली तेच आज मुहंमदांना प्रेमाने संबोधित होते. पैगंबरांच्या डोळयांतून अश्रू आले व ते म्हणाले, "जोसेफ आपल्या भवास म्हणाला तसेच मीही म्हणतो. तुम्हाला मी नावे ठेवीत नाही. ईश्वर तुम्हाला क्षमा करील. तो अत्यंत दयाळू आहे. कृपासागर आहे. रहिमवाला मेहेरबान आहे." (कुराण सुरा १२ : ३१).

या क्षमेचा व दयेचा परिणाम अपरंपार झाला. भराभरा लोक येऊ लागले. नवधर्म घेते झाले. सफा टेकडीवर मुहंमद बसत. जे येत त्यांच्याजवळून मागे मदिनावाल्यांजवळून आरंभी जशी शपथ घेतली होती तशी घेती.

"ईश्वर एक आहे, अद्वितीय आहे. त्याच्याशी दुसरेतिसरे मी मिसळणार नाही. व्यभिचार करणार नाही. बालहत्या करणार नाही. असत्य बोलणार नाही. स्त्रियांविषयी अनुदार व असभ्य बोलणार नाही."

पैगंबरांचे अंत:करण उचंबळून येत होते. जीवनकार्य सफल होत होते. कुराणात म्हटले आहे, "ईश्वराची मदत मिळेल. जय होईल. प्रभूच्या धर्मात हाजारो येऊ लागतील. त्या वेळेस ईश्वराची स्तुती कर. त्याची क्षमा माग. जे ईश्वराकडे वळतात. त्यांच्यावर त्याची करूणा वळते. त्याचे प्रेम वळते; आणि मुहंमद ईश्वराची स्तुती करीत होते.

मुहंमदांचे जीवनकार्य पुरे होत होते. त्यांनी अरबस्थानात सर्वत्र प्रचारक पाठविले. शांतीचे, सदिच्छेचे दूत पाठविले. ते सर्वांना सांगत, "आत्मरक्षणार्थच शस्त्र उचलीत जा." पूर्वीचा शत्रू खलिद बीन वलीद आता इस्लामी धर्माचा कट्टर पुरस्कर्ता झाला होता. त्याने काही विरोधी बेदुइनांची कत्तल केली. मुहंमदांना

हे कळले तेव्हा त्यांना फार वाईट वाटले. ते म्हणाले, “प्रभो, खलिदने केले त्याचा दोष माझ्याकडे नाही हो. मी नव्हते हो असे सांगितले. मी निष्पाप, निरअपराध आहे.” आणि त्यांनी अलीला बनी खुरैझा जमातीकडे नुकसानभरपाई करण्यासाठी एकदम पाठविले. अलींनी, किती मारले गेले होते त्याची नीट चौकशी केली व दियत - नुकसान-भरपाई दिली. नुकसानभरपाई केल्यावरही आणलेल्या पैशांतील काही रक्कम शिल्लक राहिली. तीही मृतांच्या आप्तेष्ट - मित्रांना त्यांनी वाटून दिली. अलींनी आपल्या सौम्य, स्निग्ध व उदार वर्तनाने सर्वांची हृदये वश करून घेतली. सारे प्रसन्न झाले. सर्वांचे आशीर्वाद व धन्यवाद घेऊन अली परत आले. मुहंमदांनी त्यांचे कौतुक केले.

काही बेदूइन जमातींनी मुहंमदांविरूद्ध मोठी संघटना चालविली; परंतु मुहंमद सावध होते. मक्केच्या ईशान्येस हुनैन घळीजवळ लढाई झाली. बेदुइनांचा पराजय झाला. ज्या तायेफ शहरातून नऊ वर्षांपूर्वी दगडधोंडे मारून मुहंमदांना हाकलून देण्यात आले होते, त्या शहरात शत्रू शिरले. परंतु शत्रूंची कुटुंबे मुहंमदांच्या हाती होती. वेढा उठवून जेथे ही कुटुंबे होती तेथे मुहंमद आले. नंतर पकडलेल्यांतील काही कैदी म्हणाले, “आमची बायकामाणसे, मुलेबाळे आम्हाला परत द्या.” मुहंमद आपल्या अनुयायांची मनोवृत्ती जाणत होते, अरब मनोवृत्ती जाणत होते. ते म्हणाले, “विजयाची सारीच फळे आम्ही कशी गमवायची ? काही तरी तुम्ही दिलेच पाहिजे.” कैदी म्हणाले, “बरे तर.”

दुस-या दिवशी मुहंमद आपल्या अनुयायांसह दुपारची प्रार्थना करीत होते आणि त्या वेळेस कैद्यांचे काही प्रतिनिधी आले व म्हणाले, “आमची मुहंमदांना प्रार्थना आहे की, त्यानी आपल्या अनुयायांजवळ आमच्याविषी रदबदली करावी. मुसलमान अनुयायांसही आमची प्रार्थना की त्यांनी पैगंबरांना दया करण्यास सांगावे.”

त्या प्रतिनिधीस मुहंमद एकदम म्हणाले, “माझ्या वाट्यास आलेले कैदी मी परत करतो. तसेच अब्दूल मुत्तलिबांच्या घराण्यातील मंडळींच्या वाटणीस आलेले कैदी मी परत करतो.”

ती प्रार्थनेची पवित्र वेळ होती. मुहंमदांनी आपल्या घराण्यातील मंडळींच्या वाट्यास आलेले कैदी मुक्त करताच इतरांनाही स्फूर्ती आली. प्रत्येकजण म्हणू लागला, “माझ्या वाटणीचे कैदी मी देतो.” आणि सारे कैदी मुक्त झाले. स्त्रिया, मुले गुलाम होण्याऐवजी मुक्त झाली ! मुहंमदांनी सक्ती केली नाही. स्वत:च्या उदाहरणाने ते शिकवीत होते. सहा हजार माणसे त्या वेळेस मुक्त झाली !

या करूणेने, या अपरंपार औदार्याने बेदुइन विरघळले. ते सारे मित्र बनले. लढाईने जे झाले नाही ते त्या निरपेक्ष करूणेने झाले. त्या सर्वांनी नवधर्म घेतला.

लुटीतील भाग मक्केतील ज्यांनी नवधर्म घेतला होता त्यांना मुहंमद जरा अधिक देत. नवीन झाडाला अधिक पाणी घालावे लागते, त्याची अधिक काळजी; परंतु मदिनेतील अन्सार यामुळे जरा नाखूष होत. त्यांना हा पक्षपात वाटे. “वास्तविक निराधार मुहंमदांना मदिनेने आधार दिला म्हणून अन्सार असे आम्हाला नावही पडले. परंतु मुहंमदांचा मक्केवरच लोभ ! अन्सार नाखूष आहेत ही गोष्ट मुहंमदांच्या कानांवर गेली. त्यानी सर्वांना जमा केले व म्हटले, “अन्सार बंधूंनो, तुमचे बोलणे माझ्या कानांवर आले आहे.

तुमच्या मदिना शहरात मी आलो त्या वेळेस तुम्ही अज्ञानात होता. ईश्वराने तुम्हास योग्य दिशा दाखविली. तुम्ही कष्ट भोगीत होता. प्रभूने तुम्हास सुखी केले. तुमची आपसांत वैरी होती; परंतु ती गेली आणि तुमची हृदये बंधुप्रेमाने भरून आली. खरे आहे की नाही सांगा."

"होय पैगंबर, तुम्ही म्हणता हे खरे आहे. पैगंबरांची ही कृपा आहे. त्यांची ही उदारता आहे." ते म्हणाले.

"का, असे का म्हणता ? असे का बरे उत्तर देता ? असे उत्तर देण्याऐवजी तुम्ही असे म्हटले पाहिजे होते, 'आमच्या नगरीत तू एक उपटसुंभ आलास; परंतु आम्ही तुझ्यावर श्रद्धा ठेवली. निराधार, अगतिक असा तू आलास. आम्ही तुला आधार दिला. दरिद्री व परित्यक्त असा तू आलास. आम्ही तुला घर दिले. अशांत व दु:खी कष्टी असा आलास. आम्ही सांत्वन केले." असे का नाही म्हणत ? अरे अन्सारांनो, तुम्ही असे म्हटलेत तर त्यात का काही गैर आहे, वावगे आहे ? ते खरेच आहे. मीही साक्ष दिली असती की, तुमचे हे महणणे खरे आहे; परंतु असे उत्तर न देता तुम्ही मघाचे उत्तर दिले. हे पहा, अन्सार मित्रांनो, ऐहिक वस्तूंसाठी हृदयात आसक्ती कशाला ? ऐहिक वस्तूंसाठी  हृदये अशांत नका होऊ देऊ. उंट, गुरेढोरे, शेळया, मेंढ्या मिळू देत दुस-यांना. तुमच्याबरोबर मदिनेत मी येणार आहे. तुम्हाला मी पाहिजे का शेळयामेंढ्या ? ज्या परमेश्वराच्याहाती माझे जीवन आहे त्याची शपथ घेऊन मी सांगतो की, मी तुम्हाला कधीही सोडणार नाही. सारे जग एका बाजूला गेले व अन्सार दुस-या बाजूला गेले तरी मी अन्सारांच्या बाजूने उभा राहीन. प्रभूची तुमच्यावर मेहेरबानगी असो. तुम्हाला, तुमच्या पुत्रपौत्रांना त्याचा आशीर्वाद असो. प्रभू तुम्हाला सदैव सुखात ठेवो."

पैगंबरांची वाणी ऐकूण अन्सार रडले. त्यांच्या दाढीवरून अश्रुधारा घळघळल्या. ते सारे एका आवाजाने म्हणाले, "पैगंबर, आमच्या वाट्याने आम्ही खूष आहोत." आणि ते सूखी व समाधानी झाले. या प्रसंगानंतर लवकरच मुहंमद अन्सारांसह मदिनेस परत गेले.



# २७

# धर्मप्रसार



आता हिजरीचे नववे वर्ष सुरू झाले. जी अनेक शिष्टमंडळे पैगंबरांना भेटायला आली, जे नेक वकील भेटायला आले, त्यांसाठी हे वर्ष प्रसिद्ध आहे. अरबस्थानचा नवजन्म झाला होता. ढग गेले. धुके गेले. विचारांचा, नीतीचा, न्यायाचा, सद्धर्माचा नवसूर्य स्वच्छ प्रकाश देत होता. रानवटपणाची रात्र संपली. अज्ञान संपले. नवयुग आले. मक्का घेतल्यामुळे अरबस्थानातील मूर्तिपूजेचा अंत झाला. मनात, लात, उझ्झा वगैरे देवदेवतांची पूजा करणारे, मक्का पडल्यावर निराश झाले. मक्का शरण गेल्याची वार्ता सर्वत्र गेली. त्या गोष्टीचा मोठाच नैतिक परिणाम झाला. वाळवंटातील बेदुइनांची शिष्टमंडळे येऊ लागली. या येणाऱ्या पाहुण्यांची मदिनेतील प्रमुख गृहस्थांकडे व्यवस्था करण्यात येई. मुहंमद सर्वांना अत्यंत आदराने वागवीत. आलेले जायला निघाले की, त्यांना भरपूर वाटखर्ची देत. काही भेट देत. नजराणे देत. त्या त्या जातिजमातींच्या ह्क्काचे रक्षण ज्यात आहे, असा करार होई. नवधर्म शिकविण्यासाठी मुहंमद प्रचारक देत. मुहंमदांचे शहाणपण, सौजन्य, आतिथ्य वगैरे गुणांमुळे येणारा प्रसन्न होई. तो नवधर्म घेई. एवढेच नव्हे तर त्याचा प्रसारक बने.

एकदा पैगंबरांकडे एक गृहस्थ आला व म्हणाला,

"तुमतच्यातील अब्दुल मुत्तलिबाचा मुलगा कोण ?"

"मीच." मुहंमद म्हणाले.

"काही प्रश्न विचारू ?"

"विचारा."

"आम्हा लोकांत ईश्वराने तुम्हाला पैगंबर म्हणून का पाठवले आहे ?"

"हो. ईश्वराने पाठवले कि."

"त्या एका ईश्वराचीच फक्त पूजा करा. त्या एका ईश्वराशी दुसरे जोडू नका. पूर्वजांच्या मूर्ती सोडा. असा तुम्ही उपदेश केला का ?"

"हो. अल्लाने असे सांगितले आहे."

यानंतर प्रार्थना, उपवास, यात्रा वगैरे सर्व गोष्टींविषयी विचारलयानंतर तो गृहस्थ म्हणाला, "मीही तुमच्या धर्माचा होतो. शपथेवर सांगतो की, एका अल्लाशिवाय कोणी देव नाही. मुहंमद त्याचा पैगंबर आहे. मी सारे नियम पाळीन. जे निषिद्ध आहे ते टाळीन. जे तुम्ही सांगितलेत त्यांतील काही गाळणार नाही, काही त्यात नवीन घालणार नाही."

अशा रीतीने प्रबळ व सुसंघटित अरब राष्ट्र निर्माण होत होते; परंतु या वेळेस एक बाहेरचे संकट आले. एके काळी अरबस्थान जिंकू असे रोमन सम्राट म्हणत असत. आता बायझंटाईन सम्राट पुन्हा तीच स्वप्ने खेळवू लागले. पर्शियावर विजय मिळवून हिरॅक्लिअस नुकताच आला होता. मुहंमदांनी वकील पाठविला होता. त्याचा खून झाला होता. त्याचा सूड घेण्यासाठी तीन हजार अरब फौज गेली; परंतु मांडलिक राजाचे कृत्य साम्राज्यसत्तेने उचलून धरले. मांडलिकाच्या सैन्यास मिळण्यासाठी साम्राज्यसेनाही आली. त्या लढाईत मूठभर अरबांनी बायझंटाईन सैन्य पिटाळून लावले होते. तो अपमान हिरॅक्लिअस विसरला नव्हता. अरबस्थानावर प्रचंड चढाई करण्यासाठी मोठ्या सैन्याची जमवाजमव त्याने चालविली होती. याच वेळेस हिजाज व नज्द भागांत मोठा दुष्काळ पडला. खजुरीचेही पीक नव्हते. गुरेढोरे मरत होती. अशा वेळेस घरेदारे सोडून लढाईसाठी जावयास लोक तयार नव्हते. लढाईला योग्य अशी वेळही नव्हती. उन्हाळा फार कडक होता. प्रवासाचे कष्ट फार पडले असते. बायझंटाईन सैन्याविषयी अतियशोक्तिपूर्ण गप्पा पसरल्या होत्या. पुष्कळांनी आम्हास नका नेऊ असे सांगितले. जे अशक्त होते, अधिक दरिद्री होते, ज्यांनी घरदार सोडून जाणे बरे नव्हते त्यांचे अर्ज मंजूर करण्यात आले. या लोकांना रडणारे 'अल-बक्काऊन' असे नाव पडले आहे. या वेळेस मदिनेतील तो चिर असंतुष्ट मुनाफिकीनांचा पक्ष त्यानेही असंतोष पसरविण्यास कमी केले नाही; परंतु जे निष्ठावंत होते ते निघाले. त्यांच्यामुळे इतरांनाही स्फूर्ती आली. भ्याडही झुंजार होऊन उठले. मोहिमेच्या खर्चासाठी देणग्याही देऊ लागले. अबुबकर यानी जवळचे सारे दिले. उस्मानने स्वत:च्या खर्चाने एक मोठी तुकडी तयार केली. दुसरेही प्रमुख लोक असे करू लागले. स्त्रियांनी जडजवाहीर दिले. दागदागिने दिले. "देशासाठी घ्या हे सारे." त्या म्हणाल्या. सैन्य निघाले. बरोबर स्वत: पैगंबर होते. या सैन्याला 'जैश-उल-उस्र' म्हणजे दु:खीकष्टी सैन्य असे नाव आहे. आपद्ग्रस्त सैन्य ! मदिनेचा कारभार पैगंबरांनी अलींवर सोपविला होता. मुहंमदांबरोबर अबदुल्ला इब्न उबय हाही मुनाफिकीनांसह निघाला होता; परंतु वाटेतून तो निमूटपणे मदिनेस परत आला. मदिनेत त्याने अशा कंड्या पिकविल्या की "पैगंबर पहा कसे आहेत ते. ही मोहीम धोक्याची होती, म्हणून त्यानी अलींना मात्र बरोबर नेले नाही." अलींना त्यामुळे वाईट वाटले. ते सशस्त्र होऊन निघाले व पैगंबराना गाठते झाले. पैगंबर त्याला म्हणाले, "म्हणणारे काही म्हणोत. तो नीच आरोप आहे. मी तुला खलिफा नेमले आहे. माझ्याऐवजी नेमले आहे. जा. आपल्या जागी जा. माझ्या व तुझ्या लोकांवर माझा प्रतिनिधी म्हणून रहा. अली मूसाला जसा हारून तसा तू मला हो. जा." आणि अली परत गेले. आपल्या पाठीमागून अलीनी खलिफा व्हावे असे पैगंबरांचे मत होते, असे शिया जे म्हणतात ते याच प्रसंगावरून.

सैन्य जात होते. मदिना व दमास्कस यांच्या मध्यावर पोहोचले होते. तो कळले की शत्रू येत नाही. ते ग्रीक सम्राटाचे केवळ स्वप्न होते. मुहंमदांनी सैन्यास परतण्याचा हुकूम दिला. तबूक येथे वीस दिवस त्यांनी मुक्काम केला. तेथे दाणापाणी भरपूर होते. मुहंमद येतात तो तायफ येथील शिष्टमंडळ आले. नऊ वर्षांपूर्वी त्यांनी पैगंबरास दगडधोंडे मारून घालविले होते. त्यांच्या प्रमुखाचे नाव औरवा. पैगंबरांच्या उपदेशाचा त्याच्या मनावर फार परिणाम झाला होता. हुदैबियाच्या करारानंतर तीन दिवस मुहंमद मक्केत आले होते त्या वेळेस तायेफ येथील जमातींचा कुरेशांकडे तो वकील होता. तो तायेफमधील लोकांना

मूर्तिपूजेविरूद्ध सांगू लागला. नवीन धर्माचा आशीर्वाद घेण्यास चला म्हणू लागला. उपाध्यायांनी व पुजा-यांनी त्याला दगड मारले आणि तो मरणोन्मुख होऊन पडला. मरता मरता म्हणाला, "पैगंबरांसाठी मी माझे रक्त दिले. जनतेच्या कल्याणासाठी मी माझे रक्त ईश्वराला देत आहे. बलिदान करण्याचा मान मला ईश्वराने दिला म्हणून त्याचे आभार !" शेवटी म्हणाला, "हुनैनच्या धळीत लढताना जे मुसलमान मेले, त्यांच्या कबरांजवळच मलाही पुरा."

औरवाच्या जिवंतपणीच्या प्रवचनांचा परिणाम झाला नाही; परंतु या आसन्न-मरण प्रवचनाचा त्याच्या लोकांवर परिणाम झाला. त्यानी मुहंमदांकडे शिष्टमंडळ पाठविले. वाळवंटातील कधी न संपणा-या युद्धांचा त्यांनाही कंटाळा आला असेल. शिष्टमंडळ आले व पैगंबराना म्हणाले, "आम्हांस क्षमा करा व इस्लामच्या गोटात घ्या." पुन्हा म्हणाले, "आमच्या मूर्ती मात्र काही दिवस राहू देत." प्रथम म्हणाले, "दोन वर्षे." नंतर म्हणाले, "एक वर्ष." पुन्हा म्हणाले, "सहा महिने, निदान एक महिना तरी."

परंतु मुहंमद या गोष्टीवर कधीच तडजोड करायला तयार नसत. ते म्हणाले, "इस्लाम व या मूर्ती एक क्षणभरही एकत्र राहू शकणार नाहीत."

मग ते म्हणाले, "आम्हाला रोजच्या प्रार्थनेची तरी सक्ती नाक करू."

पैगंबर म्हणाले, "प्रार्थनेशिवाय धर्म म्हणजे शून्य !"

शेवटी त्यांनी सारे कबूल केले. फक्त स्वतःच्या हातांनी मूर्ती फोडणे त्यांनी नाकारले. अबु सुफियान व मुघीरा यांना ते काम देण्यात आले. तायेफमधील मायाबाया हायहाय म्हणत होत्या व मूर्ती फुटत होत्या!

या वर्षी यमन, महर, ओमान, बहरैन, यमामा वगैरे ठिकाणचीही शिष्टमंडळे आली. एक ताई नावाची जमात अद्याप त्रास देत होती. प्रख्यात हातिमताईचा मुलगा 'अदि' तो त्यांचा पुढारी होता. अली त्यांच्यावर सैन्य घेऊन गेले. अदि सीरियात पळाला. इतरांना कैद करण्यात आले. त्यात अदीची बहीणही होती. सर्वांना सन्मानाने मदिना येथे आणण्यात आले. पैगंबरांनी सर्वांना स्वतंत्र केले. त्यांना देण्याग्या दिल्या. अदीची बहीण सीरियात त्याच्याकडे पाठविण्यात आली. तिने आपल्या भावास मुहंमदांच्या उदात्त वर्तनाविषयी सांगितले. अदीचे हृदय कृतज्ञतेने भरून आले. तो मुहंमदांच्या चरणांशी आला व इस्लामचा स्वीकार करता झाला.

हातीमच्या मुलीचे नाव सुफाना असे होते. ती पैगंबरास म्हणाली : "हे परमेश्वराच्या प्रेषिता, माझा बाप आज जिवंत नाही. मला एकच भाऊ, परंतु तोही आज द-याखो-यांत पळून गेला आहे. मी स्वतः खंडणी भरून मुक्त होऊ शकत नाही. तू उदार हृदयाचा आहेस. मला स्वतंत्र कर. माझा पिता विश्वविख्यात होता. तो आमच्या जमातीचा नेता होता, राजा होता. तो कैद्यांची खंडणी भरून त्यांना मुक्त करीत असे. तो स्त्रियांची अब्रू सांभाळी, त्यांची प्रतिष्ठा राखी. तो गरिबांना पोषी, दुःखितांना शांतवी. कोणी काही मागितले तर त्याने कधी नाही म्हटले नाही. अशा त्या हातमची मी मुलगी. सुफाना माझे नाव. मला तू मुक्त नाही करणार ? माझ्या लोकांना मुक्त नाही करणार ? तुझ्या उदार हृदयाला मी प्रर्थिते, उदार अशा तुझ्या आत्म्याला हाक मारून विनविते."

पैगंबर म्हणाले, "तुझ्या पित्याच्या अंगी खऱ्या मुसलमानाचे गुण होते. मूर्तिपूजक असूनही त्यावर ईश्वराची कृपा व्हावी म्हणून प्रार्थना करण्याची जर मला परवानगी मिळाली तर मी हातिमांच्यासाठी प्रार्थना करीन." नंतर सभोवतीच्या मुसलमानांना उद्देशून ते म्हणाले, "हातिमांची मुलगी मुक्त आहे. तिचा बाप उदारांचा राणा होता. माणुसकीची मूर्ती होता. जे दयावंत असतात त्याच्यावर प्रभू प्रेम करतो. ते देवाचे लाडके होतात. ईश्वर त्यांना बक्षीस देतो."

सुफाना मुक्त झाली. सारेच मुक्त करण्यात आले. मुहंमदांनी सर्वांना देणग्या दिल्या. ते सारे नवधर्म घेते झाले. सुफाना सीरियात भावाकडे गेली व त्याला मुहंमदांचे औदार्य सांगती झाली. अदीचे हृदय कृतज्ञतेने भरून आले. तो मदिनेला आला. मुहंमदांच्या चरणी लागला. इस्लाम स्वीकारता झाला. सुफानाच्या या प्रसंगावर इराणी कविराज सादी याच्या बोस्ताँमध्ये सुंदर कविता आहेत. उदात्त असाच तो प्रसंग होता. जीवनातील महान काव्य त्या प्रसंगी प्रकट झाले होते.

दुसरी एक मोझेना नावाची जमात होती. या जमातीचा काब इब्न झुहेर हा प्रसिद्ध कवी होता. हामुहंमदांचा व नवधर्माचा शत्रू होता. उपहास व टिंगल करी; परंतु त्याचा भाऊ मुस्लिम झाला होता. हा मुस्लिमभाऊ काबला नेहमी म्हणे, "तूही मुसलमान हो. वितुष्टे वाढवू नको. काव्यशक्ती द्वेष पसरवण्यात खर्चू नकोस. खऱ्या धर्माची निंदा नको करूस." एकदा काब गुप्तपणे मदिनेत आला. ज्या मशिदीत पैगंबर प्रवचन करीत होते तेथे तो गेला. पैगंबरांच्या भोवती भक्तिप्रेमाने श्रोते बसले होते, उपदेशामृत पीत होते. हेच ते पैगंबर असे काबने ओळखले. तो एकदम पुढे घूसून म्हणाला : "पैगंबराच्या प्रेषिता, तुझा तिरस्कार करणारा कवी काब मुसलमान होऊन जर तुझ्यासमोर येऊन उभा राहिला तर तू त्याला क्षमा करशील ?"

"हो, करीन." पैगंबर म्हणाले.

"तर मग मीच तो काब !"

मुहंमदांच्या जवळचे लोक त्याच्या अंगावर एकदम धावले; परंतु पैगंबरांनी सर्वांना शांत केले. ते म्हणाले, "मी त्याला क्षमा केली आहे. त्याच्या केसालाही धक्का लागता कामा नये." काबचे कविहृदय उचंबळले. त्याने विचारले, "पैगंबर, मी एक कसीदा म्हणून, पवित्र सुंदर काव्य म्हणू ?" पैगंबर कवींना उत्तेजन देत नसत; परंतु या वेळेस त्यानी परवानगी दिली. काबने स्वत:चे एक कविता म्हटली. अरबी भोषेतील ती उत्कृष्ट कविता आहे. ते एक प्रेमगीत होते.

कवी आपली प्रियकरीण जी सुआद तिच्या वियोगीची दुःखकथा सांगत आहे. "माझी प्रिया मला सोडून गेली. माझे हृदय जळत आहे, झुरत आहे, मी दुःखीकष्टी आहे. अशांत आहे. कशी आग शमवू? कसे हृदय शांत करू ? माझी लाडकी गोड सुआद. कोठे आहे ती ? तिच्या पाठोपाठ तिचा बंदा बनून मी रानोमाळ भटकत आहे. कोठे आहे ती ? कसे अवर्णनीय तिचे सौंदर्य, किती मृदुमंजुळ वाणी, कसा गोड तिचा गळा ! सूर्यचंद्रांच्या किरणांप्रमाणे तिचे हसणे; प्रसन्न व मोहक स्मित !" अशी कविता चाललेली असते आणि काब एकदम विषयांतर करतो. तो पूर्वी सुआदसाठी वेडा होता. आता मुहंमदांसाठी होतो. नवधर्माचा तो महान कवी होता. या महान विषयात शिरतो व उदात्त काव्य निर्मू लागतो. सारे तन्मय होतात.

आणि काव्यातील परमोचच शिख्रर येते :

"जगाला प्रकाश देणारी महान मशाल म्हणजे हे मुहंमद ! जगातील सारे पाप नष्ट करणारी प्रभूची तलवार म्हणजे हे मुहंमद !"

हे चरण म्हणताच व ते ऐकताच मुहंमद एकदम उठतात व आपला झगा काबच्या अंगावर घालतात! हा झगा काबाच्या कुटुंबात सांभाळण्यात आला होता. पुढे मुआवियाने चाळीस दिरहमला तो विकत घेतला. पुढे तो झगा अब्बासींच्या हाती गेला. शेवटी तुर्की सुलतानाजवळ गेला. या झग्याला 'खिरका-इ-शरीफ' पवित्र झगा असे म्हणत.अत्यंत आणीबाणीच्या वेळेस या झग्याचे राष्ट्रीय निशाण करीत. काबने जी कविता म्हटली, तिचे नाव कसीदे बानत सुआद असे आहे. कोणी 'कसीदत-उल-बुर्दा' म्हणजे झग्याचे काव्य असेही नाव देतात.



# २८

# मुहंमदांचे सफल जीवन



जातिजमाती इस्लामी होत होत्या. अरबस्थानातील विरोध मावळत होते. नवराष्ट्र निर्माण झाले. रक्तपात, सूड, भांडणे बंद पडली. तो उत्साह, ते शौर्य आता धर्माकडे वळले. अजून काबाच्या मंदिरात जे मूर्तिपूजक होते त्यांच्याविरूद्ध पैगंबरांनी फर्मान काढले नव्हते. ते लोक जुने परंपरागत धर्मविधी अद्याप करीतच होते; परंतु अत:पर या जुन्या गोंधळास आळा घालण्याचे मुहंमदांनी ठरविले. अद्याप जे नवधर्मात अंत:करणपूर्वक सामील झाले नव्हते, त्यांची मने पुन्हा मूर्तिपूजेकडे वळू नयेत म्हणून सारे जुने अवंशेष, खाणाखुणा नष्ट करणे प्राप्त होते. नवव्या वर्षाच्या यात्रेच्या वेळेस पैगंबरांनी अलीला मक्केत एक शासनपत्र वाचायला सांगितले. मूर्तिपूजेच्या मुळावर घाव घालणारे ते फर्मान होते. मूर्तिपूजेसंबधीच्या सर्व आचारांवर व विधींवर तो शेवटचा प्रहार होता. पुढे दिल्याप्रमाणे ते फर्मान होते:

अत:पर कोणत्याही मूर्तिपूजकास हज यात्रेत येता येणार नाही. तसेच काबाभोवती ज्या प्रदक्षिणा घालावयाच्या त्या दिगंबर होऊन घालता कामा नयेत. पैगंबराजवळ ज्यांचे ज्यांचे करार आहेत ते त्याना मुदत संपेपर्यंत बंधनकारक आहेत. जे यात्रेकरू येतील त्यांनी चार महिन्यांच्या आत आपापल्या प्रान्ती परत जावे . त्या मुदतीनंतर त्यांच्या संरक्षणाची जबाबदारी पैगंबरांवर नाही. अर्थात ज्यांच्या संरक्षणासंबंधी इतर तह व करारनामे असतील त्यांची गोष्टी निराळी.

या जाहीरनाम्यास जबाबदारीची घोषणा असे नाव आहे. मूर्तिपूजक व हे नवधर्मी जर यात्रेत मिसळू दिले असते तर मुहंमदांचे कार्य पुढे नष्टही झाले असते. त्या परंपरागत रुढीचा पगडा पुन्हा बसला होता. ख्रिस्ती व ज्यू धर्मात शिरलेले प्रकार मुहंमदांनी पाहिले होते. त्या धर्मातून मूर्तिपूजेची स्वरुपे शिरली. माराम-या सुरु झाल्या. कत्तली सुरू झाल्या. रुढींचे साम्राज्य पुन्हा बळावले. तसे होऊ नये म्हणून पैगंबरांनी वर सांगितलेली दूरदर्शी योजना केली. यात्रेकरु नवीन जाहीरनामा ऐकून गेले व उरलेसुरले मूर्तिपूजकही लवकरच मुसलमान झाले.

हिजरीचे दहावे वर्ष आले. या दहाव्या वर्षी यमन व हिजाझ या भागातील उरलेसुरले मुस्लिम झाले. तसेच हजरामूत व किन्दा वगैरे ठिकाणच्या जातिजमातीही मुसलमान झाल्या. अरबस्थानातून अनेकांची शिष्टमंडळे येत होती. पुढारी येत होते. आपापली निष्ठा प्रकट करीत होते. मुहंमद सर्वत्र प्रचारक पाठवीत होते. एके दिवशी सकाळची प्रार्थना झाल्यावर मुहंमद म्हणाले, आता प्रचार हवा. कोणी इकडे जा, कोणी तिकडे जा. सर्वत्र जा.लांब जा,दूर जा. ख्रिस्ताच्या प्रचारकांप्रमाणे नका होऊ. ते जवळच्या लोकांतच प्रचार करत झाले. तुम्ही दूरही जा. त्या त्या लोकांच्या भाषा शिका. सर्वांजवळ सौम्यतेने वागा. मानवजातीचे काम

ज्याच्यावर सोपविले गेले तो जर मानवांची सेवा न करील तर ईश्वर स्वर्गाचे दरवाजे त्याला बंद करील । सर्वांजवळ प्रामाणिकपणाने वागा. कोणास फसवू नका. कठोर नका होऊ. लोकांना प्रेरणा द्या, नवोत्साह द्या. त्यांना धिक्कारु नका. ज्यांना पूर्वी ईश्वरी ग्रंथ मिळाले अशा ख्रिस्ती, ज्यू लोकांशीही तुमच्या गाठी पडतात. ते विचरतील, स्वर्गाची किल्ली कशात आहे? त्यांना सांगा, स्वर्गाची कसोटी इश्वरी सत्याच्या पालनात व सत्कर्म करण्यात आहे.

आणि प्रचारक जाऊ लागले. नवीन भाषा शिकू लागले. एकदा दुस-या लोकांची भाषा शिकून जेव्हा काही प्रचारक आले तेव्हा पैगंबरांना फार आनंद झाला. ते म्हणाले, "अत्यंत थोर कर्तव्यांपैकी हे एक कर्तव्य तुम्ही बजावलेत. ईश्वराला ज्या गोष्टींसाठी पैगंबारामुळे तुम्ही जबाबदार आहात, त्या गोष्टींतील दुस-यांची भाषा शिकणे ही फारच मोठी गोष्ट आहे."

पैगंबरांचे जीवनकार्य आता संपले होते. रानटी लोकांतून नव संस्फूर्त असे संघटित राष्ट्र त्यानी निर्माण केले. त्यांना ईश्वरी ज्ञान देऊन कृतार्थ केले, पवित्र केले. त्यांना धर्मग्रंथ दिला. नाना देवांची उपासना करणारे, रक्तपातात रंगणारे असे अरब होते. त्यांना तो सत्यमय व प्रममय व एक अद्वितीय परमेश्वर भजा, असे ते सांगते झाले. विभक्तांना त्यानी एकत्र केले. फाटलेल्या अरबांना जोडले. बंधुभावाने बांधले. संघटित केले. अनादिकाळापासून हे द्वीपकल्प अंधारात गुडुप होते. आध्यात्मिक जीवनाचे नावही नव्हते. ज्यूंच्या वा ख्रिस्त्यांच्या धर्माचा टिकाऊ परिणाम अरबांवर झाला नव्हाता. रुढी, दुष्टता, दुर्गुण यांच्या घाणीत सारे बरबटलेले होते. व्यभिचार होता. लहान मुलींना पुरीत !मोठा मुलगा
स्वत:च्या आईशिवाय बापाच्या ज्या इतर बायका असत, त्यांना स्वत:च्या बायका करी. थोडया वर्षापूर्वी असा हा अरबस्थान होता. परंतु मंहमदांनी केवढे स्थित्यंतर केले ! जणू स्वर्गातील देवदूत खाली वावरयला आले. ज्यांची मने अर्धवट जंगली होती, अशांची मने भ्रातृभाव व प्रेम यांनी भरुन गेली. अरबस्थान नैतिक दृष्टयाही ओसाड वाळवंट होते. देवाच्या व माणुसकीच्या सर्व कयाद्यांची तेथे पायमल्ली होत होती परंतु मुहंमदांनी तेथे नैतिक नंदनवन फुलविले. नितीचे मळे फुलविले. प्रेमाची फुले फुलविले. मूर्तिपुजा व तदनुषगिक इतर वाईट चाली यांचे निर्मूलन केले. जो परात्पर प्रभू स्वत : च्या सामर्थ्याने व प्रेमाने या विश्वाचे नयिमन करतो त्या सत्य देवाची जाणीव अरबांना पूर्णपणे आली. मूर्तिपूजेचा संपूर्ण त्याग मुहंमदांनीच करुन दाखविला. मुस्लिम धर्मात मूर्तिपूजा कोणत्याही स्वरुपात पुन्हा आली नाही अणि जी अरब जात केवळ मूर्तिपूजक होती त्यांना संपूर्णपणे केवळ एका ईश्वराला भजणारे मुहंमदांनी केले. ही खरोखर अद्भुत व अपूर्व अशी गोष्टी होती.

पैगंबरांची वाणी अत्यंत प्रभावी होती. ती दैवी संस्फूर्त वाणी वाटे. परमेश्वराचे अद्वितीत्व इतक्या उत्कटपणे तीव्रपणे कवचितच कोठे उपदेशिले गेले असेल, उद्घोषिले गेले असेल. अरब अत:पर केवळ ऐहिक दृष्टीचे राहिले नाहीत. मरणानंतर अधिक उच्चतर, शुद्धतर व दिव्यतर असे जीवन असते. त्या मरणोत्तर जीवनासाठी या जीवनात दया, चांगुलपणा, न्याय, सर्वत्रिक प्रेम जीवनात दाखविली पाहिजेत, असे पैगंबरांनी शिकविले. हा जो अमूर्त परमेश्वर तो अनाद्यनन्त आहे. तो विश्वाधार आहे. सर्वशक्तिमान, प्रेमसिंधु व दयासागर आहे. ही जी नवजागृती आली त्याचे मुहंमद स्फूर्तिस्थान होते. ईश्वराच्या आदेशाने

या नवचैतन्याचे ते आत्मा होते, प्राण होते ते ! जणू नवप्रेरणेचे अनंत निर्झर होते. या झ-यातून अरबांच्या शाश्वत आशांचे प्रवाह वाहत होते अणि म्हणून मुहंमदांविषयी अपार भक्तिभाव ते प्रकट करीत.

सर्व अरबांची जणू आता एकच इच्छा झाली की, त्या परमेश्वराची सत्याने व पवित्र्याने सेवा करावी. प्रभूची आज्ञा व इच्छा जीवनाच्या सर्व क्षेत्रांतून प्रकट करावी. या वीस वार्षांत पैगंबरांनी जे जे सांगितले जी जी वचने उच्चारिली, जे जे मार्गदर्शन केले, जी सत्ये दिली, ते सारे अरबांच्या ह्रदयात जणू कोरल्यासारखे झाले होते. त्यांच्या जीवनाची ती श्रुतिस्मृति झाली होती. कायदा व नीती यांचे एक्य झाले. सदसद्विवेकबुद्धीसाठी आनंदाने बलिदाने करणारे दिसू लागले. त्यागाची पराकाष्ठा करणारे शोभू लागले. जगाला एवढी मोठी जागृती इतक्या तीव्रपणे व उत्कटपणे क्वचितच कोणी दिली असेल. मुहंमदांनी आपल्या हयातीत आपले कार्य पुरे केले. बुद्धाचे काम अशोकाने पुरे केले. खिस्ताचे कॉन्स्टन्रटांईनने, झोरा आस्टरचे उरायसने इसराएलांचे जोशुआने. परंतु मुहंमदच एक असे झाले ज्यांनी स्वत:चे व पूर्वी होऊन गेलेल्यांचेही कार्य पुरे केले. जणू सारे काम ईश्वरच करवीत होता, मुहंमद निमित्तमात्र होते, असे मुसलमानांनी म्हटले तर त्यात काय आर्श्चय ? ज्याला कालपरवापर्यंत फत्तर फेकून मारीत होते, ज्याला ठार करण्यासाठी जंग जंग पछाडीत होते, त्यानेच नऊदहा वर्षांच्या अवधीत आपल्या लोकांना नैतिक अंध : पाताच्या दरीतून पावित्र्य व न्याय यांच्या शिखरावर नेऊन बसविले. प्रणाम, सहस्रप्रणाम,त्या महापुरुषाला.



# २९

# अखेरचा उपदेश



मुहमंदाचे जीवन म्हणजे उदात्ततेचा आदर्श आहे. उदात्त कार्मांनी खच्चून भरलेले असे हे पुण्यश्लोक जीवन आहे. सुप्त लोकांत त्यांनी चैतन्याची कळा संचरविली. परस्पर भांडणां-याना त्यांनी एक केले. अमर जीवनाच्या आशेने कर्तव्यकर्म करण्याची त्यांनी प्रेरणा दिली. मानवी ह्रदयावर इतस्तत:पडलेले किरण केंद्रीभूत व पुंजीभूत करुन त्यांनी प्रचंड प्रकाशाचा झोत निर्माण केला. आणि त्यांचा उत्साह कसा, आशा कशी अदम्य व अमर ! थांबणे नाही. तडजोडीस वाव नाही. अप्रतिहत धैर्याने हा महापुरुष सारे अडथळे झुगारुन पुढेच जात राहिला. त्यांनी परिणामांची दरकार कधीव बाळगिली नाही. ईश्वरावर श्रद्धा ठेवून जात होते. एकाच ध्येयाना त्यांना सदा निदिध्यास.

स्वत:ची जाणू संपूर्ण विसर त्यांना पडला होता. खिस्ताने निराकर प्रभूचा धर्म दिला; परंतु त्या धर्मात मेरीची मूर्तिपुजा शिरली. परंतु मूर्तिपूजेत चुस्त गढून गेलेल्या अरबांना या न पढलेल्या फकीराने इतक्या प्रखरतेने ईश्वराची एकता पटविली की ती वज्रलेप झाली. ज्यांनी ज्यांनी म्हणून पैगंगरांची वाणी एकदा ऐकिली, त्यांच्या मनावर ईश्वराचे अद्वितीयत्व व मानवी बंधुभाव यांचा वज्रप्राय ठसा उमटल्याशिवाय राहत नसे.

मुहंमद समानतेचे व लोकसत्तेचे भोक्ते होते. त्यांच्या लोकसत्तेच्या गर्जनेने राजेमहाराजे व धर्मोपदेशक गडबडून गेले. मानवी बुद्धीने बंढ करावे म्हणून तो इशारा होता. त्या वेळ्स जुलमी संस्था व भांडकुदळ पंथ यांचा बुजबुजाट झाला होता. दुर्बोध चर्चात मानवी आत्मा गुदमरत होता आणि मानवी शरीर वतनदारांच्या वर्चस्वाखाली तुडविले जात होते; परंतु पैगंबर आले. त्यांनी ही मिरासदारीची भिंताडे साफ पाडली. विशिष्ट हक्क त्यांनी नष्ट केले. स्वार्थी लोकांनी ईश्वराकडे जावयाच्या रस्त्यावर जी जाळी विणून ठेवली होती ती पैगंबरांनी आपल्या जोरदार फुंकरीने नष्ट केली. रस्ता साफ मोकळा झाला. "परमेश्वराजवळ" तुम्ही सारे निर्धास्तपणे जा. तेथे सारे समान. तेथे कोणाला जादा अधिकार नाहीत. पैगंबर स्वत: पंडित नव्हते; परंतु ज्ञानविज्ञानाची महती त्यांनी गायिली आहे. मानवी इतिहास लेखणीने लिहिला जातो. लेखणीने मानवाचा निवाडा केला जातो, न्याय दिला जातो. मानवी कृत्यांची छाननी करणारे, ईश्वराच्या दृष्टीने छाननी करणारे साधन म्हणजे लेखणी. लोखणी म्हणजे ज्ञान. ज्ञानाशिवाय सारे फोल आहे. शिका, वाचा, पहा. असे मुहंमद सांगतात.

ते बुद्धीवर फार जोर देत. आश्चर्ये, चमत्कार असल्या प्रकारांना ते कधीही उत्तेजन देत नसत. भोळसरपणा व बावळटपणा त्याना पसंत नव्हता. ईश्वरी शासनविषयीची जी त्याची कल्पना होती ती सर्वांना

समान प्रवेश देणार होती. पैगंबरांच्या ईश्वर लोकशाहीचा भेक्ता आहे. तो कोणी हुकूमशहा नाही.

मुहंमदांचे धर्मिक ध्येय व्यापक आहे. त्यांची मानवता साधी व सरळ आहे. या सर्व गोष्टी पाहिल्या म्हणजे मुहंमदांचे पूर्वीच्या धर्माचार्यांपेक्षा विशिष्टत्व दिसते. जे जणू अर्वाचीन महर्षी आहेत, असे वाटते. त्यांचे जीवनकार्य उघड आहे, स्पष्ट सामोर जगाच्यापुढे आहे. त्यात गूढता नाही. अस्पष्टतेत ते लपेटलेले नाही. त्यांच्या व्यक्तित्वाभोवती पुराणे रचिली गेली नाहीत, दंतकथा गुंफिल्या गेल्या नाहीत.

आणि अरबस्थानातील जमातीपाठीमागून जमाती नवधर्माच्या स्वीकारार्थ जसजशा येऊ लागल्या तसे मुहंमदांना वाटू लागले की आपले पैगंबर कार्यही समाप्त होण्याची वेळ आली. मक्केची शेवटची यात्रा करुन यावे असे त्यांच्या मनात आले. इ. स. ६३२ च्या फेब्रुवरीच्या २३ तारखेस ते निघाले. त्यांच्या बरोबर लाख दीड लाख यात्रेकरु होते. हज्जत-अल-बलाध म्हणजे मोठी यात्रा असे हिला नाव आहे. किंवा हज्जत-उल-विदा इस्लामची यात्रा असे साधे नाव ही आहे. मीनाच्या दरीत यात्रेचे सारे विधी त्यानी केले. हे विधी उरकण्यापूर्वी ७ मार्च रोजी जबल-उल-अरफात या टेकडीवरुन हजारो मुसलमांसामोर त्यानी शेवटचे प्रवचन दिले. मुहंमद एक वाक्य उच्चारीत. ते वाक्य खालच्या लोकांत असलेला पुन्हा उच्चारी. त्या वेळेस ध्वनिक्षेपक नव्हते. सर्वांने ऐकू जावे म्हणून जिवंत ध्वनिक्षेपक उभे केले होते. ते साधे सरळ प्रवचन होते.

बंधूंनो, मी आज सांगतो ते एका. कारण आणखी एखादे वर्ष मला लाभेल असे वाटत नाही. या जागी पुन्हा तुम्च्यात मी दिसेन, वावरेन, बोलेन असे वाटत नाही. हा आजचा दिवस व हा महिना जसा सर्वांना पवित्र वाटतो, त्याप्रमाणे सर्वांचे जीवन व मालमत्ता पवित्र माना. तुम्ही एकमेकांचे जीवन पवित्र माना. एकमेकांना सांभाळा. ईश्वरासमोर जाण्याची वेळ येईपर्यंत असे प्रेमाने व बंधुभावाने वागा. कोणाच्या प्रणांचा वा घरदारांच्या नाश नका करु. एके दिवशी ईश्वराच्या न्यायासनासमोर उभे राहावयाचे आहे, हे कधीही विसरु नका. त्या दिवसाची नेहमी आठवण ठेवा. तेथे सर्व कृत्यांचा झाडा द्यावा लागेल.

मित्रांनो, पतीचे पत्नीवर काही हक्क आहेत, तसेच पत्नीचेही पतीवर आहेत. आपल्या बायकांना प्रेमाने व सहानुभूतीने वागवा. कठोर नका होऊ. दयाळू रहा. तुम्ही ईश्वराच्या जामीनकीवर आपल्या पत्नीचा स्वीकार केलेला असतो. खरे ना? परमेश्वराच्या शब्दाने त्या तुमच्या कायदेशीर भार्या झालेल्या असतात, ही गोष्ट विसरु नका.

“तसेच तुमच्यावर कोणी विश्वास टाकला तर विश्वासघात करू नका. दिला शब्द पाळा. पाप टाळा. सावकारी निषिद्ध आहे, व्याजबट्टा वर्ज्य आहे, हे ध्यानात धरा. पैसे उसने घेणा-याने घेतले तेवढे परत करावे. व्याज देऊ नये. मुद्दलाची फेड व्हावी. माझ्या मंडळींपासूनच याची अंमलबजावणी सूरू होईल. चुलते अब्बास ऋणकोपासून मुद्दल तेवढेच घेतील.

आणि प्राचीन काळापासून तुम्ही जाहिलियत मानीत आलेत. रक्ताचा सूड घेत आलेत. खुनाचा बदला घेत आलेत; परंतु आजपासून ते बंद होत आहे. ही गोष्ट निषिद्ध आहे. इस्लाममान्य नाही. आजपासून सारी सूडाची भांडणे रद्द झाली समजा. हारीसाचा मुलगा इब्न रबिया यांचा खून झाला; परंतु त्याचा सूड घेण्यात येणार नाही. माझ्याच आप्तेष्टांपासून हा नवीन नियम सुरु करू या. ( इब्न रबिया लहान असता दुस-या जमातीच्या ताब्यात संरक्षणार्थ देण्यात आला होता; परंतु हुझैल जातीने त्याचा क्रूरपणे वध

केला होता. मुहंमदांचा हा चुलतभाऊ होता.) इब्न रबियाच्या या उदाहरणाने आपण नवीन आरंभ करू या.

"आणि तुमचे गुलाम. त्यांना नीट वागवा. तुम्ही खाल तेच त्यांनाही खायला द्या. तुम्ही कपडे घालाल तसेच त्यांना द्या. अक्षम्य असा अपराध त्यांनी केला तरच त्यांना सोडा. लक्षात ठेवा की, कसेही झाले तरी तेही खुदाचे बंदे आहेत. त्यांना कठोरतेने नाही वागवता कामा.

"मित्रांनो, माझे शब्द ऐका, नीट समजून घ्या. सारे मुसलमान एकमेकांचे भाऊ आहेत हे कधीही विसरू नका. तुमचे सर्वांचे एक जणू भ्रातृमंडळ, एक तुमचा महान भ्रातृसंघ. जे दुस-याचे आहे ते त्याने स्वेच्छेने, खुशीने दिल्याशिवाय त्याला हात लावू नका. अन्यायापासून व अन्याय करणा-यापासून दूर रहा, सावध रहा.

"जे येथे आज हजर आहेत त्यांनी हे सारे गैरहजर असणा-यांस सांगावे. येथे ऐकणा-यांपेक्षाही ज्याला सांगितले जाईल तो कदाचित ते अधिकच लक्षात ठेवण्याचा संभव आहे."

असे हे प्रवचन बराच वेळ चालले होते. साधे, सरळ, कळकळीचे, वक्तृत्वपूर्ण असे ते प्रवचन होते. भावनाप्रधान श्रोत्यांची अंत:करणे उचंबळत होती, थरारत होती आणि प्रवचन संपल्यावर पैगंबरांनी पुढील शब्दांनी शेवट केला:

"प्रभो, मी माझा संदेश दिला. मी माझे कार्य पुरे केले आहे."

आणि सभा गर्जती झाली, "खरोखरच तुम्ही आपले कार्य पुरे केले आहे."

पैगंबर पुन्हा अखेर म्हणाले, "प्रभो, माझ्या कामाला तुझीच साक्ष. दूसरे मी काय सांगू ? हीच माजी प्रार्थना."

खिस्ताचे पर्वतावरील प्रवचन अधिक काव्यमय वाटते. मुहंमदांचे हे पर्वतोपनिषद साधे आहे. त्यात गुढ गहन काही नाही. साध्या गोष्टी; परंतु रोजच्या जीवनातील. घरीदारी कसे वागावे, संसारच सुंदर व सारमय कसा करावा, ते त्यांनी सांगितले. सर्वसामान्य लोकांना नैतिक मार्गदर्शनार्थ स्पष्ट व सुबोध दिशा हवी असते. ती स्पष्ट दिशा या प्रवचनात होती.



# ३०

# निरवानिरव



प्रवचनानंतर यात्रेचे सर्व विधी करून पैगंबर पुन्हा मदिनेस जाण्यासाठी निघाले. मदिनेने त्याना आधार दिला होता. तेथेच ते देह ठेवू इच्छित होते. शेवटचे वर्ष होते. प्रांताची व्यवस्था लावण्यात येत होती. मुस्लिम फेडरेशनमध्ये नवधर्म स्वीकारून ज्या जातिजमाती सामील झाल्या होत्या, त्या सर्वांची नीट सुसंघटित व्यवस्था लावण्यात आली. सीरिया व मेसापोटेमियामधील अरब लोकांत जरी इस्लाम अद्याप पसरला नव्हता तरी अरबस्थानात बहुतेक सर्वत्र इस्लामच झाला होता. जनतेला इस्लामी धर्माची शिकवण देण्यासाठी तसेच न्यायदानार्थ व जकातीच्या (म्हणजे गरिबांसाठी जो कर असे तो) वसुलीाठी माणसे नेमून सर्वत्र पाठवावी लागत. यमनमध्ये मुआझ इब्न जबाल याला पैगंबर पाठवीत होते. त्याला निरोप देताना पैगंबरांनी विचारले, एखाद्या विशिष्ट प्रसंगी अडचण आली तर कसा वागशील ?

"कुराणात पाहीन."

"परंतु कुराणातही त्या प्रसंगी कसे वागावे ते न आढळले तर ?"

"तुमचे चरित्र डोळयांसमोर आहे."

"माझ्याही चरित्रात तसा प्रसंग नसेल आलेला तरे ?"

"तर मग मी स्वत:ची बुद्धी वापरीन."

"शाबास ! अशा प्रसंगी स्वत:च्या बुद्धीने निर्णय दे."

पैगंबर बुद्धीला मारणारे नव्हते. पुढे इस्लामी कायद्याची जी वाढ झाली त्यासाठी ही गोष्ट महत्त्वाची आहे. पहिले प्रमाण कुराण. नंतर मुहंमदांचे जीवन, त्यानी दिलेले निकाल, त्यांची वचने, मते; आणि शेवटी या दोहोंच्या प्रकाशात स्वत:ची बुद्धी - शास्त्रपूत निर्मळ बुद्धी वापरणे.

अलीला पैगंबर यमामा प्रांतात पाठवीत होते. त्या वेळेस सांगते झालें, "हे पहा अली, न्याय मागण्यासाठी दोन पक्ष तुझ्या समोर येतील. यासाठी दोघांची बाजू नीट ऐकल्याशिवाय कधी निकाल देऊ नकोस. समजलास ना ?"

एक गोष्ट राहिली होती. सीरियात पाठविलेल्या दूताचा खून झाला होता म्हणून मागे सांगितलेच आहे. त्या खुनाची नुकसानभरपाई बायझंटाईनांपासून घेण्यासाठी सैन्य पाठवावयाचे ठरले; कारण तो नवीन इस्लामी राष्ट्राचा अपमान होता. सैन्याची तयारीही होत आली; परंतु त्या पूर्वीच्या विषाचा परिणाम एकदम अधिक जाणवू लागला. पैगंबरांची प्रकृती अधिक बिघडली. फार दिवस ते वाचणार नाहीत असे दिसू लागले. म्हणून उसामाच्या नेतृत्वाखाली जाणारी ही मोहीम थांबविण्यात आली.

परंतु मुहंमद आजारी आहेत असे कळताच सरहद्दीवरील प्रांतांतून पुन्हा पुंडाई सुरू झाली. कोणी लुटालुटीचा ईश्वरदत्त हक्क सांगू लागले. कोणी कोणी तर स्वत:स पैगंबरही म्हणवू लागले. हे पैगंबर आपापल्या जातिजमाती आपल्याकडे ओढू लागले. यमनचा एक पुढारी फारच गडबड करू लागला. तो श्रीमंत व धूर्त होता. जादूगार होता. काही जादूचे चमत्कार करी. त्याने आपल्या भेवती तेजोवलय निर्माण केले. भोळेभाबडे लोक भोवती जमवून आसपासचा मुलुख तो जिंकू लागला. त्याचे नाव उबय इबन काब असे होते; परंतु अल अस्वद या नावानेच तो प्रसिद्ध आहे.

या वेळेस सहर हा यमनचा गव्हर्नर होता. सहरच्या बापाचे नाव अबाझान. हा पूर्वी इराणचा गव्हर्नर होता. अबाझानने पुढे इस्लामी धर्म स्वीकारला. अबाझानचे त्या प्रांतात फार वजन होते. त्याच्यामुळे यमनमधील अरबच नव्हे तर इराणीही मुस्लिम झाले. अबाझान मरण पावल्यावर त्याचा मुलगा सहर याच्याकडेच पैगंबरांनी प्रांताधिपत्व ठेवले होते.

अल अस्वदने सहरला ठार केले. त्याच्या पत्नीशही बळजबरीने निका लावला. तिचे नाव मर्झबान होते. मर्झबानने एका इराण्याच्या साहाय्याने अल अस्वद दारूत असता त्याचा खून केला !

तुलेह, मोसैलिमा हे आणखी दोघे तोतये पैगंबर उभे राहिले होते. अबुबकरने त्यांची बंडाळी मोडली. मोसैलिमाने तर मुहंमदाना संदेश धाडिला : "देवाचा पैगंबर मोसैलिमा याजकडून देवाचे पैगंबरमुहंमद यांस, सलाम. तुमच्या पैगंबरीमध्ये मी भागीदार आहे. आपणा दोघांत पैगंबरी सत्ता वाटली गेली पाहिजे. निम्मी पृथ्वी मला, निम्मी तुला कुरेशांना; परंतु तुम्ही कुरेश बळकावणारे आहात. तुमच्याजवळ न्याय नाही."

मुहंमदांनी या पत्रास पुढील खणखणीत जबाब पाठविला :

"कृपावंत मेहेरबान परमेश्वराच्या नावे : पैगंबर मुहंमदाकडून मोसैलिमास : जे सत्यमार्गाने जातात त्यांना शांती असते. पृथ्वी ईश्वराच्या मालकीची. प्रभूची ज्याच्यावर कृपा होते त्याला तो ती देतो. ईश्वराला जे भिऊन वागतात त्यांचा भविष्यकाळ असतो. त्यांची भरभराट हाईल."

पैगंबर अशा रीतीने कामकाज पाहतच होते. परंतु आता ते थकले. प्रकृती फारच विघडली. अखेरचे दिवस आले. ते अत्यंत शांत व गंभीर झाले. त्यांच्या अंत:करणात 'निर्वाणपर शांती' उचंबळत होती. अशक्त झाले होते. तरीही सार्वजनिक प्रार्थना ते चालवीत. प्रार्थना म्हणजे त्यांचे अमृत होते. मरणाच्या आधी तीन दिवसपर्यंत हे काम ते करीत होते. शेवटचे तीन दिवसच हे काम त्यानी केले नाही. अबुबकर करीत.

एके दिवशी मध्यरात्री ते उठले. जेथे त्यांचे जुने दोस्त, जुने साथीदार मरून पडले होते, त्या कबरस्थानात ते गेले. त्या कबरांना ते भेटले. त्या त्या कबरीजवळ बसून मुहंमद रडले. ते सारे प्रसंग, त्या लढाया त्याना आठवले. ते कृतज्ञतेचे, प्रेमाचे श्राद्ध होते. ती पवित्र तिलांजली होती. किती सहृदय प्रसंग! कसे कोमल व प्रेमळ मन ! आपापलया कबरीत शांतपणे विश्रांती घेणा-या त्या मित्रांना परमेश्वराने आशीर्वाद द्यावा म्हणून पैगंबरांनी प्रार्थना केली आणि नंतर घरी परत आले.

आजारीपणात आयेषेच्या घरी ते राहत; कारण ते घर मशिदीच्या जवळ होते. जोपर्यंत शक्ती होती. तोपर्यंत ते प्रार्थना चालवीत; परंतु झपाट्याने शक्ती क्षीण होत होती. एके दिवशी अली व अब्बासांचा मुलगा फजल यांच्या आधाराने ते प्रार्थनेला आले. यानंतर मशिदीत ते आले नाहीत. मशिदीतील शेवटचे आगमन ! असे सांगतात की त्या दिवशी त्यांच्या मुद्रेवर अनिर्वचनीय असे मंद स्मित झळकत होते. त्या दिवशी सभोवतीचे सारे बोलले, "किती सुंदर आजचे तुमचे स्मित, किती प्रसन्न व प्रेमळ ही मुद्रा !" कुराणातील प्रार्थना, स्तुती वगैरे सारे म्हणून झाले आणि शांतपणे पैगंबर म्हणाले, "मुस्लिमांनो, कोणाच्या बाबतीत माझ्याकडून काही अन्याय झाला असेल तर सांगा. येथे त्याचे उत्तर द्यावयास मी उभा आहे. तसेच जर मी कोणाचे काही देणे असेन तर माझे जे काही कदाचित असेल ते सारे तुमचेच आहे."

एकजण उठून म्हणाला, "तुमच्या सांगण्यावरून मी एकदा कोणाला तरी तीन दिरहम दिले होते."

पैगंबरांनी लगेच त्याचे तीन दिरहम दिले व म्हणाले, "या जगात मान खाली घालावी लागली तरी हरकत नाही; परंतु परलोकी प्रभूसमोर खाली मान नको !" सारे शांत झाले. पैगंबरांनी पुन्हा प्रार्थना केली. जे हजर होते, जे शत्रूच्या छळामुळे मारले गेले होते, त्या सर्वांसाठी ईश्वराची कृपा त्यानी भाकली. पुन्हा एकदा सर्वांना सांगितले, "वेळच्या वेळेस प्रार्थना (नमाज) करीत जा. धार्मिक व्रते पाळा. बंधुभावाने वागा. शांतीने रहा. सदिच्छा बाळगा." नंतर कुराणातील (२८ : ८३) पुढील आयत त्यानी म्हटली.

"जे नम्र आहेत, जे अन्याय्य गोष्ट करीत नाहीत त्यांना परलोकी प्रासाद मिळतील. जे पवित्र व धर्मशील आहेत त्यांना परिणामी सुख आहे." हा चरण म्हणून ते घरी आले. ते शेवटचे प्रवचन, ती शेवटची सामुदायिक प्रार्थना.

परमेश्वराजवळ जाण्याची घटका जवळ येत चालली. इ. स. ६३२. जूनची ८ वी तारीख हाती. देह गळू लागला. सोमवार होता. पैगंबरा स्वत:शीच प्रार्थना म्हणत होते. प्रार्थना मनात म्हणत म्हणत प्राण गेले! थोर पैगंबरांच्या पवित्र आत्महंसाने परमेश्वराच्या पायांशी कृतार्थ होण्यासाठी उड्डाण केले. दुपारची ११ वाजण्याची ती वेळ होती.



# ३१

# क्षमामूर्ती मुहंमद



अशा रीतीने ही महान जीवनयात्रा संपली. आरंभापासून अंतापर्यंत मानवाच्या व ईश्वराच्या सेवेसाठी वाहिलेली असे ते जीवन होते. किती कसोटीचे प्रसंग, किती मोह ! परंतु या सर्व दिव्यांतून निष्कलंक नि अधिकच सतेज असे ते बाहेर पडले. अग्नीत घातलेल्या सुवर्णाप्रमाणे अधिकच झगझगीत दिसू लागले. तो नम्र साधा धर्मोपदेशक अरबस्थानाचा सर्व सत्ताधीश झाला. राष्ट्राच्या दैवाचा नियन्ता झाला. खुश्रू व सीझर अशांच्या तोलाचा झाला. परंतु अशी सत्ता हाती आल्यावरही तीच पूर्वीची नम्रता, तोच पूर्वीचा साधेपण. तीच आत्म्याची उदात्तता, तीच हृदयाची विशुद्धता; तीच वर्तनातील विरक्ती, तीच भावनांची कोमलता व सुसंस्कृतता. कर्तव्याविषयीच्या प्रखर दक्षतेमुळे त्याना अल-अमीन पदवी मिळालेली होती. ते नेहमी कठोर आत्मपरीक्षण करायचे. एकदा मक्केतील काही श्रीमंत व वजनदार गृहस्थांजवळ ते धार्मिक चर्चा करीत होते. त्यांना नवधर्म समजून देत होते आणि त्याच वेळेस सत्याचे संशोधन करणा-या एका गरीब आंधळयाजवळ न बोलता ते तसेच निघून गेले. तो गरीब मनुष्य मुद्दाम मुहंमदांकडे आला होता; परंतु मुहंमद त्या मातबराजवळच्या चर्चेने प्रक्षूब्ध होऊन म्हणा, तसेच तडक गेले ! परंतु त्याना त्या गोष्टीचा मागून पश्चात्ताप झाला. त्या गोष्टीचा पुन:पुन्हा ते उल्लेख करीत. माझे ते कृत्य ईश्वराला आवडले नसेल असे म्हणत. कुराणात या गोष्टीचा उल्लेख आहे. त्या सु-याला 'पैगंबर रागावले' असे नाव आहे. त्या सु-यात पुढील भाग आहे :

"पैगंबरांनी कपाळास आठ्या पाडल्या व ते निघून गेले; परंतु तो आंधळा गरीब आला होता. आपल्या पापांपासून तो मुक्त झाला नसता, धुतला गेला नसता, असे का तुला वाटले ? तुला काय माहीत तो झाला असता की नाही विशुद्धात्मा ? दोन शब्द त्याच्याजवळ बोलतास तर त्याचे कल्याण झाले असते. जो श्रीमंत होता त्याचे तू उदारपणे स्वागत केलेस. तो शुद्ध आहे की नाही, त्याने आपले पाप धुतले आहे की नाही ते तू पाहिले नाहीस; परंतु जो मनुष्य स्वत:च्या उद्धारासाठी धडपडत आला, तुझ्यापुढे थरथरत उभा राहिला, त्या गरिबाची मात्र तू उपेक्षा केलीस. अत:पर कधीही तू असे करता कामा नये."

असे हे कठोर आत्मपरीक्षण सदैव चाले. अबुबकरांची मुलगी आयेषा व उमरची मुलगी हफसा या मुहंमदांच्या भार्या होत्या. परंतु झैनब नावाची आणखी एक पत्नी होती. ती मुहंमदांना नेहमी मध द्यायची. पैगंबरांना मध फार आवडे. लहानपणी शेळया, मेंढ्या, उंट चारताना मुहंमद द-याखो-यांतून, टेकड्यांवर हिंडत. रानावनातील मध खाण्याची त्याना सवय लागली होती. झैनब प्रेमाने मध देई. आयेषा व हफसा यांना ईर्षा वाटे.

"तुम्ही फार मध खाता. इतका काय मेला मध खावा ! अत:पर मध खाणे सोडून द्या." असे त्या दोन्ही म्हणत. एके दिवशी त्रासून मुहंमद म्हणाले, "आजपासून मधास बोट लावणार नाही !"

परंतु मागून आपणच चूक केली असे त्याना वाटले. मधासारखी सुंदर व हितकर वस्तू मी का सोडावी ? केवळ बायकांच्या आपसांतील स्पर्धेमुळे का मी हे करावे ? ईश्वराने दिलेल्या गोड देणगीचा त्याग करावा ? त्यांच्या मनाला हे बरे वाटेना. कुराणात त्या गोष्टीचा उल्लेख असा आहे कि हे पैगंबर, जे देवाने खायला योग्य म्हणून दिले त्याचा तू आपल्या बायकांना केवळ खूष करण्यासाठी का त्याग करावा? ती वस्तू का निषिद्ध मानावीस, वर्ज्य करावीस ?

त्यानी असत्याशी कधी तडजोड केली नाही. ईश्वर एक आहे या तत्त्वाशी ते कसलीही तडजोड करायला तयार नसत.

परंतु ही एक अत्यंत प्रखर सत्याची गोष्ट सोडली तर जीवनात मिळते घेण्यासाठी ते तयार असत. समाजातील भांडणे कमी व्हावी अशी त्याना फार इच्छा असे. ज्यू व खिश्चन यांच्याजवळ त्यानी पुन:पुन्हा मिळते घेतले. विशेषत: ज्यूंजवळ. परंतु या ज्यूंनी पुन:पुन्हा विश्वासघात केला. नवीन शासनसत्तेचा विश्वासघात केला; म्हणून मुहंमदांना कठोर व्हावे लागले. कुराणातील बरेचसे उल्लेख हे विशेषत: ज्यूंना उद्देशून आहेत. त्या त्या विश्वासघातामुळे, सात्त्विक संतापाने ते आलेले आहेत; परंतु मुहंमद क्षमामूर्ती होते. ते स्वत:चा धर्म सक्तीने लादू इच्छित नसत. आईबापांनी मुलांवरही धर्माची सक्ती करू नये म्हणत. आपण धर्माचा उपदेश करावा. फळ देणे ईश्वराहाती. तो न्याय घेईल. योग्य ते वाढवील. त्याची इच्छा असती तर सारे एका धर्माचे नाही का होणार ? प्रत्येक देशात त्याने ईश्वरी पुरुष निर्मिले, अपौरुषेय धर्मग्रंथ दिले. 'माझा धर्म मला, तुझा तुला, कशाला झगडा ?' असे म्हणावे. आपली मते शांतपणे बुद्धिपूर्वक मांडावी. सक्ती नको." असे ते सांगत. पैगंबर सर्वांशी सलोख्याने राहू इच्छित होते. पत्नी विधर्मी असली, खिस्ती धर्माची असली तरी तिचा धर्म तिला पाळू द्यावा, असे त्यानी सांगितले आहे. ज्यूंचे प्रेम संपादण्यासाठी ते नमाजाच्या वेळेस प्रथम जेरूसलेमकडे तोंड करीत; परंतु पुढे ज्यूंचे दुष्ट व खुनशी वर्तन पाहिल्यावर पैगंबर ईश्वराचे आदेशनुसार काबाकडे तोंड करू लागले. शुक्रवार हा मुख्य दिवस झाला. ज्यूंचे उपवास सोडून नवीन रमजानचे उपवास सुरू झाले. काबाकडे तोंड करणे, काबाची सर्वांनी यात्रा करणे हे ही एक तडजोडच होती. जरी तेथील सर्व देवता भंगण्यात आल्या, तरी तो एक पवित्र दगड प्रभूची आकाशातून आलेली ती खूण त्यांनी ठेवली ! काबाचे पवित्र्य ठेवले, यात कुरेशांजवळ थोडी तडजोड होती. तसेच या करण्यात मुहंमदांची मुत्सद्देगिरी व दूरदृष्टी दिसते. एका दिशेकडे सर्वांचे तोंड एक पवित्र स्थान सर्वांच्या समोर. सर्व राष्ट्राचे यामुळे त्यानी महान ऐक्य निर्मिले. जगातील सर्व मुस्लिमांचे ऐक्य केले. ती थोर ऐक्यकारक गोष्ट होती.

मुहंमद केवळ क्षमामूर्ती होते. स्वत:वर अपकार करणा-यावर त्यानी उपकारच केले. विष पाजणा-यांसही प्रेम दिले. मारायला आलेल्यास प्राणदान व दया शिकविली. आपल्या मुलीचा क्रूर खून करणा-यासही क्षमा केली. स्टेटच्या गंभीर प्रसंगी ते कठोर होत; परंतु वैयक्तिक जीवनात कठोरता त्याना माहीत नव्हती. ते सर्वांशी प्रेमळपणाने वागत. त्यांच्या प्रेमळ वर्तनाच्या शेकडो गोष्टी आहेत. त्यांचे कोमल संस्कारी मन त्या

गोष्टींतून प्रकट होते. अनस नावाचा त्यांचा एक नोकर होता. त्याला कोणी बोलले तर त्याना खपत नसे. तो अनस म्हणाला, "पैगंबरांजवळ मी दहा वर्षे होतो; परंतु रागाचा ऊफ् असा शब्दही ते कधी मला बोलले नाहीत !" कुटुंबातील मंडळींजवळही ते अतिप्रेमाने वागत. त्यांचे मुलगे सारे लहानपणीच मेले. त्याना फार दु:ख वाटे. एक मूलगा त्यांच्या मांडीवरच मरण पावला. एका लोहाराची बायको या मुलाला दूध पाजी. तिच्या धुराने भरलेल्या घरात ते मरणोन्मुख बाळ मांडीवर घेऊन मुहंमद बसले होते. त्या बाळाच्या मरणाने मुहंमद रडले ! मदिनेत स्वत:च्या आईच्या कबरीजवळ मुहंमद रडत. निधनापूर्वी मुहंमद आपल्या बरोबरचे जे साथीदार मित्र मेले, त्यांच्या कबरींना एके रात्री भेटून आले, तेथे अश्रुसिंचन करते झाले. हृदयाची अशी हळूवारता त्यांच्याजवळ होती. म्हणून 'बायक्या,' 'स्त्रीस्वभावाचा' असे त्याना म्हणत.

मुलांचे त्याना फार वेड. रस्त्यात त्यांना थांबवीत. त्यांना प्रेमाने थापट मारीत, त्यांच्या मुखावरून प्रेमाने हात फिरवीत, त्यांना गोष्टी सांगत. त्यांच्या बरोबर फिरत. जणू देवदूतांबरोबर फिरणे ! पोरक्या मुलांविषयी तर त्याना अपार प्रेम वाटे; कारण ते स्वत: त्या मातृपितृविहीन स्थितीतून गेले होते.

केलेला करार त्यानी कधी मोडला नाही. दिलेला शब्द सदैव पाळला. त्यानी कधी कोणाला मारले नाही. बोलण्यात कधी रागावलेच तर, "झाले तरी काय तुला !" तुझे कपाळ चिखलाने भरो ! असे म्हणत. कोणी जर त्याना म्हणाले, "अमक्याला शप द्या, त्याचे नि:संतान होवो म्हणा." तर पैगंबर म्हणत, "मी मानवजातीला शाप देण्यासाठी नाही आलो. दया व प्रेम देण्यासाठी देवाने मला पाठविले आहे." कोणी आजारी असला तर त्याला भेटायला जात, धीर देत. वाटेत प्रेतयात्रा दिसली की लगेच तीत सामील होते. मग गरिबाची असो की श्रीमंताची. ते समतेचे भोक्ते. त्यानी एका गुलामाला मुक्त करून त्याचे लग्न एका खानदानी स्त्रीशी करून दिले होते. स्त्रियांची, गुलामांची स्थिती त्यानी किती सुधारली. ते स्वत: सर्वांना स्वतंत्र करीत. उदाहरणाने शिकवीत. ते गरिबीत आनंद मानीत. श्रमाचे ते उपासक होते. ते स्वत: स्वत:चे नोकर होते. स्वत:चे कपडे शिवीत, जोडे शिवीत. घरात चूलही पेटवीत. दुस-यांचीही दुधे काढून देत. कोणतेही काम त्याना कमी वाटत नसे. एकदा त्यांच्याकडे एक पाहुणा आला होता. तो रात्री इतके जेवला की सांगता सोय नाही. आणि मग रात्री त्याला जुलाब होऊ लागले. सारे अंथरूणातच त्याने केले. पहाटे गुपचूप लाजेने निघून गेला. मुहंमद सकाळी पाहुण्याकडे येतात तो खोलीत पाहुणे नाहीत ! खोलीत सारी घाण. मुहंमदांनी सारे जाणले. ते सारे कपडे घेऊन झ-यावर ते धुवायला गेले. परंतु तो पाहुणा आपली तलवार न्यायची विसरला. तो परत आला; परंतु मुहंमद कोठे आहेत ? तो पाहुणा गावातील मंडळींसह पैगंबराना शोधीत त्या झ-याकाठी आला. तो ते उदात्त दृश्य ! मुहंमद कपडे धूत आहेत. मानवाचे पाप धुवायला आलेला महापुरुष ती घाणेरडी वस्त्रे धूत होता. पाहुणा लाजला !

स्वावलंबनाचे ते भोक्ते. श्रमाने मिळवावे व खावे असे त्याना वाटे. भीक मागणे त्याना पसंत नसे. प्रत्येकाला पोटभर अन्न, अंगभर वस्त्र मिळालेच पाहिजे. त्यासाठी मनुष्याने श्रमावे व समाजाने त्याला द्यावे. एकदा एक धट्टाकट्टा मनुष्य भीक मागत होता. पैगंबर म्हणाले, "तू भीक का मागतोस ?"

"माझ्याजवळ काही नाही." तो म्हणाला.

"हातातील हा नक्षीदार कटोरा आहे ना ?"

"त्याचे काय करू."

"मी तो विकतो कोणाला तरी. आण इकडे."

मुहंमदानी तो कटोरा विकला. त्याच्या पैशाने त्या भिका-याला त्यानी एक कु-हाड घेऊन दिली व ते म्हणाले, "जा पहाडात. लाकडे तोडः मोळी आण व वीक. पैसे येतील ते माझ्याजवळ दे." तो भिकारी जंगलात गेला. भली मोठी मोळी घेऊन आला. मुहंमदांनी ती विकली. जे पैसे आले त्यातून त्याला खाण्यापुरते देऊन बाकीचे स्वतःजवळ त्यानी ठेवले. एक महिना याप्रमाणे झाले. महिनाअखेर मुहंमद म्हणाले, "हे बघ तुझे शिल्लक पैसे. यातून कपडे घे आणि असाच श्रमाने जगत जा. समजलास ना ?"

ते श्रमोपासक होते. कर्मयोगी होते. कोणतेही काम त्याना कमीपणाचे वाटत नसे. त्याना गुरेढोरे चारणे फार आवडे. आणि गुरांवर तरी प्रेम किती ! 'वेळच्या वेळी पाणी पाजा. शक्तीबाहेर मुक्या प्राण्यापासून काम घेऊ नका,' अशी त्यांची शिकवण आहे. अर्थात मांसाशनत्यागाचा प्रयोग त्यानी केला नाही. उंट, शेळया, मेंढ्या हे देवाने दिलेले अन्न आहे असे ते म्हणत. अरबस्थान ओसाड भूमी. तेथे दाणापाणी नाही. तेथे दुसरे खाद्य कोणते ? हिंदुस्थानासारख्या सुपीक भूमीतच मांसाशनत्यागाचा प्रयोग शक्य. तोही संपूर्ण यशस्वी झाला नाही. बंगालमध्ये ब्राह्मणही मासे खातात. एकदा पूज्य विनोबाजीना धुळे तुरुंगात एकाने म्हटले, "बंगाली लोक तर मासे खातात !" विनोबाजी म्हणाले, "बंगालची हवा अशी आहे की पोटात काही तरी माशासरखा पदार्थ गेल्याशिवाय लोक जिवंतच राहणार नाहीत. सर्वत्र प्रचंड नद्या. गरीब लोकांना पाण्यात जणू राहावे लागते. मलेरिया, डास. अशा सर्द हवेत अंगात उष्णता राहण्यासाठी मासे न खातील तर काय करतील ? माशांऐवजी अमुक एक वनस्पत्याहार केला तर तोच परिणाम होईल, असे कोणी प्रयोगाने जोपर्यंत दाखवीत नाही आणि तो आहर सर्वांना, गोरगरिबांना परवडेल व मिळेल असे जोपर्यंत दाखवीत नाही, तोपर्यंत बंगाल्यांना नावे नका ठेवू. त्यांना मासे खाऊ दे व भरपूर काम करु दे. देशसेवा करु दे." आणि एका प्रख्यात चिनी लेखकाने चीनच्या सर्वभक्षत्वाविषयी लिहिताना म्हटले आहे, "चीनमधील अपरंपार लोकसंख्या, सदैव येणारे पूर, येणारे दुष्काळ, होणारी वादळे, नद्यांचे बदलणारे प्रवाह, हे सर्व ध्यानात घ्या व मग चिनींच्या खाण्यावर टीका करा."

पैगंबर शक्य ते सांगत. अशक्य ध्येये त्यानी दिली नाहीत. यात्रेच्या वेळेस उंट मारतात; परंतु पैगंबरांनी स्वच्छ सांगितले आहे की उंटाचे रक्त देवाला मिळत नसते. देव सत्कर्मे बघतो. मग त्यांनी ती चालू का ठेवली ? त्यामुळे गरिबांना जेवन मिळते. पोटभर मेजवानी मिळते. पशूंच्या बलिदानाने स्वर्गप्राप्ती, प्रभुप्राप्ती त्यानी कधी सांगितली नाही." हत्या करण्यापूर्वीही देवाचे नाव घ्या. शस्त्र तीक्ष्ण असू दे. हाल करू नका. असे मुहंमदांनी सांगितले आहे. भक्षणार्थ हिंसा 'मुभा' असे कुराणी धर्म मानतो.

पशुपक्ष्यांविषयी त्याना प्रेम वाटे. एकाने घरट्यातून पिले चोरून आणली. ती पक्षीण घिरट्या घालीत येत होती. तो गृहस्थ पिले घेऊन, मुहंमदांकडे आला. पैगंबर म्हणाले, "ती पिले त्या चादरीवर ठेव." त्याने तसे केले. ती पक्षीण प्रेमाने झळबून तेथे एकदम आली. पैगंबर म्हणाले, "पहा हे प्रेम. ईश्वराचे याहूनही आधिक प्रेम सर्वांवर आहे. जा, ही पिले पुन्हा त्या घरट्यात नेऊन ठेव."

असे हे प्रेमधर्मी मुहंमद होते. जे अनाथ, परित्यक्त असत त्यांना कोणी नसे, जे दुःखी व रंजले-गांजलेले असत ते मुहंमदांजवळ येत, दुःखे सांगत. मुहंमद त्यांच्याजवळ बसत, बोलत, चौकशी करीत. बायका आपल्या निर्दय पतींच्या तक्रारी घेऊन येत. अगदी गरीब गुलामही त्यांच्याकडे येत व त्यांचा हात धरून त्याना आपल्या धन्याकडे नेत व म्हणत, "सांगा या आमच्या मालकांना दोन शब्द. आम्हाला नीट वागवायला सांगा. मुक्त करायला सांगा." गरीब झोपड्यांतून ते जायचे. सर्वांची विचारपूस करायचे. सर्वांचे अश्रू पुसायचे, जवळ असेत ते द्यायचे.



# ३२

# दिव्यभव्य जीवन



त्यांच्या बायकांच्या लहान लहान झोपड्या अलग अलग अशा एका ओळीने होत्या. या झोपड्या साध्या, ताडपत्र्यांनी आच्छादिलेल्या चिखलामातीच्या अशा होत्या. मुहंमद स्वत: घर झाडीत. कधी पाहुणे आले तर त्यांना आधी जेवण देत. कोणी गरीब आला तर त्याला बरोबर जेवायला बसवीत. ज्यांना घरदार नसे ते मुहंमदांच्या घराबाहेर एक बाक असे त्यावर बसलेले असावयाचे किंवा जवळच्या मशिदीत असत. मुहंमदांच्या औदार्यावर ते जगत. त्या लोकांना 'बाकावरचे लोक' असे म्हणत. त्यांतील काहींना सायंकाळी आपल्याबरोबर जे असेल ते खायला बोलावीत. काहींना आपल्या शिष्यांकडे पाठवीत. मोठे पाहुणे आले तर त्यांची सुखी व सधन शिष्यांकडे सोय करीत. मुहंमदांचा मुख्य आहार खजूर व पाणी हा असे. मिळाली तर बार्लीची भाकरी. त्यांची चैन म्हणजे दूध व मध; परंतु त्यातही संयम राखीत. अबु हुरेरा सांगतो की पुष्कळ वेळा पैगंबरांना उपाशी राहावे लागे. कधी कधी कित्येक दिवस घरात चूल पेटलेली दिसत नसे. अशा वेळेस ते खजूर व पाणी यांवरच राहत. मुस्लिम इतिहासकार लिहितात, "ईश्वराने जगातील खजिन्यांची किल्ली मुहंमदांसमोर ठेवली; परंतु त्यानी ती नाकारली."

विरक्त त्यागमय जीवन. गरिबीत आनंद मानणारे जीवन. दारिद्र्य हा माझा अभिमान आहे असे ते म्हणत. "देवा, मला गरीब ठेव. अशी प्रार्थना करीत. मला गरीब राहू दे, गरीब मरु दे, गरिबीत वाढू दे" म्हणत. एकदा एक मनुष्य पैगंबराना म्हणाला, देवाची शपथ, माझे तुमच्यावर फार प्रेम आहे. पैगंबर म्हणाले, जर माझ्यावर तुझे खरे प्रेम असेल, तर मग दारिद्र्याचे चिलखत तयार कर. दारिद्र्याने नट. नदी समुद्राकडे धावत जाते. तिच्यापेक्षाही अधिक जलदीने गरिबी त्याच्याकडे धावत जाते जो माझ्यावर प्रेम करतो. गरिबांना तुझ्याकडे येऊ दे, म्हणजे ईश्वराजवळ जाता येईल. तू गरिबांना जवळ घेशील तर ईश्वर तुला जवळ घेईल. गरिबीने राहावे, साधेपणाने राहावे अशी त्यांची शेकडो वचने आहेत. तुम्ही गरिबांना व गरजवंतांना समाधान द्याल त्यात माझे समाधान आले. ऐषआरामापासून, सुखासीन जीवनापासून दूर रहा. ईश्वराचे जे खास सेवक आहेत, जे खूदाई खिदमतगार आहेत त्यांना ऐषआरामी राहून सच्ची पूजा करता येणार नाही. असे ते सांगत. एकदा पैगंबरांकडे पाहुणा आला तर त्याना पीठ उसने आणावे लागले ! गरिबीचे व्रत त्यानी अक्षरश: पाळले. ते गरिबांशी एकरूप झाले. ते मेले तेंव्हा काही हत्यारे, एक उंट व लहानशी जागा हीच काय ती त्यांची धनदौलत मागे हीती. त्यांचे चिलखतही एका सावकाराकडे गहाण होते. ते सोडवायला पैसे नव्हते ! मुहंमदांची मुलगी हझरत फातिमा हिला स्वत: दळावे लागे. हातांना तिच्या फोड येत एकदा ती पैगंबरांना म्हणाली, "मला मदतीला एक गुलाम द्या." प्रेमळ पिता म्हणाला, नोकरांपेक्षा

अल्लाचे नाव घेत जा ते अधिक बरे !" दळताना देवच मदत करीन. जणू दंडात शक्ती येईन.

स्तुती त्याना आवडत नसे. "मी परमेश्वराचा सेवक आहे, त्याचा दूत आहे. मीही एक साधा मनुष्यच आहे."असे ते म्हणत. एकदा आयेषाने विचारले, "प्रभूच्या कृपेशिवाय स्वर्गात कोणालाच जाता येत नाही का ?"

"नाही, नाही, नाही." त्रिवार म्हणाले.

"तुमच्या गुणांमुळे तुम्हालाही प्रवेश नाही का मिळणार ?"

"नाही. ईश्वराची कृपा झाल्याशिवाय माझाही स्वर्गात प्रवेश नाही. तो मला कृपावस्त्राने झाकील तरच मी स्वर्गात जाऊ शकेन."

प्रार्थना हे त्यांचे जीवन होते. ते म्हणत, "मी मर्त्य मनुष्य आहे. किती चुका झाल्या असतील ! रोज हजार वेळा मला प्रार्थना करु दे. प्रभूची क्षमा मागू दे."

अशी निस्सीम निरहंकारता त्यांच्या ठायी होती.

त्याना नि:संशयपणे वाटे की आपण देवाचे संदेशवाहक आहो. त्याना तसे अनुभव आले होते. किती त्यांचा मानसिक झगडा चालला होता. अशा झगड्यांतून ती श्रद्धा निर्माण झाली होती. म्हणून ते म्हणत, कुराण देवाचे आहे. ती माझी वाणी नाही. माझ्याद्वारे तो बोलत आहे. कुराणात काही काही ठिकाणी खरेच अपार स्फूर्ती वाटते; परंतु जेथे कायदेकानून आले आहेत, रोजच्या जीवनात कसे वागावे याचे नियम आले आहेत, तेथेही ते संस्फूर्त असत का ? त्यांच्या कार्याचे क्षेत्र जसजसे वाढले तसतसे शिकवणीचे क्षेत्र व्यापक करावे लागले. ते पैगंबर होते, आता राष्ट्रस्थापक झाले. राष्ट्रस्थापक या नात्याने त्याना अनेक नीतिनियम, कायदे द्यावे लागले; परंतु ते फसवणूक नव्हते करीत. ईश्वराची स्फूर्ती व प्रेरणाच मला वीचार देते, असे त्याना वाटत असे. ते स्वत: नि:स्वार्थी होते; त्यामुळे आपण ईश्वराच्या हातातील आहोत असे त्याना वाटे. केवळ मुत्सद्देगिरीने, लोकांनी विश्वास ठेवावा म्हणून देवाने असा आदेश दिला, असे विचार वदविले, असे नव्हते ते करीत. असे दांभिक ते असते तर आज दीड हजार वर्षे त्यांचे जीवन स्फूर्ती देत राहिले नसते.

हा दांभिकपणाचा आरोप जसा मिथ्या आहे त्याप्रमाणेच रंगेलपणाचा. रंगेंला रसूल, अशी चोपडीही त्यांच्यावर लिहिली गेली. परधर्माचा अभ्यास करण्याची ही रीत नव्हे. रंगेल्यांच्या पाठीमागे कोट्यवधी लोक शेकडो वर्षे गेले नसते. दुस-याच्या धर्माविषयी अभ्यास करताना अत्यंत आपुलकीची भावना हवी.

कुराणात पैगंबरांनी चार बायका करण्याची परवानगी दिली आहे; परंतु शेवटी तर एकच बरी असेही मत दिले आहे. शिवाय सर्व बायकांना समतेने नसेल वागवता येणार तर अधिक बायका करू नकोस, असेही त्यानी सांगितले आहे. अरबस्थानात किती बायका कराव्या याला सुरारच नसे. मुहंमदांनी त्याला बंधन घातले. काही मर्यादा घातली. तेथे एकदम एकपत्नीव्रत सांगते तर कोणी ऐकतेही ना.

टीकाकार व निंदक म्हणतात, "पैगंबरांनी इतरांना चारच बायका ठेवल्या. स्वत: मात्र किती तरी केल्या !" एक गोष्ट आधी लक्षात ठेवली पाहिजे की कुराणातील चार पत्नींची मर्यादा सांगणारे वचन त्यांच्या मुखावाटे बाहेर पडण्यापूर्वी त्यांची सारी लग्ने झाली होती, त्या वचनानंतर नव्हेत. ज्यांना त्यानी

चारच बायकांची परवानगी दिली, ते काडीमोड करू शकत असत आणि पुन:पुन्हा अनेक लग्ने करू शकत असत. मुहंमदांनी कधी काडीमोड केला नाही; परंतु मुख्य गोष्ट आहे ती ही की, मुहंमदांनी केलेली लग्ने ही विषयसुखार्थ नव्हती, विलासार्थ नव्हती. अनेक कारणांमुळे ती त्याना करावी लागली. त्या लग्नांचे इतिहास पाहाल तर त्या लग्नांतून विलासिता न दिसता मुहंमदांची त्यागता व उदात्तताच दिसेल आणि पहिली पत्नी - ती थोर खदिजा, ती जोपर्यंत जिवंत होती तो पर्यंत पैगंबरांनी कधीही लग्न केले नाही. यावरुन त्यांची दृष्टी दिसते. ते केवळ भोगी असते तर खदिजा मरण्यापूर्वीही सुंदर बायको करते. खदिजा वृद्ध झाली होती. ती त्यांच्यापेक्षा वयाने मोठी होती. तरी तिच्याशी निष्ठावंत राहिले. खदिजा ६५ वर्षंची होऊन मरण पावली. तिच्या मरणानंतरची पैगंबरांची सारी लग्ने ! सौदेजवळ त्यानी लग्न केले. ती एक विधवा होती. तिचा नवरा मुस्लिम झाला होता. तो अबिसीनियात त्यांच्याबरोबर गेला होता. तो तिकडेच निर्वासित असता मरण पावला. पत्नी निराधार. मुहंमद तिचा सांभाळ कसा करू शकते ? तिच्या पतीने नवधर्मार्थ सर्वस्व दिले होते. ती अनाथ पत्नी परत आली, विधवा होऊन आली ! पैगंबरांनी तिला पत्नी करून तिचा सांभाळ केला. जे पुढे खलिफा झाले, जे पैगंबरांना अगदी आरंभी मिळाले ते अबुबकर. त्याना एक मुलगी होती. तिचे नाव आयेषा. ती केवळ १७ वर्षांची; परंतु अबुबकर यांची फार इच्छा की ती पैगंबरांना द्यावी. अरबांत पती मेल्यावर पुन्हा विवाह करता येत असे. मुस्लिम धर्मात ती परवानगी आहे. पैगंबरांच्या पत्नींना मात्र पुनर्विवाहाची परवानगी नव्हती. आयेषाचा स्वीकार मुहंमदांना करावा लागला; कारण अबुबकर म्हणाले, "तुमच्याबद्दल मला जे काही वाटते त्याची खूण म्हणून ही कन्या घ्या." मुहंमदांनी तिचा स्वीकार केला आणि पुढे जो दुसरा खलिफा झाला तो उमर. त्या उमरला एक मुलगी होती. तिचा पहिला नवरा बद्रच्या लढाईत पडला. तिच्या पुन्हा लग्नाविषयी उमर बेफिकीर होता. ही मुलगी मोठी कडक होती. तिच्याजवळ विवाह कोण करणार ? उमर आपल्या मुलीची काळजी घेत नाही असे लोक म्हणून लागले, त्याला नावे ठेवू लागले. तेव्हा उमर अबुबकर यांच्याकडे गेले व म्हणाले, "तुम्ही माझी मुलगी करा." परंतु अबुबकर यानी नकार दिला. उमर उस्मानकडे गेला व त्याला प्रार्थना करता झाला. उस्माननेही ती गोष्ट नाकरली. उमरचा स्वभाव रागीट व मानी होता. तो रागावला. त्याला अपमान वाटला. तो रागाने लाल होऊन पैगंबरांकडे आला. पैगंबरांनी त्या मुलीशी लग्न लावले व उमरला शांत केले. अशी ही तीन लग्ने आणि ते झैनबजवळचे लग्न. त्याचा इतिहास आहे. मुहंमदांचा आवडता प्रिय शिष्य झैद होता. तो गुलाम होता. मुहंमदांनी त्याला मुक्त करून त्याचे झैनबशी लग्न करून दिले. झैनब खानदान घराण्यातील. ती सुंदर होती. तिला हा विवाह सलत होता. पतिपत्नीचे पटेना. खटके उडत. एकदा मुहंमद झौदच्या घरी गेले होते. त्या वेळेस झैनबचे मुख अनाच्छदित होते. तिचे सुंदर मुखकमल पाहून पैगंबर म्हणाले, "इश्वराला धन्यवाद ! मानवी हृदयांचा तो खरा सत्ताधीश." पागंबरांच्या म्हणण्याचा अर्थ ज्या ईश्वराने असे सौंदर्य निर्मिले तो किती थोर व सुंदर असेल ! मनुष्याच्या हृदयाने त्या सौंदर्यसागर ईश्वराला वरावे. मानवी हृदयांवर खरी सत्ता त्या सुंदरतम प्रभूची असावी. मुहंमद निघून गेले झैनबला गर्व वाटला. ती झैदला म्हणे, "पैगंबरी माझ्या सौंदर्याची स्तुती करतात. बघ." एके दिवशी झैद त्रासून पैगंबरांकडे आला व म्हणाला, "काडीमोड करावा असे वाटते."

"का, तिचा काही विशेष अपराध आहे का ?"

"तसे नाही; परंतु तिच्याबरोबर राहणे कठीण."

"असे नको करू, जा. आपल्या पत्नीस सांभाळ. तिला नीट वागव. प्रभूला भी; कारण ईश्वराने सांगितले आहे की आपल्या बायकांची काळजी घ्या, माझी भीती बाळगा." परंतु झैदने ऐकले नाही. शेवटी काडीमोड झाला. मुहंमदांना फार वाईट वाटले. श्रेष्ठकनिष्ठपणा जावा म्हणून हा विवाह मुद्दाम त्यानी लावला होता. त्यानीच हे लग्न जमविलेले होते. झैनब मुहंमदांकडे आली व मला तुमची पत्नी करा असा अट्ट धरून बसली. मुहंमदांनी तिचे पाणिग्रहण केले. झैनब केवळ सुंदर म्हणून मुहंमद वरिते तर झैदची निष्ठा राहती का ? परंतु या लग्नानंतरही झैदची भक्ती तशीचा होती. मुहंमदांच्या शुद्ध वृत्तीचाहाच मोठा पुरावा आहे.

एकदा बनी मुस्तलिक जमातीचा पाडाव करण्यासाठी मुस्लिम सैन्य गेले. लढाईनंतर अनेक कैदी आणले गेले. त्यात झुबेरिया एक स्त्री होती. मुहंमदांनी तिची मुक्तता केली. ती म्हणाली, "मला तुमचीच करा." मुहंमदांनी लग्न केले. मुसलमानांनी हे ऐकले. बनी मुस्तलिक जमात पैगंबरांशी आता संबद्ध झाल्यामुळे सर्वांनी आपापल्या जवळचे कैदी मुक्त केले आणि ही जमात नवधर्म घेऊन मित्र झाली. मुहंमदांच्या या लग्नास सर्वांचे आशीर्वाद मिळाले. खैबर खिंडीजवळील ज्यूंवरील मोहिमेत एक सफिया नावाची ज्यू स्त्री होती. तिच्याजवळ मुहंमदांनी लग्न केले. माझ्या मनात ज्यूंविषयी द्वेष नाही, हे जणू त्यांनी दाखवले- मक्केत मुहंमदांनी मैमूनाजवळ विवाह केला. या विवाहामूळे पूर्वीचे दोन विरोधी वीर इब्न अब्बास व खलिद बिन वलीद हे पैगंबरांच्या बाजूचे झाले. लढाईत पडलेल्यांच्या निराधार बायकांजवळही त्यानी अशीच तीन लग्ने केली होती. लग्नापाठीमागचा हेतू विषयासक्ती नव्हता. काही विवाह करूणाप्रेरित होते; काही कर्तव्यासाठी. काही त्या आरंभीच्या कठीण काळी मिळालेल्या मित्रांची मने न दुखवावी म्हणून काही जातीजमातींतील वंशपरंपरा चाललेली भांडणे मिटवण्यासाठी. मुहंमदांच्या या अशा विवाहांनी अनेक जाती एक झाल्या. या विवाहांतून वैरे विझली, प्रेम वाढले. नवीन संघटित अरब राष्ट्र निर्माण झाले.

कोणी म्हणतात की यातील काही लग्ने पुत्रेच्छेनेही केली गेली असतील. खदिजेपासून जे मुलगे झाले ते सारे लहानपणीच मेले. मुलगा वाचला नाही. त्यांचे निंदक 'अल-अब्तर' शेपूट तुटलेला असे म्हणत. ज्याला पुत्र नाही तो दुर्दैवी मानला जाई. या हेतूनेही काही विवाह केले असतील. मुहंमद हे मानवच होते. ते ईश्वर नव्हते. मी साधा मनुष्य आहे, तुमच्यासारखा, असेच ते अगर्वतेने म्हणत.

मुहंमदांवर विलासीपणाचा आरोप माणुसकी असणारा माणूस करणार नाही. खदिजेविषयी किती प्रेम ! ती वृद्ध होऊन मेल्यावरही तिची आठवण येताच मुहंमद सद्गदित होत. तिची प्रेमळ आठवण त्याना मरेपर्यंत होती. एकदा आयेषा खदिजेविषी काही अपमानास्पद बोलताच मुहंमदांना अपार दुःख झाले. ते म्हणाले, "जगात माझ्यावर कोणाचा विश्वास नव्हता तेव्हा तिने ठेवला. तिची स्मृती पवित्र आहे." लेनपूल लिहितो, "कबरेत पडलेल्या वृद्ध पत्नीची अशी प्रेमळ स्मृती बाळगणे हे महानुभाव पुरूषाचे लक्षण आहे. विषयी किड्यांच्याजवळ अशी थोर वृत्ती आढळणार नाही."

थोरांच्या लग्नात महान अर्थ असतात. जणू ते पती बनून पालक होतात. सांभाळकर्ते होतात. ते

तुम्हा आम्हांस जमणार नाही. सतरा वर्षांच्या मुलीजवळ निग्रही मुहंमदच लग्न लावू शकतील. तुम्ही आम्ही याचे अनुकरण करायचे नसते. तसे करायला पैगंबरांनी सांगितले नाही. सतरा वर्षांच्या या मुलीखेरीज बाकीच्या सर्व बायका विधवा होत्या. मुहंमदांनी सर्वांचा सांभाळ केला. या आपल्या भार्यांमार्फत स्त्रियांत ते धर्मप्रचारही करीत. स्त्रियांत एरवी विचार कसे जाणार?

१९३२ साली धुळे तुरूंगात आम्ही होतो. कोणी तरी पू. विनोबाजीना प्रश्न केला, "मुहंमदांनी किती लग्ने केली ? सतरा वर्षांच्या मुलीजवळही."

विनोबाजी गंभीर झाले. डोळे चमकले.

"थोरांच्या लग्नाचा पुष्कळ वेळा पालक होणे एवढाच अर्थ होतो. मुहंमदांना का तुम्ही भोगी समजता? ते असे असते तर दुनिया त्याना जिंकता अली नसती. गिबन, कालाईल वगैरे महान पंडितांनी त्यांची स्तुतिस्तोत्रे गायिली नसती. पैगंबर महापुरुष होते. थोर विभूती होते. त्यांचे चरित्र डोळ्यासमोर आले तर माझी समाधी लागायची पाळी येते !"

विनोबाजींचे ते कातर सकंप भावभक्तीने भरलेले शब्द माझ्या कानांत घुमत आहेत. पैगंबरांच्या चरित्राने समाधी लागेल ? होय, खरेच लागेल ! ते दिव्य, भव्य जीवन आहे, अलोट श्रद्धेचे, त्यागोचे, क्षमेचे, धैर्याचे संस्फूर्त जीवन आहे. प्रेमळ, निरहंकारी जीवन ! गुलामाने जेवायला बोलावले तरी जात. रस्त्यात कोणी भेटला तर हातात हात देत आणि त्याने आपला हात काढून घेतल्यावर आपला हात मागे घेत परंतु ते आपण होऊन प्रथम आपला हात आधी मागे घेत नसत. त्यांचा हाता अत्यंत उदार होता. त्यांची वाणी अती मधूर होती. त्यांच्याकडे जे जे पाहत त्यांचे हृदय पूज्यतेने भरून येई. जे जवळ येत ते प्रेम करू लागत. लोक वर्णन करताना म्हणत, "असा पूर्वी कधी पाहिलानाही, पुढे असा दिसणार नाही !" किती विशुद्ध, प्रेमळ, परंतु शौर्यधैर्याने संपन्न ! अशा विभूतीविषयी पूज्यभावच नाही तर प्रेमही वाटते, वाटते, याच्या पायाही पडावे व याच्या गळा मिठीही मारावी. अरब लेखकांना, अब्दुल्लाच्या या मुलाच्या गुणांचे वर्णन करताना धन्यता वाटते. हृदयाचे बुद्धीचे हे थोर गुण स्तविताना परम कृतार्थता व अभिमानही वाटतो.

जे प्रतिष्ठित व मोठे असत त्यांच्याजवळ ते सभ्यतेने वागत. गरिबांजवळ प्रेमाने वागत. आढ्यताखोराजवळ धीरोदात्तपणे वागत. सारेच अखेर त्याना स्तवू लागले. हृदयातील त्यांची उदारता मुखावर फुललेली असे. त्याना अक्षरज्ञान नव्हते; परंतु निसर्गाचा महान ग्रंथ त्यानी नीट अभ्यासिला होता. त्यांचे मन वाढते होते, विशाल होते. विश्वात्म्याजवळच्या समरसतेने त्यांचा आत्मा जागृत व उदात्त झालेला होता. पंडित वा अज्ञानी दोघांवरही त्यांचा प्रभाव पडे आणि त्यांच्या तोंडावर एक प्रकारची भव्य दिव्यता दिसे. प्रतिभाशाली विभूतिमत्व जणू त्यांच्या अंतर्बाह्य जीवनातून सरवत होते.

इतरांना ते संस्फूर्त करीत. विभूतिमत्त्वाचे हे लक्षण आहे. नम्रता व दयाळूपणा, सहनशीलता व स्वसुखनिरपेक्षता, औदार्य व निरहंकारवृत्ती त्यांच्या वर्तनात भरलेली होती. सर्वांचे प्रेम ते आकर्षून घेत. जेवायला बसताना ईश्वराचे आभार मानल्याशिवाय, त्याची कृपा भाकल्याशिवाय राहत नसत. आभार मानल्याशिवाय भोजन करून उठत नसत: दिवसा जेव्हा प्रार्थनेत (नमाज) मग्न नसतील तेव्हा पाहुण्यांच्या भेटी, मुलाखती घेत. सार्वजनिक कामकाज बघत.

फार झोपत नसत. बहूतेक वेळ प्रार्थनेत दवडीत. प्रार्थना (नमाज) त्यांचा प्राण होता. झोपेपेक्षा प्रार्थना बरी, असे ते नेहमी म्हणत. कट्ट्या शत्रूजवळही त्यांचे वर्तन उदार व दिलदार असे. त्यानी सूड कधीच घेतला नाही. राष्ट्राच्या शत्रूच्या बाबतीत अती झाले म्हणजे ते कठोर होत. त्या प्रेमसिंधूला परिस्थितीमुळे कठोर व्हावे लागे. वास्तविक त्यांचे जीवन प्रार्थनामय होते, प्रभुमय होते. साधा आहार, झोपायला कठीण चटई, फाटके कपडे व तुटलेल्या वहाणा शिवणे ! ते वैराग्य, ती अनासक्ती, ती क्षमा, ती ईश्वरार्पणता, ते हिमालयाचे धैर्य, ती समुद्राची गंभीरता, ती निरपेक्ष दया, ती सरळता. कोठे पाहाल हे गुण ? समुद्राच्या तळाशी मोठे मोती सापडतात. महात्म्याजवळच असे गुण आढळतात.

त्यांचे मन अर्वाचीन होते. ते बुद्धिप्रधान होते, प्रगतिशील होते. नवीन कल्पना घेणारे व्यापक मन होते. संकुचितपणा त्याना माहीत नव्हता. मानवी जीवन म्हणजे उत्तरोत्तर विकासार्थ अमर धडपड ! इन्किलाब झिन्दाबाद. ते नेहमी म्हणत, "सतत प्रयत्नांशिवाय मनुष्य जगू शकणार नाही. प्रयत्न माझे काम, फळ प्रभूहाती." कुराणात एके ठिकाणी आहे, "तुम्ही स्वत:ची बदलण्याची धडपड सुरु करा. मग प्रभू धावेल."

मुहंमदांनी ज्या विश्वाची कल्पना दिला, तीत गोंधळ नाही. त्या विश्वात व्यवस्था आहे. विश्वातीत व विश्वव्यापी चैतन्य या विश्वाचे नियमन करीत आहे. मुहंमद एकदा म्हणाले, "प्रत्येक वस्तू कालानुरुप आहे. काल एक वस्तू अनुरुप असेल ती उद्या असेल असे नाही. ईश्वर शेवटी योग्य तेच करील." असे जरी ते म्हणत तरी त्यांनी मनुष्य-प्रयत्नाला वाव ठेवला आहे. आपण प्रयत्न करावे. देवाला जे प्रयत्न फुलवायचे, फळवायचे असतील ते फुलवील, फळवील. मानवाला इच्छास्वातंत्र्य, कर्मस्वातंत्र्य, प्रयत्नस्वातंत्र्य आहे. पैगंबरांची सहानुभूती सर्व भूतमात्रांसाठी. त्यांनी सर्व प्राणिमात्रांसाठी प्रभूची करूणा भाकिली. एका मानवाला वाचविणे म्हणजे सर्व मानवजातीला वाचविणे आहे असे ते म्हणत. समाजाचे एकीकरण करणारे ते होते. ते जोडणारे होते. अती उच्च, उदात्त असे ते मन होते. तरीही कौटुंबिक जीवनाचे पावित्र्य विसरत नसत. मानवाची सेवा म्हणजेच ईश्वरभक्तीचे परमोच्च कर्म असे त्याना वाटे. निराळी भक्ती व पूजा आणखी कोठली ? सेवा हीच भक्ती. आपापली कर्तव्ये सोडा, असे कधीही त्यानी सांगितले नाही. त्यांची शिकवण सर्वसामान्य मनुष्याला झेपणारी आहे.

त्यांचा मर्यादा-धर्म आहे. आपापली नियत कर्तव्ये करण्यातच पुण्य आहे, धर्म आहे. पैगंबर सांगाय्चे, "मुलाबाळांची उपेक्षा नका करू. ती प्रभूची ठेव आहे. प्रेमाने व हळुवारपणाने मुलांचे संगोपन करा. मुलांनीही आईबापांना मान द्यावा, प्रेम द्यावे. तुमच्या कर्तव्याच्या वर्तुळात तुमचे कुटुंबीच फक्त नसावेत; आप्तेष्ट, सगेसोयरे, मित्र व ज्यांचे तोंड खाली झाले आहे असे अनाथ, त्यांचाही समावेश तुमच्या कर्तव्याच्या वर्तुळात आहे, हे विसरु नका."

असे हे मुहंमद होते. त्यांच्याहून अधिक विशुद्ध, अधिक प्रतिभाशाली विभूती झाल्या असतील; परंतु जे ईश्वरी कार्य घेऊन मुहंमद आहे, त्या कार्याची जितक्या एकरूपतेने व जितक्या धैर्यशौर्याने व उदात्ततेने त्यानी पूर्णता केली, तसे क्वचितच कोणी केले असेल. ईश्वरी संदेश मला द्यावयाचा आहे, ही अखंड जाणीव ठेवून तदर्थ असे सर्व जीवन क्वचित कोणी दिले असेल. एका महान सत्याला त्यानी जीवनात

स्थान दिले होते. त्या सत्यातून सर्व प्रेरणा घेत होते. तो त्यांचा आनंद. ते सत्य म्हणजे ईश्वर एक आहे. हे सत्य त्यांच्याइतके तीव्रतेने कोणीही दिले नाही. त्यांचा अनंत उत्साह या सत्यार्थ होता. क्षुद्र गोष्टीसाठी नव्हता. असे महापुरूष हे जगाचे, मानवजातीचे मोठे मीठ असतात. मानवजीवन ते सडू देत नाहीत. स्वच्छ राखतात. मधूनमधून असे दैवी मीठ येत असते.

पैगंबर मेले तेव्हा उमर म्हणाला, "कसे मेले ? अशक्य !" अबुबकर म्हणाले, "मित्रांनो, ज्यांनी मुहंमदांची पूजा केली, त्यांनी लक्षात घ्यावे की मुहंमद मरण पावले; परंतु ज्यांनी परमेश्वराची पूजा केली, त्यांचा ईश्वर सदैव आहे, तो कधी मरत नाही !"

मुहंमद गेले; परंतु तो एक परमेश्वर सदैव आहे. मुहंमद विसरलेत तरी देव विसरू नका. आणि देवाची स्मृती देणारा, त्याला तरी कोण कसा विसरेल ? खरे ना ?

# समाप्त



